श्रीसमर्थवाग्देवतेच्यां चरणीं

अर्पिलेला

# पांचवा सुमनहार

## अनुक्रमणिका

॥ श्रीरामसमर्थ ॥

प्रस्तावना

# पांच सुमनहार



( १ ) हा पांचवा सुमनहार होय. असे सुमनहार श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पण होण्यास सुरुवात झाली प्रथम १८५७ च्या ज्येष्ठ शुद्ध १३ पासून म्हणजे श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या स्थापनेपासून. या पांच सुमनहारांत ५८ मालाकारांनीं दिलेलीं १०१ सुमनें आहेत. यांपैकीं कांहीं सुमनें " घाणेरीचीं फुलें " आहेत हें रा. पांगारकरांचें मत कळवून एका मित्रानें लिहिलें कीं, हीं सर्व सुमनें सारखीं च सुवासिक नाहींत. नसणार च ! दोन सख्ख्या भावंडांची हि आवडनिवड एक असत नाहीं, तेथें निरनिराळ्या मालाकारांनीं आपआपल्या आवडीप्रमाणें दिलेलीं १०१ सुमनें सारखीं च सुवासिक असूं शकतील या आहेत असें कोणी म्हणूं शकेल असें वाटत नाहीं. आणि असें कोणी म्हटलें हि नव्हतें. उलट पहिल्या सुमनहाराच्या प्रस्तावनेंत सत्कार्योत्तेजक सभेच्या चिटणीसांनीं लिहिलें कीं, " सुमनें निरनिराळ्या उपवनांतील भिन्न भिन्न जातींचीं आहेत. तीं स्वभावतः सर्व सारखीं सुवासिक असूं शकणार नाहींत. तीं सर्व सर्वांना सारखी च आल्हादकारक वाटतील असें म्हणतां येत नाहीं. शिवाय, पुष्प हातीं घेऊन त्याचा वास घेणाऱ्या प्रत्येकाची आवडनिवड भिन्न असणार. " पण या सुमनांपैकीं कांहीं सुमनें " घाणेरीचीं फुलें " आहेत, असें कोणी म्हणेल असें मात्र मला वाटलें नव्हतें. हा मनुष्यस्वभाव आहे, आणि म्हणून सुमनहारांच्या कल्पनेची उपयुक्तता मान्य करून आणि कांहीं " लेख उत्कृष्ट असून

ते समर्थवाङ्मयाच्या अभ्यासानें च स्फुरलेले आहेत " असें म्हणून हि आपल्याला न आवडणाऱ्या वासाचें एकाद दुसरें सुमन या हारांत आढळल्यामुळें त्यांना कोणी " घाणेरीचीं फुलें " संबोधिल्यास आपण तिकडे दुर्लक्ष च केलें पाहिजे.

( २ ) या ५८ मालाकारांत कांहीं मालाकार पहिल्या दर्जाचे आहेत हें कोणी हि मान्य करील, पण त्याबरोबर च हें हि खरें आहे कीं, लाडफाटकादि पहिल्या दर्जाच्या आणखी कांहीं मालाकारांचीं " सुमनें " अजून श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पण झालेलीं नाहींत. एकांतांत त्यांनीं तीं श्रीचरणी वाहिलीं असतील हि, लोकांतांत त्यांनीं तसा उच्चार हि केला असेल, पण प्रत्यक्ष रामदास आणि रामदासी मासिकाच्या द्वारां त्यांचीं तीं सुमनें श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पण झालेलीं महाराष्ट्राला अजून पहावयाचीं आहेत ! लाडफाटक यांचे लेख रामदासी मासिकांत केव्हां तरी येतील ही आतां हळुहळु नष्ट होत चाललेली मनाची वेडी आशा प्रकट करण्यापलिकडे माझ्या हातीं दुसरें काय आहे !

( ३ ) या हारांतील १०१ लेखांकडे नजर टाकल्यास त्यांत धार्मिक, सामाजिक, राजकीय, ऐतिहासिक आणि वाङ्मयीन यांपैकीं कोणत्या ना कोणत्या तरी दृष्टीनीं श्रीसमर्थ आणि त्यांचें वाङ्मय या विषयींचा विचार लेखकांनीं केला असल्याचें आढळून येणार आहे. श्रीसमर्थांच्या खऱ्या स्वरूपाची आपल्याला ओळख करून देण्याच्या कामीं या सर्व लेखांचा उपयोग होत असतो. या सर्व लेखकांचा मी आभारी आहे.

( ४ ) येत्या ज्येष्ठ शुद्ध १३ पासून येणाऱ्या सर्व लेखांचा " सहावा सुमनहार " गुंफण्यास सुरुवात होईल. या पांच हि सुमनहारांतील सर्व च लेखकांचें या कामीं मला सहाय्य होईल असा विश्वास आहे; पण अजूनपर्यंत ज्यांना या सुमनहारांकडे पहाण्यास सवड झाली नाहीं, अशा इतर हि अध्यापकप्राध्यापकादि व्यासंगी विद्वानांचें लक्ष

या हारांकडे जाईल आणि त्यांच्याकडून सहाव्या सुमनहारासाठीं सुमनें येतील अशी अपेक्षा आहे. सारांश, सहावा सुमनहार गुंफण्यास सर्वांनीं साहाय्य करावें, अशी प्रार्थना आहे.

( ५ ) आज इतकें खरें कीं, श्रीसमर्थकंठीं विराजणाऱ्या माळेच्या चौथ्या सरांतील हा सातवा मणी, म्हणजे च श्री रामदास आणि रामदासी ग्रंथमालेंतील चाळिसावा भाग — श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पिलेला पांचवा सुमनहार — आजच्या मंगल दिनीं महाराष्ट्रास सादर होत आहे.

१८६४ श्रीरामसमर्थनवमी<br>( ता. २६-३-१९४२ )<br>श्रीसमर्थवाग्देवतामंदिर, धुळें } गणेश शंकर देव



॥ श्रीरामसमर्थ ॥

## ॥ श्रीसद्गुरुस्तवन ॥

सद्गुरुपाईं । रत कांहीं साधका ॥ ध्रु०

निर्विकारी देव मोठा । त्याची प्रतिमा नाहीं ।
साधुरूप पाही । रत कांहीं साधका ॥ १

मायातीतु ब्रह्ममूर्ति । आशारहितु पाशरहितु ।
साधुरूप पाही । रत कांहीं साधका ॥ २

मोक्षपाणी भवरिपु तो । निशिदिनिं कल्याण जपतो ।
साधुरूप पाही । रत कांहीं साधका ॥ ३



श्री

रामदास आणि रामदासी

भाग चाळिसावा

# श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पिलेला

# पांचवा सुमनहार

---

(१)

श्री

## श्रीसमर्थांची शक्तिपूजा

( लेखक—रा. धोंडो केशव ओगलेकर, वकील, चाळिसगांव )

शक्तीनें मिळती राज्यें । स्रु प्र. ६७-३०
शक्ती तों सर्वही सुखें । ६७-२८

श्रीसमर्थांनीं टाकळी येथें बारा वर्षे गायत्रीपुरश्चरण व विद्यासाधन केल्यानंतर तीर्थयात्रा करण्याचा त्यांनीं संकल्प केला. तीर्थयात्रा करण्याकरितां ते निघाले. त्या निमित्तानें त्यांनीं सर्व देशभर पर्यटन केलें.

केल्यानें देशाटन पंडितमैत्री सभेंत संचार ।
शास्त्रग्रंथविलोकन मनुजा चातुर्य येतसे फार ॥

हा एक प्रसिद्ध श्लोक आहे. देशपर्यटनामुळें मनुष्याला चातुर्य येतें. देशपर्यटनामुळें श्रीसमर्थांना चातुर्य आलें असें नव्हे. त्यापूर्वी च त्यांचें चातुर्य प्रकट झालें होतें. बारा वर्षे देशपर्यटन केल्यामुळें मात्र श्रीसमर्थांस एक अलभ्य लाभ झाला. श्रीसमर्थांची दृष्टि अधिक विशाल, व्यापक, खोल व अंतर्मुख झाली.

तीर्थयात्रा व देशपर्यटन करताना या भारतभूमीकडे व त्यात वास करणाऱ्या जनताजनार्दनाकडे श्रीसमर्थांचें बारीक लक्ष होतें. त्यांना या देशांत काय आढळलें?

देवगिरी येथील यादवांचें राज्य नष्ट झाल्यावर हिंदुधर्माचा त्राता असा एक हि हिंदु राजा त्यावेळीं अस्तित्वात नव्हता. राज्यतंत्र यवनांचे हातीं गेलें होतें. हिंदूंचा स्वाभिमान, स्वदेशाभिमान व आत्मविश्वास नष्ट झाला होता. कित्येक मराठे व रजपूत सरदार यवनाधिपतींचे–उत्तरेकडील मोंगलाचे वा दक्षिणेंतील शाह्यांतील यादशहाचे–मांडलीक होऊन रहाण्यात आनंद व सर्वस्व मानीत होते त्यांची थुंकी झेलावी व आपली प्रतिष्ठा राखावी व आसन स्थिर करीत रहावें, यातच त्यांची करामत! यामुळें धर्माभिमानहि नष्ट झाला होता. हिंदूंचें राज्यतंत्र कोठेंच नसल्यामुळें हिंदुधर्मावर यवनांकडून घाला घातला जात होता, स्त्रिया भ्रष्टविल्या जात होत्या. यवनाधिपतींस अगर सरदारास कांहीं हिंदु आपणच आपल्या कन्यका स्वखुषीनें देत होते! दावलमलकास लोक भजत होते हिंदु धर्मांत कांहीं त्राण नाहीं, असें हिंदु लोक म्हणूं लागले होते. देवदेवालयें छिन्नभिन्न केलीं जात होतीं. जिकडे तिकडे अधर्म झाला होता.

तीर्थ क्षेत्रें मोडिलीं। ब्राह्मण स्थानें भ्रष्ट झालीं।
सकळ पृथ्वी आंदोळली। धर्म गेला॥ शिवरायास पत्र

याप्रमाणेंच आर्थिक स्थितीहि निकृष्ट व बिकट होती अवर्षण, अतिवर्षण, दुष्काळ, लुटालूट वगैरे कारणामुळें

कांहींच पाहता धड नाहीं। विचार सुचेना कांहीं।
अखंड चिंतेच्या प्रवाहीं। पडले लोक॥ स्फुट
लोक बहुत पस्तावले। कीती एक जाजावले।
कितीं एक कावले। उद्वेगरूपी॥

अशी अत्यंत शोचनीय हिंदूंची स्थिती होती.

राज्य नाहीं, धर्म नाहीं, अर्थ नाहीं यामुळें मानसिक व शारीरिक दौर्बल्यहि आलेलें होतें. पराक्रम करण्याची पात्रता असूनहि हिंदु लोक हतबुद्ध व निरुत्साही झाले होते. जो तो स्वत ला शहाणा समजे. त्यामुळें कोणी कोणाचें ऐकेना. कर्तव्यशून्यता त्यामुळें वाढली होती.

सांगों चि जाणती सर्वे। कर्ता कोणी दिसेचिना।
करटे मिळाले सर्वें। जो तो बुद्धीच सांगतो॥ स्फुट

हिंदुमानाच्या सर्व प्रकारच्या अवनतीमुळें श्रीसमर्थांचें मन उद्विग्न झालें,

म्हणती कैसी वांचतील जनें । कैसीं ब्राह्मण्यें राहतील ॥ स. प्र. २०–५९
कैसी क्षेम राहेल जगती । कैसी देवदेवाल्यें तगती ।
कैसे कुटुंबवछल लोक जगती । कोणेकडे जातील हे ॥ ६०

याप्रमाणें श्रीसमर्थ चिंता करूं लागले. ही अवनती कशी घालवावी, जनताजनार्दनाची सेवा कशी करावी, लोकसंग्रह कसा करावा याबद्दल त्याना फार मोठा विचार पडला.

सामान्य मनुष्य चिंतातुर व संशयग्रस्त झाला कीं, प्रतिकूल परिस्थितींत त्याला पुढील मार्ग दिसेनासा होतो. परंतु असामान्याची स्थिती अगदीं उलट व निराळी असते. ते मोठे आशावादी व ध्येयवादी असल्याकारणानें प्रतिकूल परिस्थिती त्याना कधीं भेडसावीत नाहीं. ते खोल व सूक्ष्म विचार करून प्रतिकूल परिस्थितींत आपलें उच्च ध्येय साध्य करण्याकरिता मार्ग काढतात व भीम प्रयत्नानें आपलें ध्येय गाठतात. श्रीसमर्थ हे समर्थ होते. असामान्य नरश्रेष्ठ होते. त्यानीं प्रतिकूल परिस्थिती असतानाहि ' धर्मस्थापना ' करण्याचें आपलें निश्चित ध्येय ठरविलें.

शुद्ध उपासना विमल ज्ञान । वीतराग आणि ब्राम्हण्यरक्षण ॥
गुरुपरंपरेचें लक्षण । शुद्धमार्ग ॥
ऐसें पंचधा बोलिलें । इतुकें पाहिजे यत्नें केलें । पत्र

धर्मस्थापनेमध्यें राजकीय व धार्मिक मोक्ष अभिप्रेत होता व श्रीसमर्थ या ध्येयसिद्धीकरता अनेक साधनाचा विचार करून मार्गाला लागले.

शक्तिपूजा हें एक प्रबल साधन श्रीसमर्थांनीं योजिलें. कोणत्याहि व्यक्तीची उन्नति व्हावयाची असेल तर त्या व्यक्तीनें शक्तीची पूजा – उपासना करावयास पाहिजे च. " शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ". व्यक्तीच्या आयुष्यात कोणचेंहि इहलोकींचें उद्दिष्ट साध्य करावयाचें असेल, सौख्य मिळवावयाचें असेल, अभ्युदय करून घ्यावयाचा असेल, त्या व्यक्तीनें बलोपासना करून बलसपन्न झालेलें उत्तम. सौख्याचा अगदीं साधा व्यावहारिक अर्थ घेतला तरी शक्तिहीन दुर्बल व्यक्तीपेक्षा सशक्त व ताठर व्यक्ति अधिक सुखी असूं शकते. अशक्त व सशक्त व्यक्तींतील फरक आपल्या अनुभवास आलेले असतातच. परंतु श्रीसमर्थांनीं हा फरक फारच मार्मिक रीतीनें वर्णिलेला आहे.

कोण पुसे अशक्ताला । रोगीसें बराडी दिसे ।
कळा नाहीं कांती नाहीं । युक्ती बुद्धी दुरावली ॥
साजिरी शक्ती तो काया । काया मायाच वाढवी ।
शक्ती तों सर्वही सुखें । शक्ती आनद भोगवी ॥

सार संसार शक्तीनें । शक्तीनें शक्ती भोगिजे ।
शक्त जो सर्वहि भोगी । शक्तीवीण दरिद्रता ॥ स्फुट

सशक्ताला वैयक्तिक शारीरिक सुखाला कांहींच कमतरता नाहीं. अशक्त हा दरिद्री अभागी, तर सशक्त हा श्रीमंत व भाग्यवान. संसार सुखमय करावयाचा अशी इच्छा असेल तर त्यांतील दुःखें सहन करण्याकरितां व सुखाचा उपभोग घेण्याकरितां शक्तीपूजा--बलोपासना केलीच पाहिजे.

निश्रेयसप्राप्तीकरितांहि शक्तीपूजा--बलोपासना अवश्य आहे. " बलमुपास्व ", " नायमात्मा बलहीनेन लभ्यः " असें उपनिषद्‌कालापासून ऋषीमुनी स्वानुभवानें सांगत आले आहेत. बलहीन व अशक्त व्यक्तींकडून आत्मानात्मविचार व्हावयाचा नाहीं. कडक तपश्चर्या व योगधारणेकरितां शक्तिसंपन्न मनुष्य असावा लागतो. मुक्तिकरितां शक्ती अवश्य आहे.

व्यक्तीच्या सर्वांगीण उन्नतीकरितां--अभ्युदय निःश्रेयसाकरतां शक्तिपूजेची आवश्यकता आहे. तें एक महत्त्वाचें साधन आहे. त्याप्रमाणें समाजोन्नति व राष्ट्रोन्नतीकरितांहि शक्तीपूजा हें एक महत्त्वाचें साधन आहे. समाज व्यक्तींचाच बनलेला असल्यामुळें व्यक्ति अगर समाजघटक जर शरीरसंपन्न व बलशाली असतील तर समाजांत सुप्रजाजनन होतें, समाज कार्यप्रवण, कर्तव्यदक्ष व बलवान् होतो व त्यामुळें समाजाची उन्नति होत जाते व त्यामुळें राष्ट्रीय गुणांची वाढ व जोपासना होऊन राष्ट्राचीहि उन्नति होते. समाजोन्नति अगर राष्ट्रोन्नति हा " धकाधकीचा मामला " असतो. त्याकरितां शक्तीपूजेचे निस्सीम उपासक तयार व्हावे लागतात. श्रीसमर्थांना त्या कालांत हिंदूंना शक्तिसंपन्न, बलवान्, उत्साही व कार्यक्षम करावयाचें होतें. त्यांच्यामध्यें आत्मविश्वास उत्पन्न करावयाचा होता. धर्माची घडी बसवावयाची होती. धर्मस्थापना करण्याकरितां अंगीकृत कार्य निधड्या छातीनें स्वार्थत्यागपूर्वक पार पाडण्याकरितां कणखर वृत्तीचे लोक तयार करावयाचे होते. ' उदंड सत्तिची कामें ' करण्याकरितां ' मर्द ' तयार करावयाचे होते. देशप्रेम व स्वदेशाभिमान जागृत करावयाचा होता. तेव्हां ' शक्तीनें मिळती राज्यें ' ' शक्तीनें सर्वहि सुखें ' हे मंत्र त्यांनीं हिंदूंना दिले. हे मंत्र त्रिकालाबाधित आहेत. असे किती तरी त्रिकालाबाधित मंत्र अगर घोषवाक्यें श्रीसमर्थवाङ्मयांत आढळतात. शक्तिपूजेचें साधन श्रीसमर्थांनीं त्यावेळीं सांगितलें. अगदीं अलीकडील काळाकडे नजर टाकिली तरी शक्तिपूजेचें महत्व दृग्गोचर होईल व चटकन पटेल. जर्मनीच्या गरुडाचे पंख सुमारें वीस वर्षांपूर्वी कापले गेले होते व त्याचीं तीक्ष्ण नखें काढण्यांत आललीं होतीं त्याला निःसत्व व निर्बल करण्यांत आलें होतें. परंतु शक्तिपूजेच्या साधनानें जर्मनीचा गरुड पुन्हा बलसंपन्न व बलशाली होऊन त्यानें स्वसामर्थ्यानें

सर्व जगास थरारून सोडलें आहे. वीस वर्षांच्या शक्तिपूजेचा हा प्रभाव. " शक्तीनें मिळती राज्यें । शक्तीनें सर्वही सुखें " ह्या सिद्धांताची सत्यता हिटलर यानें सर्व जगास पटवून दिली आहे.

अहिंसा श्रीसमर्थांस माहीत होती. आत्मिक बल व पाशवी बल यांचें महत्व व त्यांतील फरक श्रीसमर्थांस माहीत होता. परंतु

हे धूर्तपणाची कामें । राजकारण करावें नेमें ।
ढिलेपणाच्या संभ्रमे । जाऊ नये ॥ दा. बो.

हें जाणून

धटासि आणावा धट । उत्धटासी पाहिजे उद्धट ।
खटनटासी खटनट । अगत्य करी ॥

असें त्यांनीं ठांसून सांगितलें व समाज व राष्ट्रोन्नतीकरितां आत्मिक व पाशवी शक्तीचें महत्व सांगून शक्तीपूजेचा उपदेश त्यांनीं केला. त्यांनीं कधींहि कोणताही चुकीचा उपदेश केलेला नाहीं. अगर त्याचा उपदेश चुकीचा ठरला असें कधींच झालें नाहीं. ' आत्मप्रचीतीचें बोलणें ' असें त्यांचें. तेव्हां श्रीसमर्थांनीं स्वतः तर शक्तिपूजा केली च, परंतु धर्मस्थापनेकरितां प्रमुख साधन म्हणून तिचा प्रचार केला.

आधीं केलें । मग सांगितलें ॥

हा शक्तिपूजेचा प्रचार श्रीसमर्थांनीं फार युक्तीनें केला. हल्लींप्रमाणें त्यावेळीं वर्तमानपत्रें, साप्ताहिकें, मासिकें, रेडिओ वगैरे असा प्रचाराचीं साधनें नव्हतीं. व्याख्यानें होत नव्हतीं. हरिकीर्तनें व्हावयाचीं, त्यामुळें प्रचार त्या काळात पुष्कळ होणार होता. व म्हणूनच ' मुख्य हरिकथानिरूपण ' प्रतिपादून हरिकीर्तनावर त्यांनीं विशेष जोर दिला. परंतु शक्तिपूजेचा-बलोपासनेचा प्रचार जोरानें हिंदुराष्ट्रांत व्हावा म्हणून श्री समर्थांनीं मारुतीची स्थापना व हनुमानजयंत्युत्सव साजरे करण्यास सुरवात केली. तसेच श्रीराममूर्तींची स्थापना व श्रीरामजन्मोत्सव सुरू केला. शहापूर, मसूर, चाफळ, उंब्रज, माजगांव, शिराळे, बाहे, बोरगांव, शिंगणवाडी, पारगांव व मनपाडळें या गांवीं अकरा मारुतीची स्थापना केली व चाफळास श्रीराममूर्तीची स्थापना केली. वरील दोन्ही उत्सव सुरू करण्यांत श्रीसमर्थांचे अनेक हेतु होतेच. श्री मारुतिराय ब्रह्मचारी होते, श्रीरामाचे एकनिष्ठ सेवक होते व पराक्रमीहि होते. तेव्हा ब्रह्मचर्यपालन, एकनिष्ठ सेवाधर्म व पराक्रम याचा आदर्श श्री मारुतिरायाच्या उत्सवानें लोकांपुढें ठेवला. श्रीरामानीं

मुक्त केल्या देवकोडी । सर्वहि शक्तीच्या बळें ॥
तत्काळची मोक्ष । हें ब्रीद रामाचें । स्फु.

जेणें फेडिला पांग ब्रह्मादिकाचा ।
वळें तोडिला बंध त्या त्रीदशाचा ॥ रामायण

जया यत्न फावेल तेणें करावा ।
महोत्साव या राघवाचा भरावा । करुणाष्टकें

म्हणून श्रीरामनवमीचा–श्रीरामजन्मोत्सवाचा–उत्सव सुरु केला. श्रीराम हेहि पराक्रमी, एकवाणी, एकवचनी, प्रजापालनदक्ष, एकपत्नी, पितृभक्त वगैरे सद्गुणसमुच्चयाचे आदर्श होते. तेव्हा हाहि आदर्श लोकांपुढें उत्सवनिमित्तानें ठेवला. हे उत्सव सुरु करण्याचें मुख्य कारण हिंदूंमध्यें संघटना व्हावी व त्याचेमध्यें बलोपासनेचा प्रचार व्हावा हेंच होतें. श्रीराम व मारुतिराय पराक्रमी व बलवान् होते. त्याच्या उपासनेने लोक बलशाली होणार होते. तेव्हा हे दोन पराक्रमी आदर्श हिंदूंपुढें ठेवून शक्तिपूजेचा प्रचार उत्सवामुळें झाला. त्यामुळें स्वाभिमान, देशाभिमान, स्वातंत्र्यप्रेम जागृत झालें. कालांतरानें धर्मस्थापना झाली व श्रीसमर्थांचें ध्येयहि सिद्धीस गेलें.

श्रीसमर्थांनीं शक्तीपूजा दुसऱ्या प्रकारानें व अर्थानेंहि केलेली आहे.

शक्ति ते सर्व शक्ति ते । आदिशक्ती पुरातना ॥ स्फु.

शक्ती–म्हणजे पुरातन आदिशक्ती व प्रत्यक्ष भवानीमाता, ही होय. या मातेचें महत्व फार च मोठें होतें.

तुझेनि सर्व बोलणें । तुझेनि सर्व चालणें ।
तुझेनि योग धारणें । तुझेनि राजकारणे ॥ स्फु.

अशी श्रीसमर्थांची खात्री होती. त्यामुळें या शक्तीची उपासना हि त्यांनीं अत्यंत मनोभावानें व तळमळीनें केलेली आहे. त्याचें धर्मस्थापनेचें ध्येय सिद्धीस जाणेकरिता या देवतेच्या कृपाप्रसादाची जरूरी होती. याचा प्रत्यय पूर्वी च आलेला होता. श्रीरामचंद्रप्रभूंनी या देवतेच्या कृपेनेंच सर्व देवाना बंदिवासातून मुक्त केलें होतें व देवादिकाना स्वातंत्र्यप्राप्ति झालेली होती. श्रीसमर्थांच्या चळवळीला भवानीमातेचा वरदहस्त पाहिजे होता.

सामर्थ्य आहे चळवळीचे । जो जो करील तयाचे ।
परंतु तेथें भगवंताचें । पाहिजे अधिष्ठान ॥ दा बो.

देवतेच्या अधिष्ठानाशिवाय श्रीसमर्थांची चळवळ यशस्वी कशी व्हावयाची ? तेव्हा या शक्तिदेवीची उपासना त्यांनीं सुरू केली होती. देवी भवानी – माता च ती. मातेसारखें दुसरें दैवत कोणतें ? माता मुलाकरिता–देवी भक्ताकरिता–काय करणार

नाहीं ? मुलांचा सांभाळ करणें, त्यांस परोपरीनें शिकविणें, त्यांच्याकरितां खस्ता खाणें, मुलांकरितां सर्वस्वाचा होम करणें-प्राणहि प्रसंगीं टाकणें-माताच करते.

मुलांची लाज मातेला । सीकवी सरसे करी ॥ स्फुट

त्यामुळें श्रीसमर्थ या शक्तीला-मातेला अगदीं उघडपणें म्हणत

मातेसी काय चोरावें । सर्व ही ठाउकें तिला ॥

" तेव्हां हिंदुसमाजाचा, हिंदुराष्ट्राचा, उद्धार कर. किती प्रयत्न मी केले आहेत, तुला परोपरीनें आळविलें आहे. तुझ्यापुढें हिंदुराष्ट्राचें दु:ख मांडीत आलों आहे, तें निवारण्याचे प्रयत्न करीत आहे, सारखा प्रचार सुरू आहे, प्रयत्नाची पराकाष्ठा झालेली आहे, जनताजनार्दनाची सेवा प्रत्यहीं चालू आहे, तेव्हां आतां मला तुजजवळ एक च मागणें मागावयाचें आहे."

येकची मागणें आतां । द्यावें तें मजकारणें ।

तुझा तूं वाढवीं राजा । सीघ्र आम्हां चि देखतां ॥

याप्रमाणें श्रीसमर्थांनीं मोठ्या आतुरतेनें भक्तिप्रेमानें मागणें मागितलें. श्रीसमर्थांचीं शक्तिपूजा फळास आली, भवानी माता तुष्ट झाली.

तुष्टतां भवानी माता । पुरती मनकामना ॥

मनकामना पुरविली गेली. श्रीशिवाजी महाराजांनीं आपल्या वीरमित्रांच्या व शूर सैनिकांच्या सहाय्यानें स्वराज्य-स्थापना केली.

बुडाले सर्वही पापी । हिंदुस्थान बळावलें ।
अभक्तांचा क्षयो झाला ।
बुडाला औरंग्या पापी । म्लेंच्छसंहार जाहला ।
मोडिली मांडली क्षेत्रें ।

' भक्तासी दीधलें सर्वें ' याप्रमाणें भक्त श्रीसमर्थांस सर्व मिळालें. आनंद-वनभुवन निर्माण झालें. स्वातंत्र्यप्राप्तीमुळें आनंदीआनंद झाला.

' धर्म स्थापनेचें ' ध्येय गांठण्याकरितां श्रीसमर्थांनीं अनेक प्रभावी साधनें उपयोगात आणलीं, त्यापैकीं श्रीसमर्थांची शक्तिपूजा हें एक प्रभावी साधन होतें.

१८६२ ज्येष्ठ शु. ११

( २ )

श्री

# श्रीसमर्थांच्या धर्मकन्या

( लेखकः—रा. त्रिंबक रामकृष्ण गद्रे,
बी. ए., एलएल. बी., वकील, अकोला )

**मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।**
**तिसरें तें सावधपण । सर्व विषयीं ॥**

श्रीसमर्थ रामदास स्वामी तीर्थयात्रेच्या निमित्तानें सर्व भरतखंडांत संचार करून शके १५६६ मध्यें परत महाराष्ट्रांत आले व त्यांनीं मनाशीं एक नवीन संप्रदाय स्थापन करण्याचा निश्चय केला व त्याच्या प्रसारार्थ मठ व महंत याच्या प्रपंचाची त्यांनीं उभारणी केली. शिष्य व महंत यामध्यें महाराष्ट्रीय स्त्रियांनाही प्रवेश दिला व त्यांतील एक दोन तर त्यांच्या मठाच्या महंतही होत्या. महंत गिरिधरांच्या " श्रीसमर्थ प्रताप " या ग्रंथावरून श्रीसमर्थांच्या कांहीं शिष्यिणींची माहिती मिळते. त्यांना " कन्या " ही संज्ञा लावलेली दिसते. " समर्थ उदरींच्या परत्र कन्या " यांची ओळख सदर ग्रंथाच्या अकराव्या समासांत करून दिली आहे व स्वतः गिरीधर स्वामीही अशा एका पूज्य धर्मकन्येचेच एक शिष्य होते असें आढळून येतें. सध्या ज्या कांहीं धर्मकन्यांचा उल्लेख आढळतो त्यापैकीं पुढील शिष्यिणींचीं नावें महत्वाचीं आहेत—सतीबाई, चिमणाबाई ऊर्फ अक्का, अंबिकाबाई, द्वारकाबाई, नवाबाई, मनाबाई, अपाबाई, अन्नपूर्णाबाई, सखाबाई, गंगाबाई, गोदाबाई, अंताबाई अथवा आतुबाई, कृष्णाबाई आणि वेणाबाई.

बाई अथवा सतीबाई या शहापुरच्या रहाणाऱ्या होत्या. त्यांच्यावर अनुग्रह करण्यापूर्वी श्रीसमर्थांनीं त्यांचें फार सत्व पाहिलें. त्यांनीं बाईच्या घरच्या मुलांना उकिरड्यांत पुरलें, त्यांचें घरदार लुटविलें, त्यांच्या घरांत साप सोडले व दागदागिने मोडून तोडून फेकून दिले. घरांतील उतरंडी फोडून टाकल्या. अशा रीतीनें त्यांच्या गुरुनिष्ठेची आत्यंतिक कसोटीनें परीक्षा घेऊन नंतर समर्थांनीं बाईवर कृपा केली व त्यांना उपदेश दिला. सतीबाईचे पति बाजीपंत ऊर्फ बाळकृष्णपंत,

त्यांच्या वडिलांचें नांव धोंवाजी मुन्हार, व चुलत चुलत्यांचें नांव दत्ताजी अनंत. या सासरच्या व माहेरच्या उभय कुलांतील स्त्रीपुरुषांना श्रीसमर्थांचा उपदेश होता. सतीबाईंचे भाचे भीमस्वामी यांना समर्थांनीं तंजावर मठाचे महंत नेमले होते.

**चिमणाबाई** ऊर्फ अक्का या मानानें व अधिकारानें सर्व शिष्यिणींत श्रेष्ठ होत्या. यांची समाधी सज्जनगडावर आहे. या अत्यंत कारस्थानी असून राजकारण करणाऱ्या व धोरणी आणि मुत्सद्दी बाण्याच्या होत्या. समर्थसंप्रदायाच्या संघटनेंत त्यांचें फार उच्च व महत्वाचें स्थान आहे. श्रीसमर्थांच्या अवतार समाप्तीनंतर अक्कांनीं सज्जनगडावर राहून तीस वर्षे संप्रदायाची व महाराष्ट्राची एकनिष्ठपणें सेवा केली. छत्रपति धर्मवीर संभाजी महाराजांच्या अमानुष वधानंतर छत्रपति राजाराम महाराजांच्या नेतृत्वाखालीं जिंजीचें तीस वर्षांचे प्राणांतिक स्वातंत्र्ययुद्ध झालें. त्यावेळीं चिमणाबाई छत्रपति राजारामांच्या फार उपयोगी पडल्या. समर्थांच्या शिष्यांनीं, महंतांनीं व धर्मकन्यांनीं या स्वातंत्र्ययुद्धांत जी महत्वाची कामगिरी केली आहे, तिची उपेक्षा इतिहासलेखक करतात ती योग्य नव्हे. श्री समर्थांच्या तालिमींत निष्णात झालेल्या हजारो शिष्य शिष्यिणींनीं या वेळीं " बालचर " म्हणून आपण म्हणतों त्या तऱ्हेचें हेरगिरीचें कार्य केले आहे. चंदी चंदावर व जिंजी अशा सुदूर प्रांतीं छत्रपति राजाराम महाराज यांचें प्रयाण व बारा वर्षांनीं त्यांचें महाराष्ट्रांत पुनरागमन या दोन्हीं महत्वाच्या व अत्यंत बिकट आणि धोक्याच्या प्रसंगीं हे समर्थ शिष्य शर्थीनें व प्राणपणानें स्वधर्माच्या व स्वराज्याच्या कामीं उपयोगी पडले आहेत. या वेळीं अक्का विद्यमान होत्या, इतकेंच नव्हे तर समर्थांच्या सर्व शिष्यांच्या हालचालींचें सूत्रचालकत्वही बव्हंशीं त्यांच्याकडे होतें. श्री समर्थांनंतर चाफळ व सज्जनगड या उभय देवस्थानांची व्यवस्थाही त्यांच्याकडे होती.

श्री समर्थांच्या धर्मकन्यांत विजयपूर अथवा विजापूरच्या पुण्यस्मरणीय **अंबिकाबाई** यांची योग्यता फार मोठी आहे. समर्थांच्या कार्याचा संदेश ऐकतांच त्या तडकाफडकी अत्यंत त्वरेनें कृष्णातीरीं आगमन करत्या झाल्या व सद्गुरुकार्यासाठीं श्री रामदासस्वामींच्या संनिध उपस्थित झाल्या. कोल्हापुर प्रांतांत श्रीसंदेश प्रसृत करण्याची त्यांना आज्ञा झाली व त्या प्रांतीं अंबिकाबाईंनीं अतिशय तडफीनें हरिभक्तीचा व राजकारणाचा संदेश लोकांना उत्तम प्रकारें पोंचविला. करवीर मठाच्या महंत या नात्यानें त्यांनीं मोठ्या प्रमाणावर शिष्यसंप्रदायही केला. त्या कविताही करीत. त्यांचें एक गोड व प्रासादिक पद्य येथें दिलें आहे. त्यावरून त्यांची अध्यात्मिक योग्यता कळून येणारी आहेः—

मी सद्गुरु घरची सैरी । शोभल्ये वरी ॥ धृ. ॥

बाई मज गोल्हाटीं गे राहाणे । तेथुनि श्री हाटीं मज पाहणें ।
त्रिकुट शिखरीं येऊनि जाणें । बोलल्ये वरी ॥ १ ॥

बाई मी त्रिगुणीं खेळ खेळते । चतुर्थ गुणीं मी साक्षी होते ।
सदा मी येते जाते । भय न अंतरीं ॥ २ ॥

स्थूळ सूक्ष्म कारण । चौथा देह महा कारण ।
स्थानें क्रीडायाचीं जाण । माजी हे वरी ॥ ३ ॥

आतां मी सर्वांसी प्राशुनी । मोहातीत क्रीडते अनुदिनीं ।
निशंक वर्तते हो जनीं । पहा च्यातुरी ॥ ४ ॥

रामदासाश्रय म्यां केला । म्हणउनि विलास सर्व ही जाला ।
अंवी न विसरे गुरुपदाला । प्रतिज्ञा खरी ॥ ५ ॥

अंबिकाबाईचें उपनाम कोराणे होतें असें दिसतें. त्याच्या संबंधानें कोल्हापुर प्रांतात अधिक संशोधन होणें अवश्य आहे.

श्रीसमर्थांच्या धर्मकन्या गुरुचरणीं दृढ विश्वास ठेऊन उदास वृत्तीनें जनात रहात असत. नाना प्रकारची ग्रंथरचना करून आणि सर्वदा अंतर्निष्ठ राहून त्या लोकामध्यें अध्यात्मज्ञानाचें व प्रसंगानुरूप तत्कालीन राजकारणाचें विवरण करीत असत. आपल्या स्वामीच्या प्रतापानें त्या जनतेंत परमार्थाचा उत्कट विस्तार करीत होत्या. नवाबाई या नावाच्या एक समर्थकन्या तापीतीरच्या रहाणाऱ्या होत्या. बहुधा त्या बऱ्हाणपुरच्या रहाणाऱ्या असाव्यात. त्या काळात या शहराचें राजकीय महत्व फार मोठें होतें. मोंगल साम्राज्याच्या दक्षिणेंतील विभागाच्या राजधानीचें स्वरूप या शहराला प्राप्त झालें होतें. अशा सर्व ठिकाणीं उघड व गुप्तरूपानें समर्थशिष्य वास्तव्य करीत असत. बऱ्हाणपुरचें महत्व मराठेशाहींत व पेशवाईंतही होतें. सन १८११ सालीं गोविंदनाथ या नावाचे एक मारुतिउपासक येथेंच समाधिस्थ झाले. त्याचा तेथें मठ आहे. गोविंदनाथ हे अकोल्याजवळ घुसर या खेड्यात रहात असत. ते चित्पावन ब्राह्मण असून त्याचें उपनाम "पराजपे" होतें. गोविंदनाथ हे सुरजीअंजनगाव या वऱ्हाडातील एका गावातले मारुतिउपासक देवनाथ याचे गुरु होते. देवनाथ श्रीसमर्थांनीं स्थापन केलेल्या सातपुड्यातील चारी येथील हनुमंताचें दर्शन घेण्यासाठीं नियमानें जात असत. हें स्थान सुरजी-अंजनगांवपासून चोवीस पंचवीस मैलाच्या अंतरावर आहे. या देवनाथांचे

शिष्य दयाळनाथ. देवनाथ-दयाळनाथ पंथाचा संबंध समर्थ संप्रदायाशीं होता, असा आमचा अंधुक तर्क आहे.

**मनाबाई** या धर्मकन्येला जनसंग नावडता होता. त्या वैराग्यशील अंतःकरणाच्या असून श्रीचरणीं एकनिष्ठेनें रहात व अध्यात्मश्रवण करीत असत. **आपाबाई** या नांवाच्या दुसऱ्या एक समर्थकन्या; यांनीं संगीत व कीर्तन यांत प्राविण्य मिळविलें होतें व त्यांचें कीर्तन श्रीसमर्थ स्वतः ऐकत असत. उपरिनिर्दिष्ट सुरजीअंजन गांवाचे वऱ्हाडांतले एक समर्थशिष्य महंत गिरिधर ( "प्रताप" कर्ते नव्हत ) यांच्या पत्नी **अन्नपूर्णाबाई** यांनाही समर्थांचा अनुग्रह होता. समर्थांचे एक विदर्भीय चरित्रकार उद्धव यांच्या त्या माता होत.* त्या मेहमीं समर्थांचें स्मरण करण्यांत निमग्न असत. **सराबाई** या नांवाच्या शिष्या चाफळ येथें रहात असत. त्या वैराग्यशील अंतःकरणाच्या असून प्रतिवर्षी चाफळ येथें होणाऱ्या श्रीरघुनाथयात्रेसाठीं नाना वस्तूंचा संग्रह करण्याचें काम त्यांना समर्थांनीं दिलें होतें. **गंगाबाई** या नांवाच्या कन्येला श्रीसमर्थ एकांतांत भोजन करीत असतांना त्या "काय व्हावे स्वामी" अशी चौकशी करण्यास गेल्या असतांना प्रत्यक्ष हनुमंताचें दर्शन झालें असें म्हणतात. गुरुचरणीं सद्भाव ठेवणाऱ्या **गोदाबाई** यांना समर्थांनीं प्रचिती दाखवून गोंवऱ्यांच्या गुळाच्या भेलीचा चमत्कार दाखविला. **अंताबाईंना** समर्थांनीं जकिरड्यांत पुरलें होतें; आपण नदीच्या पाण्यांत घोरें पिळतों तसें त्यांना सद्गुरूंनीं कृष्णा नदींत फेकून दिलें होतें !

"प्रताप" कार आणखी एका कन्येचा उल्लेख पुढील ओवींत करतातः— "बाईची कन्या परम मान्य जाहाली । समर्थचरणी पावली संस्थान." ही ओवी कोणाला उद्देशून आहे तें लक्षांत येत नाहीं. तथापि असा तर्क वाहतो कीं, या "प्रताप" कारांच्या गुरु बाईयाबाईच असाव्यात.

आतां आपण देवास वाहिलेल्या **कृष्णाबाई** या अंध कन्येकडे वळूं या. समर्थांनीं यांना चाफळ येथें तेथील श्रीरघुनाथमंदिरांत वाढविलें व पुढें त्यांना गुरुकृपेनें दिव्य दृष्टि प्राप्त होतांच त्यांचा मोठ्या आनंदानें विवाह करून देण्यांत आला. असो. गार्गी, मैत्रेयी, ध्रुवमाता, अरुंधती, लीला, चुडाळा, अनुसया, देवहुति, सुलभा, उमा, मिरा, मुक्ताबाई, मैनावती, जनाबाई अशा उदंड आर्यकन्या होऊन गेल्या. त्यांच्या बरोबरीच्या आमच्या या समर्थांच्या धर्मकन्या होत्या; व त्यांची संख्या फार मोठी होती. ढोबळ मानानें बोलावयाचें तर दहा शिष्य असतील तर एक शिष्या होती असें म्हणावें लागेल. "प्रताप" कारांची पुढील ओवी मोठी मार्मिक आहेः—

* उद्धवकृत समर्थचरित्राच्या हस्तलिखित पोथीची एक प्रत श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांना सुरजीअंजनगाव येथेंच मिळाल्याचें कळतें.

एवं दशपुत्रावरी येक कन्या । समर्थ उदरीं विश्वमान्या ।
वैराग्यशील परम धन्या । गंगा गोदा सृष्टीवरी ॥ स. प्र. ३३/४

या सर्व कन्यांमध्यें–नव्हे अखिल शिष्यसंप्रदायांत प्रथम मान **वेणाबाईंना** होता. **मिरज मठाच्या महंत** अशा या वेणाबाईंनी शिष्य व शिष्यिणींचा फार मोठा प्रपंच केला व सद्गुरूच्या कार्याच्या प्रसारार्थ पारमार्थिक पराक्रमाची शिकस्त करून गुरुचरणावरच प्राण अर्पण केले.

वेणाबाईंनीं केलेल्या शिष्यिणींत सकुबाई, अक्काबाई, मुधाबाई, बाकुबाई, भिमाबाई, बाईयाबाई, अशीं नांवें आढळतात. त्या मिरज मठाच्या महंत होत्या त्या. परंतु तेथील सर्व काम त्यांनीं बाईयाबाईकडे सोपविलें होतें असें दिसतें. वेणाबाईंनीं आपल्या शिष्य मंडळींना उत्तर भारतांत समर्थकार्याच्या प्रसारार्थ पाठविलें होतें; व त्यांपैकीं विश्वनाथ नांवाच्या एका शिष्याचा उल्लेख आढळतो. श्री शिवरायांनीं आग्र्याहून प्रयाण केलें त्या प्रसंगीं या शिष्यांची बहुमोल मदत झालेली आहे. वेणाबाई समर्थांच्या अत्यंत आवडत्या कन्या होत्या. समर्थांनीं एकदा कृष्णावेणीसंगमांत वेणाबाईचें वस्त्र वाळवंटांत पाहिलें; व तें त्यांनीं स्वहस्तें विभागून कंठीं धारण केलें. या प्रमाणें जणूं काय त्यांनी "वेणीपरंपरा दीक्षा स्वयें अंगिकारिली." वेणाबाईंनीं व त्यांच्या परंपरेंतील गिरिधरांसारख्या शिष्यांनीं प्रचंड ग्रंथरचना करून **श्रीरामकथा ब्रह्मांड भेदून पैलीकडे नेली.** वेणाबाईंनीं लिहिलेला "सीतास्वयंवर" नांवाचा गोड ग्रंथ महाराष्ट्रसारस्वतात अपूर्व आहे. "कौल," "श्रीरामगुरुसंवाद" अशी त्यांची स्फुट कविताही आहे. श्रीसमर्थांवर त्यांनीं केलेल्या एका पद्यांतील कांहीं पंक्ती येथें उतरून आम्ही लेखणी तूर्त बाजूला ठेवणार आहोंत.

पाईं पादुका हातांत तुंबा । मर्जरी भगवी फांकली प्रभा ।
कटबंध कौपीन मळसूत्र शोभा । न धानवे मूर्ति साजिरी ॥

असें ध्यान सांगून त्या म्हणतात कीं:–

तैसी मूर्ति दृष्टी पडे । तैशा पाईं वृत्ति जडे ॥
ब्रह्मचारी सूत्र शिखा । पाईं शोभती पादुका ॥
कटीं अडबंध कौपिन । कंठीं तुळसी मणि भूषण ॥
दिव्य मुख दिव्य नेत्र । भाळीं अयाळ्ं सुंदर ॥
रामदास दिव्य नाम । सखा ज्याचा आत्माराम ॥

( ३ )

॥ श्री सद्गुरु प्रसन्न ॥

# दहाव्या दशकांतील समासांचा समन्वय

## ( लेखक--रा. महादेव काशीनाथ खेर, इंदूर )

मूळमायेचा उद्भव श्रीसमर्थांनीं मायोद्भव नामक आठव्या दशकांत दाखविला; त्यावेळेस मूळमायेमध्यें पंचभूतांचें व निर्गुणाचें गूढत्व कसें असतें याचें सोपपत्तिक विवरण त्यानीं केलें तें वाचकांच्या लक्षांत आहेच. मूळमाया ही कर्दमरूप आहे तिची च परिणति गुणमयी मायेमध्यें कशी झाली त्याचें साद्यंत वर्णन नवव्या दशकांत केलें म्हणून मायोद्भवाचें कथानुसंधान, त्या दशकांतील सहाव्या समासांत, श्रोत्यांना विषय माह्य व्हावा म्हणून ज्ञानदशकाचा उद्देश करून च श्रीसमर्थांना करावें लागलें; कारण अन्वय ठेवावयाचा होता. नवव्या दशकांत सुद्धां गुणमयीच्या घटावयवयाच्या पलीकडील वर्णन मात्र त्यांनीं केलेलें नाहीं. मूळमाया च कर्दमरूप तर तिच्यांतून स्पष्ट दशेला आलेली गुणमयी ही हि कर्दमरूप च. मूळमायेमध्यें असलेलें गुणसाम्य गुणामध्यें विकार झाल्यामुळें विघडलें एवढें च. ' गुणविकार होतां चि अल्प । गुणक्षोभिणी बोलिजे ' ॥

याचें रहस्य कळण्याकरिता मूळमायेचें स्वरूप कसें आहे तें दाखविलेलें च येथें दाखवीत आहें. निश्चलावर जें चंचलत्व भासलें तीच मूळमाया. चंचलत्व हा वायूचा धर्म म्हणून ती वायुस्वरूप. पण हें चंचलत्व ज्या निश्चल वस्तूवर भासलें ती अबाधित संचलेलीच असते. ज्या प्रमाणें भुजंगाचें स्वरूप दोरीकरितां च असतें, तदभावीं शक्य नसतें, तद्वत् चंचलत्व निश्चलाकरितांच असतें यांत संदेह नाहीं. म्हणजे चंचलत्वामुळें निश्चलाची ओळखण होते, म्हणूनच श्रीसमर्थ म्हणतात कीं ' त्या मूळ पुरुषाची ओळखण । ते हे मूळ मायाचि आपण ' ॥ तात्पर्य इतकेंच कीं वायुस्वरूप प्रकृतीमध्यें जो निश्चल वस्तु संचलेली असते तिलाच सापेक्षत्वानें ' मूळपुरुष ' असें म्हणतात; व मग या मिश्रणास प्रकृतिपुरुष अशीही संज्ञा देतात. याप्रमाणें चंचलवायु ही प्रकृति व त्यांत संचलेली जाणीव हा पुरुष होय. एकंदरींत मूळमाया असें म्हणताच प्रकृति व पुरुष असे दोन विभाग

एकरूपत्वानें दृष्टीच्या समोर येतात. अशा रीतीनें मूळमाया हें अव्यभिचारी मिश्रण तयार झाल्यावर पुनः दुसरें चलन मूळपुरुषाच्या आधारावर या मिश्रणांत मायागुणामुळें होतें. तेव्हां या दुरंगी जोडफळांतील एका विभागास ईश्वराची ( सृष्टयादि ) इच्छा ' एकोऽहं बहु स्यां प्रजायेय ' असें सोईकरितां नांव देतात व दुसऱ्या भागास गुणमयी असें नामाभिधान ठेवितात. एवंच संसक्त असलेले हे दोन्ही भाग पुढें स्पष्ट दशेला येणाऱ्या सर्व विकारांमध्यें असतातच हें विसरतां कामा नये. मूळमायेंत जाणीव विशेष असते म्हणून तिला ईश्वराचा चौथा देह असें म्हणतात. कारण देहाची ती बीजभूत होय. तिच्यांत दुसरें चलन अथवा स्फुरण झालें कीं, ईश्वराचा दुसरा देह म्हणजे गुणक्षोभिणी माया परिणत होते. मूळमायेच्या गुणसाम्यांतून सत्व रज तम हे त्रिगुण स्पष्ट दशेला येतात व मग तज्जन्य भूतें ही त्रिगुणात्मक रुपाचींच उमटतात.

ईश्वराचा हा दुसरा देह ज्यास अव्याकृति असें ही म्हणतात तो प्राधान्यतः भूतद्वयाचाच प्रतीतिरूप असतो. गुणांची अभिव्यक्ति झाल्यावर हाच देह भूतांना व्यक्त दशेला आणितो. मागें सांगितलें आहे कीं, मूळमायेंत पंचभूतें व त्रिगुण सूक्ष्मत्वानें आहेतच. स्वरूपांत अहंब्रह्मास्मि असें जें स्फुरण झालें तीच ईश्वराची परा वाणी होय. कारण ती प्रणवरूप होती. परा म्हणजेच जाणीव, केवळ साक्षित्वाची द्योतक, म्हणून मौन्यगर्भ. यावेळेस भूतांचें आविष्करण झालें नव्हतें. परंतु या ईश्वराच्या दुसऱ्या देहांत म्हणजे अव्याकृतींत भूतें स्पष्ट दशेला आलीं असल्यामुळें त्यांचा कर्दम हि नवव्या दशकांत दाखवावा लागला. हा कर्दम दाखवितांना ईश्वराची जी प्रणवरूप परावाणी ती च या दुसऱ्या देहांत ॐ काररूप औट मात्रांची कशी झाली तें दाखवून आकाशाचा कर्दम दाखविला. वायूचा कर्दम जाणीव नेणिवेचा ठाव असें सांगून दाखविला. पुढील तीन भूतें या देहांत विशेष व्यक्ततेला आलीं नसल्यामुळें केवळ त्यांचा उल्लेख च केला; हें वाचकांच्या लक्षांत आहे च. त्याचप्रमाणें गुणांचें रूप व प्रमाण दाखवून रजोगुण प्रत्यावृत्तिकारक कसा आहे व सृष्टीची घडामोड कशी करतो हें ही सांगितलें. जाणीवनेणीवमिश्रित वासनात्मक वायु म्हणजे लिंगदेह असें ध्वनित करून जाणीव-वासना च पुनर्जन्मास कशी कारणीभूत होते तें यथासांग दाखविलें. व शेवटीं ही जाणीव-वासना अंतःकरणाची एक वृत्ति आहे व तें अंतःकरण स्मरण विस्मरणीभूत असून पिण्डांत असतें असें दाखवून नवव्या दशकाचा उपसंहार तर केलाच, पण श्रोत्यांस ही अंतःकरणापर्यंत आणून सोडिलें व पुढील दशकाचें अवतरण ही केलें. हाच नवव्या व दहाव्या दशकांचा परस्पर अन्वय होय.

येथें वाचकांच्या निदर्शनास एक गोष्ट आणावयाची आहे ती ही कीं, साक्षात्कारी व प्रासादिक कवि किंवा संत आपलें विवेचन कांटेतोल करीत असतात. तराजूच्या दोन्ही पारड्यांत सारखें वजन झाल्याशिवाय माप सारखें म्हणजे ठीक

समजलें जात नाहीं. तद्वत् या दुरंगी जोडफळ मायेमध्यें दोन पालवे असल्यामुळें म्हणजे पुरुष अथवा जाणीव हा एक पालवा व चंचल व जड वायु हा दुसरा पालवा असल्यामुळें प्रतिपादनाच्या वेळीं दोन्ही पालव्यांत सारखेंच माप ठेवावें लागतें. तराजूंत दोन्ही पालवे निरनिराळे तयार असतात, पण या जोडफळांत हे दोन्ही पालवे एकोपजीवी असतात हें विसरतां कामा नये. यांतील एक पालवा चैतन्यमय तर दुसरा चंचल व जड हें एक नवलच. आठवा व नववा दशक यांत मायेचें च विवेचन झालें मग ती मूळ असो अथवा गुणमयी असो. परंतु त्यांतील ज्योतिर्मय पुरुषाचें संसरण दाखविण्यास श्रीसमर्थांस अवकाश च मिळाला नाहीं म्हणून च दहाव्या दशकात ते जोडफळांतील पहिल्या भागाचें संसरण कसें कसें झालें तें दाखविणार आहेत.

मूळ मायेंत म्हणजे अहंब्रह्मास्मि या प्रथम स्फुरणांत जाणीव विशेष होती म्हणून त्यावेळीं ब्रह्माचें अनुसंधान सामान्याधिकरणानें राहत च होतें. अहं ही च त्या वेळेस जाणीव झाली. पुढें या ईश्वरास मायेच्या योगानें जेव्हा सृष्ट्यादि इच्छा म्हणजे बहुस्यां प्रजायेय अशी झाली तेव्हां आपोआप च ब्रह्माचें विस्मरण झालें. तो च हा दुसरा कारण म्हणजे अज्ञान देह ईश्वराचा होय. पहिली जी विशेष जाणीव होती तिचेंच या दुसऱ्या देहात इच्छारूपानें संसरण झालें. ही जी सृष्ट्यादि इच्छा हिचेंच दुसरें नांव जगज्जोती होय. या इच्छा शक्तीमुळें ब्रह्माण्ड निर्माण झालें म्हणून ही जाणीव कारण रूपानें ब्रह्माण्डांत राहिली. पुढें त्रिगुणात्मक भूतांतील सत्व, रज, तम यांतील प्रत्येकाच्या अंशांच्या मिश्रणापासून ज्यास पंचीकरण असें म्हणतात, पिण्ड हें मायेचें कार्य अविद्यात्मक निर्माण झालें त्यात ही जाणीव कार्यरूपानें राहिली म्हणून सहसा अनुमानांत येऊं शकत नाहीं असें श्रीसमर्थांनीं नवव्या दशकात अगोदर च सांगून ठेविलें आहे, तें वाचकांच्या लक्षांत आहे च. पिंडात अंतःकरण व प्राण असे दोन भाग आहेत. यापैकीं पहिला भाग जाणीवरूप व दुसरा भाग मायारूप. 'अंतःकरण जाणीवरूप । प्राणवायु मायारूप । दोन्ही मिळोनि एक । अंतरात्मा म्हणती ॥ निखिल जाणीव ब्रह्मांश । जीव बोलिजे तयास । मायायोगें विशेष । अंतरात्मा तो ॥' सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, जगज्ज्योती ही संज्ञा सामान्यत्वानें पिण्डास व ब्रह्मांडास लागू पडते, पण पिंडांत तिला अंतरात्मा असें म्हणतात, एवढेंच. असो. अंतःकरण जाणीवरूप असल्यामुळें त्यांत ही जगज्जोती राहते इतकें लक्षांत आलें म्हणजे या दशकाच्या शीर्षकाचें रहस्य लक्षांत येतें व उलगडा ही तत्काल होतो; मग कुतर्कास अवकाशच मिळत नाहीं. वस्तुतः याचें विवरण श्रीसमर्थांनीं याच दशकाच्या नवव्या समासांत आपल्या प्रासादिक शब्दांत केलें आहे तें पुढें वाचकांच्या वाचण्यांत येईलच, असो.

मायेचें कार्य जें अंतःकरण त्यांत असलेली जाणीव एकदम लक्षांत येण्यास कठीण पडते म्हणून श्रीसमर्थांनीं दहाव्या दशकाच्या आरंभीं शिष्याच्या मुखांतून सर्वांचें अंतःकरण एक कीं वेगळालें असा प्रश्न वदविला. ज्या अर्थी एक जेवला असतां सर्व तृप्त होत नाहींत, प्रत्येकाच्या भावना निरनिराळ्या दिसतात, इतकेंच नव्हे तर एकाचें गुह्य दुसऱ्यास समजत नाहीं व प्राणिमात्रांमध्यें ( सर्प व मनुष्य यांमध्यें ) विरोध दिसतो त्या अर्थी सर्वांचें अंतःकरण एक नसावें असें वाटतें. श्रीसमर्थ उत्तर देतात कीं, सर्वांचें अंतःकरण एकच. अंतःकरण म्हणजे जाणीव, जाणता स्वभाव किंवा जाणती कला. हाच प्राणिमात्राच्या देहरक्षणाचा उपाय आहे. मनुष्याला जाणून च सर्प डसावयास येतो व मनुष्य सुद्धां हा सर्प आहे असें जाणून च पळतो. अशा रीतीनें जाणिवेला पाहिलें म्हणजे अंतःकरण एकच ठरतें. पहाणें, चाखणें, ऐकणें हीं सर्वांचीं एक च. तसें च अग्नि सर्वांना उष्ण व जल शीतल असें जर आहे, तर जीवमात्राची जाणीवकला एक च होत नाहीं का ? आतां आवड नावड जी होते ती देहस्वभावावर जाते, पण हें सुद्धां अंतःकरणामुळें च कळतें म्हणून जितकें जाणणें तितकें अंतःकरणाचें च असा निश्चय ठरतो. जीव जाणून च भक्ष्य खातात, भितात, पळतात इत्यादिकांवरून त्यांचा जाणता स्वभाव दिसत नाहीं कां ? अग्नीचा कण असला काय किंवा प्रलयाग्नि असला काय दोहोंचा मासला एकजिनसी च म्हणून च किड्यापासून तों ब्रह्मदेवापर्यंत सर्वांचें अंतःकरण एक च म्हणजे जाणीव एक च व हाच देहरक्षणाचा उपाय म्हणून विष्णु सत्वगुणानें पालन करतो. आपण आपणास जाणत नसतों म्हणून च आपला संहार होतो ही नेणीव च तमोगुण म्हणून रुद्र तमोगुणानें संहारतो. कांहीं जाणीव व कांहीं नेणीव हा रजोगुणाचा स्वभाव म्हणून जाणते नेणते प्राणी जन्मास येतात. जाणिवेनें सुख तर नेणिवेनें दुःख होतें म्हणून च जन्म झाल्यावर सुखदुःखें मनुष्यास अपरिहार्य होतात. जाणण्या नेणण्याच्या बुद्धीस या देहांत ब्रह्मा असें म्हणतात. याप्रमाणें उत्पत्ति स्थिति संहार प्रसंगानें श्रीसमर्थ बोलले व ' अंतःकरण एक ' असें या समासाचें योग्य नांव ठेविलें.

पहिल्या समासांत पिण्डांत जाणिवेची म्हणजे जगज्योतीची व्याप्ति कीटका-पासून तों ब्रह्मदेवापर्यंत दाखविली. तसेंच गुणमयी मायेपासून आविष्कृत झालेल्या सत्व रज तम यांची व्याप्ति ब्रह्माण्डांत उत्पत्ति स्थिति संहार या कार्यरूपानें दाखवून त्यांचें सुख दुःखात्मक फल हीं पिंडांत दाखविलें व ब्रह्मा विष्णु महेश, उत्पत्ति स्थिति संहार रूपानें पिंडांत कसे राहतात तें ही विशद केलें. जाणता नेणता विधि पिण्डांत च असतो म्हणूनच देहाची उत्पत्ति देहापासून कां उत्पन्न होते याचें ही कारण ध्वनित केलें. त्यामुळें श्रोत्याच्या मनांत शंका आली कीं, देवत्रयीला चतुर्भुजादि देहाकाराचें वर्णन पुराणांतून केलें आहे आणि वरील विवेचनावरून तर

उत्पत्ति स्थिति संहारासच आपण देवत्रय म्हणतों मग यांना देहाकार नाहीं च कीं काय ? हे तीन्ही देव गुणमयीपासून झाले व गुणमयी, मूलमायेपासून व्यक्त झाली तेव्हां मूळमायेस च कोणी केलें हें कळलें म्हणजे या देवांचे देह कसे झाले हें सहज लक्षांत येईल. माया भूतांची च वळलेली आहे. देव तदनंतरचे आहेत. शिवाय दुसरी स्वतंत्र माया दिसत नाहीं. ब्रह्म निर्गुण असल्यामुळें त्याच्याकडे मायेची उत्पत्ति येऊं शकत नाहीं. असो. दुसरी गोष्ट अशी कीं गुणमाया झाल्यावर मातृकांचा राव जो शब्द तो झाला असें आपण सांगितलेंत. मातृका तर देहाशिवाय रहात नाहींत व देहसुद्धां देहाशिवाय निर्माण होत नाहीं यावरून देवांना देह असले पाहिजेत. नसतीलच तर प्रत्यक्ष दिसत असलेले देह कशाचे बनलेले आहेत व ते प्रगट कसे झाले हें माझ्या मनास पटेल अशा तऱ्हेनें समजाऊन द्या अशी विनवणी श्रोत्यानें केली. तेव्हां श्रीसमर्थ उत्तर देतात कीं, शास्त्र व लोकघाटी यांचे अनेक निश्चय असतात; मग त्यांत एक निश्चय कसा दिसणार ? अनुमान करावें तर काळ व्यर्थ जातो. शास्त्रामध्यें उटकाच पूर्वपक्ष घेऊन त्याचें खंडन करून सिद्धांत ठरवितात व याप्रमाणें शहाणा व मूर्ख यांना एकाच वचनानें समजावितात; म्हणून शास्त्राची भीड धरिली तर ही गुंतागुंत उकलणार नाहीं व प्रत्ययानें उकलावी तर शास्त्रभेद रहातो अशी मोठीच पंचाईत पडते; तथापि शास्त्राचें रक्षण करूनच आम्ही कांहीं बोलणार आहोंत तिकडे अगत्यानें लक्ष द्यावें. या समासांत देहोत्पत्तीची शंका घेतली म्हणून या समासास देहआशंका असें नांव दिलें.

हा दशक जगज्जोतीचा आहे व देहोत्पत्ति तर जडत्वाची आहे तेव्हां या समासाच्या समावेशाबद्दल श्रोत्यास शंका येणें साहजिकच आहे; परंतु श्रीसमर्थ या शंकेचें शोधन तिसऱ्या समासांत करणार असल्यामुळें दोन्ही समासांचें प्रयोजन एकदमच दाखविणें इष्ट वाटतें.

निराभास ब्रह्माच्या ठिकाणीं मूळमाया अष्टधा झाली व वायुस्वरूप प्रकृति असेंही सांगितलें नंतर नवव्या दशकांत त्रिगुणांचीं रूपें व भूतांचा कर्दम दाखविला. म्हणजे जोड फळांतील चंचल व जड याचाच विस्तार सांगितला. आतां या समासांत जाणिवेचा ( पुरुषाचा ) विवर्त दाखविला जात आहे. आकाशापासून भौतिक वायूचें स्वरूप न दाखवितां त्यास वायुदेव अशी संज्ञा ते देत आहेत. त्यापासून अग्निदेव झाला व त्या पासून नारायणाचें स्वरूप जी आपो देवता ती झाली व नंतर बीजावर पृथ्वीचें रूप झालें. पण या पृथ्वीमध्यें सुद्धां वृक्ष, काष्ठ व मृत्तिका यांच्या मूर्तीच्या योगानें देवांच्या ज्या नाना प्रचीति येतात त्या सर्व देवांस एका वायूमध्यें च थारा मिळतो. अशा रीतीनें देव, देवता, दैवतें वगैरे तिन्ही लिंगांच्या नामांचीं भूतें पृथ्वीमध्यें देशपरत्वें असंख्यात आहेत. परंतु

हीं सर्व वायुस्वरूप असल्यामुळें प्रसंगाप्रमाणें तीं देह धारण करतात किंवा गुप्तरूपानें ही विचरतात, याचें कारण वायूमधील जगज्जोती होय. हिला च जाणीव कळा असें म्हणतात व पुनर्जन्मास कारणीभूत असणारी जी अंतःकरणाची जाणीव-वासना वृत्ति तीही हीच होय. वायु ( प्रकृति ) व जगज्जोती ( पुरुष ) या दोहोंचेही अंश प्रत्येक भूतामध्यें कसे आहेत ते यापुढें श्रीसमर्थ दाखवीत आहेत.

वायु = भौतिक वारा ( प्रकृति अंश ). जगज्जोती व तिच्या देवदेवतांच्या मूर्ति ( पुरुष अंश ).

तेज = ऊष्ण व शीतल भौतिक प्रकाश ( प्रकृति अंश ). भानु, अग्नि व विद्युत् ( पुरुष अंश ). आप अमृत शीतलाचा प्रकार. चंद्र, तारा व दीरय ( पुरुष अंश ).

आप = भौतिक जल ( प्रकृति अंश ) अमृत ( पुरुष अंश ).

पृथ्वी = पाषाण, मृत्तिका ( प्रकृति अंश ). सुवर्ण, परीस, रत्नें ( पुरुष अंश )

पहिल्या समासात अंतःकरण एक असून त्यांत जगज्जोती कशी असते तें सांगितलें. पण त्या बरोबर च गुणमयी पासून व्यक्त झालेल्या निर्गुणाचें जगज्जोतीमुळें उत्पत्तिस्थितिसंहाररूपी कार्य पिंडांत कसें होत असतें तें दाखवून त्यास च देवनयी म्हणतात असें सांगून या देवाच्या देहाविषयीं श्रोत्याच्या मनांत दुसऱ्या समासात आशंका उत्पन्न केली. ही गोष्ट पिण्डाबद्दल झाली. पण ब्रह्माडाची काय व्यवस्था ? म्हणून तिसऱ्या समासात या भूतांमध्येंही पुरुष अंश अर्थात् जगज्जोती कशी ओवली गेली आहे व वायुदेवामध्यें जगज्जोती असल्यामुळें वायुस्वरूप देवता आपल्या इच्छेप्रमाणें देह कसे धारण करतात व भूतामध्यें ही जगज्जोती स्वगत कशी भरलेली आहे याचें सायत प्रतिपादन केलें. अग्नि स्वतः अरूप असताही उपाधीमुळें रूपवान् होतो हें लक्ष्यात आलें म्हणजे दैवत देह कसे धारण करतात तें पूर्णपणे ध्यानात येतें. म्हणून च वायुस्वरूपानें कधीं गुप्त, तर देहधारणेमुळें कधीं प्रगट, असें दाखवून देहआशंकेचें शोधन तर केलें च, पण जगज्जोती ब्रह्मांडात कशी संचलेली आहे तेंही स्पष्ट केलें, म्हणून या समासास देहआशंकाशोधन असें यथार्थ नांव दिलें याप्रमाणें ईश्वराचा विराट् देह जो ब्रह्मांड व पिंडाचा स्थूल देह या दोहोंत जगज्जोती कशी साचलेली आहे तें स्पष्ट दाखविलें.

दुरगी जोडफलाचें प्रतिपादन दोन्ही भागानीं करावें लागतें. प्रकृति अंशात म्हणजे स्थूल पिंडब्रह्माण्डात जगज्योती कशी असते तें दाखविलें. आता पुरुष अंशानें जगज्जोतीचें कार्य दाखवावयाचें असल्यामुळें श्रीसमर्थांना पुनः कथानुसंधान घ्यावें लागत आहे. पण असें करताना श्रीसमर्थ वाजवीपेक्षा एकही पायरी जास्त देत नाहींत. तिसऱ्या समासात असें अवतरण देताना वायुस्वरूप अष्टधाप्रकृतीपर्यंत येऊन पुढें भूताचें ज्योतिर्मयत्व दाखविलें व वायूमध्यें जगज्योतीची आविष्कृति पूर्णत्वानें दाखविली.

आतां चौथ्या समासांत मूळमायेंतील जाणीव च सृष्ट्यादि इच्छेंत कशी परिणत झाली तें दाखवीत आहेत. मागील समासापेक्षां दृष्टिकोन बदलला असल्यामुळें विशेष गुंतागुंत होऊं नये म्हणून श्रीसमर्थ पुनः कथानुसंधान देत आहेत तें मागच्या समासापेक्षां निराळें च आहे. अष्टधाप्रकृतिरूप मूळमाया सांगून ती 'भूतीं त्रिगुणीं कालवली' हें विशेष सांगितलें. नंतर वायूमध्यें जाणिवेचें जें रूप आहे तीच सृष्ट्यादि इच्छा असें सांगितलें. तिसऱ्या समासांत आकाशापासून वायुदेव झाला असें सांगितलें तर आतां ती च माया त्रिगुणांनीं कालविली असें सांगितलें; म्हणजे भूतांचे जनक जे त्रिगुण त्यांमध्यें जगज्ज्योती कशी आहे तें दाखविण्याकरितांच वायूमधील जी जाणीव ती च इच्छा असें दाखविलें. यावरून दोन्हीं अवतरणें अप्रयोजक तर नाहींत च, पण साखळी जुळविण्याकरितां अशीं कथानुसंधानें निरनिराळ्या दृष्टींनीं विचार करीत असतांना याचयांचा घोंटाळा होऊं नये म्हणून देणें अत्यंतावश्यक असतें. गायनांत राग सुरु करण्यापूर्वी प्रथम त्या रागाचे सुर म्हणणें जसें आवश्यक असतें तद्वत् कथानुसंधानाची गोष्ट होय. कारण जरी सुर सात च असले तरी त्यांत कोमल तीव्र भेदामुळें फरक पडतो, त्याचप्रमाणें दृष्टिभेदामुळें कथानुसंधानाचें प्रयोजन आवश्यक होतें. असो.

वर सांगितल्याप्रमाणें जाणिवेचा विवर्त इच्छारूप झाला तर त्याचा आरोप ब्रह्मावर कसा होणार? जाणीव म्हणजे ईश्वर. त्याच्यावर जो विवर्त होईल त्याचा लय सुद्धां त्याच्यांत च होईल व तो जशाचा तसा च राहील. अशी जर वस्तुस्थिति आहे तर ब्रह्मावर तो आरोप होऊं शकत नाहीं. विकार नाहींसे झाल्यावर निर्विकार जसेंच्या तसें च राहतें.

श्रोत्यानें प्रचीति आणून द्या असें विज्ञापन केलें होतें म्हणून श्रीसमर्थ म्हणतात कीं, प्रत्यय जाणून जर निश्चय धरला तर अनुभवाचा जय होईल. आतां तो प्रत्यय पहा. माया म्हणजे समीर, त्यांत जाणीव तो ईश्वर तोच आपल्या इच्छारूपी चलनानें गूढ असलेल्या गुणांचा क्षोभ करून आपण स्वतःच गुणास आला म्हणजे त्याचाच त्रिगुण भेद होऊन त्याठिकाणीं ब्रह्मा विष्णु महेश उपजले. तात्पर्य *ईश्वरानें च देवत्रयाचे देह धारण केले. या प्रमाणें ही पुरुष अंशाची उत्पत्ति* दाखविली. कारण त्रिगुणांचें जड स्वरूप नवव्या दशकांत अगोदर निरूपिलें आहे. वस्तुतः त्रिगुण च त्रिगुणांत कालवले असल्यामुळें वेगळाले होऊं शकत नाहींत. पण त्यांचें कमीजास्त प्रमाण भासत असल्यामुळें तसें बोलावें लागतें इतकेंच. म्हणून च जाणता विष्णु, जाणता नेणता ब्रह्मा व नेणता रुद्र असें आम्ही म्हणतों. वायुस्वरूप मायेमध्यें हे तिन्ही देव वायुस्वरूपानें (अदृश्य) होतेच, पण पुढें त्यांनीं देह धारण केले. आपण पहातों कीं, मनुष्यें सुद्धां गुप्त प्रगट होतात; भूतें खोबरें खारका टाकून खुळखुळ चालतात; मग देवांमध्यें चढतें सामर्थ्य कां नसें

नसावें? याप्रमाणें हरिहरांनीं देह धारण केले व स्वगत इच्छाशक्तीनें पुनही निर्माण केले. अंतरांत स्त्रिया कल्पिताच त्याही निर्माण झाल्या, पण त्यांच्यापासून प्रजा मात्र निर्माण झाली नाहीं. कारण रजोगुणाची जीवसृष्टि निर्माण करण्याचें काम जाणत्या नेणत्या ब्रह्मदेवाकडेस च येतें व त्यानें निर्माण केलेली सृष्टि जोडण्याची च असते. जशी मनुष्यांची जादूगिरी किंवा राक्षसांची वोडंबरी, त्यापेक्षा ही ब्रह्मदेवाची सृष्टिविद्या विशेष प्रकारची असते पुढें शरीरापासून शरीरें निर्माण झालीं. याप्रमाणें यथान्वयें झालेली सृष्टि श्रोत्यांच्या प्रत्ययाला आणून दिल्यामुळें शंकेचें निरसन झालें ईश्वराची इच्छा हीच जगज्जोती. तिच्या आधारें ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न कशी केली तें दाखविलें. उत्पत्तिबरोबर स्थिति ही असतेच म्हणून जाणजाणों अर्थात् जगज्जोतीरूपानें विष्णूनें पालन केलें आपल्या स्वरूपाच्या नेणपणामुळें आपल्यास मृत्यु येतो म्हणून नेणीवरूपी रुद्र जेव्हां शरीरानें सवळतो तेव्हां सर्व जीवसृष्टि आटाळते याप्रमाणें उत्पत्तिस्थितिसंहाराचा विचार सांगितला. झालेल्याचा कल्पांतीं नाश होतो च म्हणून प्रळयाचें निरूपण पुढल्या समासांत श्रीसमर्थ करणार आहेत असें दर्शवून हा समास पूर्ण केला.

जाणीव म्हणजे ईश्वर. ही जाणीव च इच्छारूप होऊन जगज्जोतीरूप होते व मग ती तीन देवांत वाटली जाते. पैकीं दोन देवांची मानवसृष्टी झाली व ब्रह्मदेवाची मात्र जीवसृष्टि चतुर्विध होऊन जोडण्यानें प्रगट झाली तींत हीही जगज्जोती च वाटली गेली. याप्रमाणें उत्पत्ति स्थितिसंहार हाही जगज्जोती-मूलक आहे असें बीजरूपानें दाखविलें म्हणून या समासास बीजलक्षण असें नांव दिलें. दुसरी गोष्ट अशी कीं वस्तुत निर्गुणानंतर निरंतकरण व नंतर पंचीकरण झाल्याशिवाय देहाची पूर्ण उत्पत्ति दाखविता च येत नाहीं. पण उत्पत्तींत सुद्धां देहाचें बीज असतें च, म्हणून या समासास बीजलक्षण असें नांव दिलें.

या समासांत ब्रह्मदेवानें जीवसृष्टि केली असें दाखविलें व त्याची उत्पत्ति ईश्वरापासून झाली म्हणजे ईश्वरत्व तिन्ही देवांचा देहधर्तो झाला असें स्पष्ट केलें व मूळ मायेचें अर्धनारीनटेश्वरत्व जीवसृष्टींत कसें असतें तेंही पूर्णपणें दाखविलें. उत्पत्तीबरोबरच स्थिति व संहार, निर्गुण निर्गुणांत कालवल्यामुळें कसे होतात तेंही दाखविलें. पण संहाराचें विस्तृत स्वरूप दाखविता आलें नाहीं म्हणून श्रीसमर्थ पांचव्या समासांत तें दाखवीत आहेत.

देह म्हटला कीं त्यास निद्रा येतेच व मरणही आवश्यक असतें, असें पिंडांत दिसतें. तीच स्थिति ब्रह्मांडांतील या तीन देवांची त्यानाही निद्रा व आयुष्यमर्यादा असतेच याप्रमाणें पिंडांत दोन व ब्रह्मांडांत दोन असे चार प्रलय होतात, पण जीवन्मुक्त विवेकानें अखंड जागृत असल्यामुळें मूलमायेचा च तो लय करीत असतो म्हणून त्यास पांचवा विवेकप्रलय असें म्हणतात. निद्रा आली कीं जागृतीचे

सर्व व्यवहार बंद पडतात म्हणून जागृतीच्या क्षयाला निद्राप्रलय म्हणतात. तद्वत् या तीन देवांना जेव्हां निद्रा येते त्या वेळेस त्यांच्या जागृतीचे म्हणजे उत्पत्तीचे व्यापार बंद होतात, इतकेंच नव्हे तर प्राण्यांचे सूक्ष्मांश वायुचक्रांत लीन होतात, यासच ब्रह्मांडाचा निद्राप्रलय म्हणतात. पुढें कित्येक काळ लोटल्यावर त्यांना जागृति येते व मग ब्रह्मदेव विसंचलेल्या जीवांस मागुतें संचतो. पिंडांत रोगामुळें किंवा अन्य आकस्मित अपघातामुळें जेव्हां पंचप्राण या देहास सोडून जातात तेव्हां हें शरीर शव होऊन पडतें, कारण अंतःकरण व प्राण त्यांत रहात नाहींत; यास मृत्युप्रलय असें म्हणतात. तद्वत् ब्रह्मदेवाच्या आयुष्याची सीमा झाली कीं, त्यास ब्रह्मांडप्रलय असें म्हणतात. त्या वेळीं शंभर वर्षे अनावृष्टि होते; सूर्य बारा कलांनीं तापूं लागतात व ती आग पाताळतळापर्यंत पोहोंचल्यावर शेष विषाग्निसि ओकूं लागतो. याप्रमाणें दोन्ही बाजूंनीं मारा झाल्यावर मेरु पर्वत घसरतो व मग त्यावर असलेले वैकुंठकैलासादि लोक राख होऊन जातात. देवता मात्र वायुचक्रात राहतात. मग पर्जन्य शुंडाधारांनीं सर्व ब्रह्मांड जलमय करून सोडतो. जलास अग्नि शोषण करतो तेव्हां देव आपल्या पूर्वरूपात मिळून जातात. नंतर वारा सैरावैरा धावूं लागतो व जसा धूर आकाशांत वितळतो त्याप्रमाणें वायु परब्रह्मांत वितळतो. मूळमाया वायुस्वरुप असा सिद्धांत असल्यामुळें तिचा लय ब्रह्मांतच व्हावयाचा, हाच या ग्रंथराजाचा विशेष होय. मूळमायेंत जाणीव ( पुरुष ) व वायु अर्धा प्रकृत्यात्मक असतो, तो वितळला कीं, ईश्वर ( जाणीव ) सूक्ष्मभूतें व त्रिगुण यास सोडून देतो व आपलें अधिष्ठान जें निश्चलब्रह्म त्यांत समरस होतो. अर्थात् जाणीवरूपी पुरुषांत जी सृष्ट्यादि इच्छारूपी जगज्जोती असते ती निवते व शुद्ध सारांश जाणीव म्हणजेच स्वरूपस्थिति उरते. याप्रमाणें प्रकृतीचा निरास झाल्यावर बोलणें च खुंटतें. एवढ्याच करितां प्रकृति असतांना च जर विवेक केला तर च तो विवेकप्रलय होतो. एकंदरींत या समासाचें पंच प्रलयनिरूपण हें नांव योग्यच दिलें गेलें.

या दशकाच्या शीर्षकाचें नांव जगज्जोती असें आहे. पहिल्या समासांत अंत:करण एक म्हणजे जाणती कला सर्वांत एक असें दाखविलें, ती च जगज्जोती होय. अंत:करण व मातृका देहांत रहातात व देहाशिवाय देह निर्माण होत नाहीं. शिवाय अंतरात्म्याचे अंगभूत त्रिगुण व त्यांच्या तीन देवता पिंडांत आहेत कशा तें दुसऱ्या समासांत दाखवून या देवांना देह च नाहींत असें वाटून देहाची आंशका थोड्यानें घेतली व तिसऱ्या समासांत तर वायूमध्यें ( प्रकृतीमध्यें ) ही जगज्जोती असल्यामुळें देवांना आपल्या इच्छेप्रमाणें देह कसे धारण करतां येतात तें दाखविलें. ब्रह्मांडांत ही जगज्जोती कशी संचलेली आहे तें भूतांचें पृथक्करण करून स्पष्ट दाखविलें व चौथ्या समासांत तर जाणीव च सृष्ट्यादि इच्छेंत कशी परिणत झाली हें दाखवून अद्वैतसिद्धांतास बाध येऊं न देता

ईश्वर च निदेवरूप कसा झाला, म्हणजे ही जाणीवरूपी जगज्जोती या तिघात कशी वाटली गेली, तें दाखवून सृष्टीच्या उत्पत्तीचें कार्य रजोगुणी ब्रह्मदेवाकडे का व कसें येतें तें प्रचीतीपूर्वक वाचकास पटविलें. अर्थात् ही जगज्जोती च तिन्ही देवात वाटली गेली असल्यामुळें हे तिन्ही देवस्वरूपें उत्पत्ति स्थिति संहाराचें कार्य कसें करूं शकतात हेंही निदर्शनास आणिलें म्हणजे पर्यायानें ही जगज्जोती च उत्पत्ति संहारात एकरसानें कशी संचलेली आहे याचें मार्मिक पण प्रचीतिपूर्वक विवेचन केलें. उत्पत्ति व स्थितींत ही जगज्जोती मूर्तिमत अनुमानांत येऊं शकते. पण संहार झाल्यावर ही जगज्जोती कशी निवते याचें विवेचन करण्याकरिताच पाचव्या समासात पंचप्रळयांचें निरूपण श्रीसमर्थांनीं केलें तें अपूर्व च आहे. पुरुषात इच्छारूपी जगज्जोती जी असते ती संहार झाल्यावर निवते अर्थात् लीन होते म्हणजे पुन मायेचा उद्भव होण्याचा संभव राहतो च, म्हणून च प्रकृति असताना च जो भक्त विवेकानें च तिचा लय करीत असतो त्याचा च अंतरात्मा ( पुरुष ) मायेंत असलेलीं सूक्ष्म भूतें व त्रिगुण यांना सोडून देऊन शुद्ध साराश म्हणजे स्वरूप स्थितीनें च उरतो. त्याची च जगज्जोती समूल निवते म्हणजे चंचलत्व जाऊन तो निश्चल ब्रह्म होतो. हा च या दशकातील पूर्वार्धाचा समन्वय होय.

याप्रमाणें जगज्जोतीमूलक जो त्रिगुणांचा उत्पत्तिस्थितिसंहार त्याचा विचार सांगितला. जाणिवेवर हा भ्रम अखंड होत जात असला तरी कल्पांतीं त्यास बाध आहे च असेंही दाखविलें. परंतु आदिमध्यअवसानीं ब्रह्म निर्विकारत्वानें संचलेलें च असतें. मध्यें च हा जो भ्रम भासतो तो नाहींसा होतो. परतु विवेकी अथवा जीवन्मुक्त सारासार विचारामुळें आधीं च जाणत असतो म्हणून तो भ्रमांत नसतो हें च महत्पुरुषाचें लक्षण होय. एक परब्रह्माशिवाय जें काहीं सर्व भासतें तें भ्रमरूपक च त्रिगुण, पचभूतें, मी, तू, ईश्वरभाव उपासना इत्यादि सर्व च भ्रमरूप. स्वरूपस्थिति काय ती एक संचलेली राहते असा हा जो भ्रम त्याचें स्वरूप श्रीसमर्थ दाखवीत आहेत. उन्मत्त द्रव्य सेवनानें अनेक भासणें, भूतानें झडपणें, विसरणें, स्वप्नदु खानें घाबरें होणें, अपशकुनानें दुश्चित होणें, एकाचें एक दिसणें व ऐकणें, प्रचीतीशिवाय ज्ञान सांगणें, ज्ञानाशिवाय योग, उगा च शरीरभोग, मृतमनुष्य स्वप्नात येणें, या जन्मींचें पुढील जन्मीं पावणें, इत्यादि सर्व भ्रम च होय. सर्व विश्व च जर स्वभावानें भ्रमरूप आहे तर भ्रमाचें वर्णन कसें करावयाचें ? इतकी च गोष्ट खरी कीं, हा भ्रम अज्ञानी जनात पैसावतो जीवन्मुक्तास नसतो च हें पूर्वी च सांगून ठेविलें आहे. ज्ञान्याला संसार नसतो च पण गतज्ञान्याचे चमत्कार होतात हाही भ्रम च. यावर श्रोता विचारतो का, अवतारी लोकाची समाधि पूजिली असता प्रचीति येते, इतकें च नव्हे तर, त्याचें उदंड सामर्थ्य चालू राहतें तें का ? ते वासना घेऊन येतात कीं काय ? असें अवतरण करून भ्रमाची कथा ते संपवितात.

पूर्वार्धात पिण्ड व ब्रह्माण्ड यांत जगज्जोतीची व्याप्ति कशी आहे तें दाखविलें. पण ही जगज्जोती कल्पांतीं निवतेच म्हणजे लीनावस्थेत राहतेच, केवळ जीवन्मुक्ताची मात्र नि:शेष नाहींशी होते. ज्ञान्याला जिवंत असतांना संसार नसतोच, मग तो मेल्यावर त्याची समाधि पूजिली असतां प्रचीति कां येते असा प्रश्न श्रोत्यानें विचारला. एक ब्रह्माशिवाय सर्व भ्रमच, मग प्रचीति या याची ? भ्रमाच्या मूळाशीं कोणतें तत्व असावें किंवा भ्रमाचें मूळ च काय ? असा श्रोत्याचा आशय जाणून च श्रीसमर्थ उत्तर देतात कीं, हें सर्व काम भावनेचें च आहे म्हणजे कल्पनेचें. कल्पना हाच भ्रम हा भ्रम नरदेहात स्वभावत च असतो. जाणणें नेणणें मिश्रित झालें । त्यासी रजोगुण ऐसें म्हणितलें । त्याचिये गुणें नरदेहा आल। विपरीत ज्ञान ॥ ( श. व्य स. ५ ) हाच भ्रम म्हणून अशा तऱ्हेनें अंगभूत झालेला भ्रम घालविला पाहिजे, एवढ्या करिता श्री समर्थ उपाय दाखवीत आहेत.

सत वासना धरुन येत च नाहींत, पण भाविकांना ते दिसतात व भेटतात याला काय म्हणावें ? तर हें सर्व त्याच्या भावनेचें सामर्थ्य. दृढ भावना अनन्य झाली कीं, ती फलद्रूप होते च असा नियम आहे, मग व्यर्थ कुतर्क का करावेत ? ज्याचा आपणास दृढ निदिध्यास असतो तें च आपणांस स्वप्नात दिसतें तें का ? त्या वेळेस का तें प्रत्यक्ष आलेलें असतें ? खरें आठवलें असें म्हणावें, तर प्रत्यक्ष द्रव्य का दिसतें ? कारण आठवणींत वस्तु प्रत्यक्ष दिसत नाहीं. तर मग हें सर्व कल्पनेचें च कार्य असें च ठरतें. याचप्रमाणें वरील गोष्ट होय. ज्ञात्याना जन्म कल्पू नका व उमजलें नाहीं तर विचार करा. आतां त्याचें उदड सामर्थ्य चालतें. का, तर ते पुण्यमार्गानें चालले म्हणून. तो पुण्यमार्ग कोणता ? त्याचें वर्म काय ? तें श्रीसमर्थ मोठ्या मार्मिकपणानें सांगत आहेत. सामर्थ्य वाढवावयास साधनें आहेत. पुरश्चरणें, तीर्थयात्रा, वैराग्य, भक्तिमार्ग वगैरे. पण दुसरें साधन म्हणजे ज्ञानमार्ग. वस्तवर जर आपला निश्चय बसला तर सामर्थ्य चढतें च. पण यात एक भयंकर व्यत्यय येतो. निर्गुणाचें ज्ञान शाब्दिक झालें, तर तो सगुणाची उपासना सोडतो व मग भक्ति तर नाहीं च पण खरें ज्ञानही नाहींच, उलट अनुमान मात्र वळावतो मग तो ज्ञाता दोन्हीकडून नागवला जातो. भक्तिमार्गांत सुद्धा कामना आड येते. कामनेनें फळ मिळतें, पण भक्त भगवताला अतरतो. एवढ्याकरिता निष्काम भजन करावें, पण तें सुद्धा सामर्थ्याशिवाय होत नाहीं. भक्त देवापासून विभक्त राहिला नाहीं कीं, देव आपणच भक्ताच्या मनाचें करतो व हीं दोन्हीं सामर्थ्ये एकवटलीं कीं, तो काळासही आटपत नाहीं. याप्रमाणें निष्काम भजन व त्यात विशेष भर ब्रह्मज्ञानाची, मग त्याची तुलना त्रिभुवनात कोणाशीं होऊं शकत नाहीं. पण येथें बुद्धीचा प्रकाशच कामास येतो, इतरांचें काम नाहीं. निरूपण ( निर्गुणाचें विवेचन ) व सगुणाचें भजन जेथें होत असेल

तेथें प्राणिमात्र तन्मय होतात. जेथें निश्चय व्यभिचारी होणार नाहीं तेथें परमार्थ बुडणार नाहीं हें त्यास व मग निश्चयाचें समाधानांतही अंतर पडणार नाहीं. भक्त अनन्य झाला कीं भगवंत त्यास बुद्धि देतोच; कारण अनन्य भक्तीचा हा निसर्गदत्त हक्कच असतो. मग सारासार विचार, न्याय अन्याय, शोधण्यांत त्याच्या बुद्धीस पालट कसा होईल ? श्रीसमर्थ म्हणतात, अशा तऱ्हेनें अनन्य भजन व त्यास महाज्ञानाची जोड व वर प्रत्ययज्ञानाचें समाधान असों खरोखरच या जगांत दुर्लभ असतात.

एकाचें एक दिसणें हा भ्रम, नरदेह रजोगुणी असल्यामुळें त्यांत तो असावयाचा च. हा मधें च भासणारा भ्रम घालविला च पाहिजे. त्याशिवाय परमार्थ म्हणजे स्वरूपस्थिति प्राप्त च होणार नाहीं. म्हणून आपलें सामर्थ्य वाढविलें पाहिजे. अर्थात् रजोगुण कमी करून सत्वगुणात गेलें पाहिजे. त्यास उपाय दोन च, एक भक्तिमार्ग व दुसरा ज्ञानमार्ग. या दोन्ही उपायांस बुद्धीचा प्रकाश म्हणजे जाणीव च कामाची होय. कारण भ्रम अथवा अज्ञान जाणिवेवर च राहतें व जाणीव च त्यास जाणते, पण ही जाणीव म्हणजे जगज्जोती व तो च अंतरात्मा. अंतरात्मा सगुण रूपाचा आहे म्हणून त्याचें च भजन येथें सांगितलें. तें निष्काम झालें कीं, हें सगुण भजन निर्गुणावर म्हणजे निश्चल ब्रह्मावर राहतें अशी जाणीव भक्ताला होते, मग ईश्वरभाव ही भ्रम च असें त्यास प्रचीतीनें वाटतें. पण या ज्ञानानें जर प्रत्ययाच्या समाधानात अंतर पडलें नाहीं तर हें वस्तूचें खरें ज्ञान होय असा त्याला प्रत्यय येतो. निर्गुणाचें ज्ञान होण्यास सगुणाचें निष्काम भजन च उपयोगाचें व त्यानें च सामर्थ्य वाढतें म्हणून या समासात सगुणाचें म्हणजे अंतरात्म्याचें भजन सांगितलें व या समासास सगुणभजन असें योग्य नांव दिलें.

सगुण निष्काम भजनाची सिद्धि झाल्यावर स्वरूपस्थितीला यथार्थ जाणण्यास आत्मप्रचीती इतकें दुसरें प्रमाण च नाहीं, म्हणून च श्रीसमर्थांचा भर आत्मप्रचीतीवर विशेष. पण लोक व शास्त्रधारी रक्षून च श्रीसमर्थ प्रचीतीचें स्वरूप पुढील समासांत दाखवीत आहेत.

व्यवहारांत सुद्धां, घर, शास्त्र, घोडा, रत्नें, सुवर्ण इत्यादिक आपणांस घ्यावयाचीं असल्यास आपण त्यांस प्रथम पारखून च घेतों. पारखलें नाहीं तर फसवणूक होते. शोधून पाहिल्याशिवाय कोणतें च काम सुखावह होत नाहीं म्हणून भल्यानें अनुमानाचीं कार्यें कधींही करूं नयेत; शोधल्याशिवाय अन्नवस्त्र घेतलें, चोरांची संगति धरिली, खोट्याचा विश्वास केला, तर प्राणी प्राणास मुकतो. ती च गति परमार्थाची होय. प्रचीतीविण ज्ञानानें समाधान होत नाहीं, इतकें च नव्हे तर अनुमानानें अशा मनुष्यानें एखाद्या नेणत्या प्राण्यास उपदेश केल्यास दुखणाइताला

झांकून मारल्याप्रमाणें होईल. याच्या उलट जाणत्या वैद्याला जर दुखणाइतानें आपला रोग सांगितला नाहीं, तर तोही आत्महत्याराच. ब्रह्मांड कोणी केलें, तें कशाचें झालें, आपण कोण, परमेश्वर कोणता, व मुख्य कर्ता कोण हे प्रचीतीनें कळून जर आत्मनिवेदन झालें तर च जन्ममृत्युयातना चुकतील व यांबद्दल जर मन संशययुक्त राहिलें तर केलेला सर्व परमार्थ बुडाला च असें समजावें. हें च परमार्थाचें वर्म होय. यास खोटें म्हणेल तो अधम व खोटें मानील तो अधमाधम. आतां बोलण्याची सीमा झाली. परमात्म्याला जाणलें च नाहीं, तर तो कळणार च नाहीं. अर्थात् अज्ञानांत जर आपण राहिलों तर परमात्मा कळणार च नाहीं हें खोटें नव्हे. सर्वोत्तमा तूं हें जाणतो च आहेस. माझ्या उपासनेची ही च थोरवी आहे कीं, प्रत्ययाचें ज्ञान सांगावें. प्रचीतीशिवाय ज्ञान जर मी सांगूं लागलों तर त्याचा दोष प्रभूला लागेल म्हणून मुख्य वस्तूस ओळखिलें पाहिजे; व मायोद्भवाचें मूळ शोधिलें पाहिजे, असें जे मी म्हणतों तें सत्य च आहे. लोक व शास्त्रधारी या दोहोंचें रक्षण करून च प्रचीतीनें हें थोडें मी उकलून दावीन व श्रोत्यांस समजण्याकरितां बोलिलेलें च निरूपण मी पुनः करीत आहे तें श्रोत्यांनीं सावधान होऊन ऐकावें. या प्रमाणें या आठव्या समासांत प्रचीतीचें निरूपण केलें म्हणून या समासास प्रचीतिनिरूपण असें नांव दिलें.

पांचव्या समासांत जगज्जोती निमाली म्हणून स्वरूपस्थिति उरली असें सांगितलें; पण या स्थितीशिवाय जें कांहीं दिसतें तें सर्व भ्रमरूप असें सहाव्या समासांत सांगितलें. हा भ्रम अज्ञानी जीवांत च पैसावतो म्हणून ज्ञानी होण्याची खटपट करावी असें सातव्यांत सांगितलें. यास दोन च मार्ग, एक निष्काम सगुणभजन व दुसरें निर्गुणज्ञान. आतां भक्ति निष्काम झाली कीं नाहीं व तसें च निर्गुण ज्ञान प्रचीतिपूर्वक झालें कीं नाहीं हें पटण्यास प्रचीतीच्या समाधानाची कसोटी लागते. यांत यत्किंचितही अनुमान राहिलें तर परमार्थ बुडाला च. प्रचीतीशिवाय समाधान मिळावयाचें च नाहीं व स्वरूपस्थितीची प्राप्तिही होणार नाहीं हें समर्थांनीं मोठ्या कळकळीनें आठव्या समासांत श्रोत्याच्या नजरेस आणून दिलें आहे. आपण कोण, मूळकर्ता कोण, मायोद्भवाचें मूळ काय हें उमजलें म्हणजे आत्मनिवेदन यथार्थ झालें असें समजावें. असें सांगून मूळप्रश्नाचा म्हणजे मायोद्भवाच्या मुळाचा प्रश्न श्रीसमर्थ उकलीत आहेत.

या ठिकाणीं मनःपूर्वक विचार न केल्यास सहा ते आठ समासांचा समावेश जगज्जोतीच्या दशकांत कसा झाला असा संशय वाचकांच्या मनांत येणें साहजिक आहे. परंतु जीवाचें विपरीत ज्ञान हाच भ्रम. वस्तुतः जीव हा ब्रह्मांश आहे, पण तोच मायागुणामुळें अंतरात्मा होतो असें वर दाखविलें च आहे. अंतरात्माच प्रवर्तक हें सर्वांस मान्य, अंतरात्माच जगज्जोती असेंही ते दाखवितात. मग

तेथें प्राणिमात्र तन्मय होतात. जेथें निश्चय व्यभिचारी होणार नाहीं तेथें परमार्थ बुडणार नाहीं हें त्यास व मग निश्चयाचें समाधानांतही अंतर पडणार नाहीं. भक्त अनन्य झाला कीं भगवंत त्यास बुद्धि देतोच; कारण अनन्य भक्तीचा हा निसर्गदत्त हक्कच असतो. मग सारासार विचार, न्याय अन्याय, शोधण्यांत त्याच्या बुद्धीस पालट कसा होईल ? श्रीसमर्थ म्हणतात, अशा तऱ्हेनें अनन्य भजन व त्यास ब्रह्मज्ञानाची जोड व वर प्रत्ययज्ञानाचें समाधान अशीं खरोखरच या जगात दुर्लभ असतात.

एकाचें एक दिसणें हा भ्रम, नरदेह रजोगुणी असल्यामुळें त्यांत तो असावयाचा च. हा मध्यें च भासणारा भ्रम घालविला च पाहिजे. त्याशिवाय परमार्थ म्हणजे स्वरूपस्थिति प्राप्त च होणार नाहीं. म्हणून आपलें सामर्थ्य वाढविलें पाहिजे. अर्थात् रजोगुण कमी करून सत्वगुणांत गेलें पाहिजे. त्यास उपाय दोन च, एक भक्तिमार्ग व दुसरा ज्ञानमार्ग. ह्या दोन्ही उपायास बुद्धीचा प्रकाश म्हणजे जाणीव च कामाची होय. कारण भ्रम अथवा अज्ञान जाणिवेवर च राहतें व जाणीव च त्यास जाणते, पण ही जाणीव म्हणजे जगज्जोती व तो च अंतरात्मा. अंतरात्मा सगुण रूपाचा आहे म्हणून त्याचें च भजन येथें सांगितलें. तें निष्काम झालें कीं, हें सगुण भजन निर्गुणावर म्हणजे निश्चल ब्रह्मावर राहतें अशी जाणीव भक्तास होते, मग ईश्वरभाव ही भ्रम च असें त्यास प्रचीतीनें वाटतें. पण ह्या ज्ञानानें जर प्रत्ययाच्या समाधानात अंतर पडलें नाहीं तर हें वस्तूचें खरें ज्ञान होय असा त्याला प्रत्यय येतो. निर्गुणाचें ज्ञान होण्यास सगुणाचें निष्काम भजन च उपयोगाचें व त्यानें च सामर्थ्य वाढतें म्हणून या समासात सगुणाचें म्हणजे अंतरात्म्याचें भजन सांगितलें व या समासास सगुणभजन असें योग्य नांव दिलें.

सगुण निष्काम भजनाची सिद्धि झाल्यावर स्वरूपस्थितीला यथार्थ जाणण्यास आत्मप्रचीती इतकें दुसरें प्रमाण च नाहीं, म्हणून च श्रीसमर्थांचा भर आत्मप्रचीतीवर विशेष. पण लोक व शास्त्रधारी रक्षून च श्रीसमर्थ प्रचीतीचें स्वरूप पुढील समासात दाखवीत आहेत.

व्यवहारांत सुद्धां, घर, शास्त्र, घोडा, रत्नें, सुवर्ण इत्यादिक आपणांस घ्यावयाचीं असल्यास आपण त्यांस प्रथम पारखून च घेतों. पारखलें नाहीं तर फसवणूक होते. शोधून पाहिल्याशिवाय कोणतें च काम सुखावह होत नाहीं म्हणून भल्यानें अनुमानाचीं कार्यें कधींही करूं नयेत, शोधल्याशिवाय अन्नवस्त्र घेतलें, चोरांची संगति धरिली, खोट्याचा विश्वास केला, तर प्राणी प्राणास मुकतो. ती च गति परमार्थाची होय. प्रचीतीविण ज्ञानानें समाधान होत नाहीं, इतकें च नव्हे तर अनुमानानें अशा मनुष्यानें एखाद्या नेणत्या प्राण्यास उपदेश केल्यास दुराणाइताला

झांकून मारल्याप्रमाणें होईल. याच्या उलट जाणत्या वैद्याला जर दुराणाइतानें आपला रोग सांगितला नाहीं, तर तोही आत्महत्याराच. ब्रह्मांड कोणी केलें, तें कशाचें झालें, आपण कोण, परमेश्वर कोणता, व मुख्य कर्ता कोण हे प्रचीतीनें कळून जर आत्मनिवेदन झालें तर च जन्ममृत्युयातना चुकतील व याबद्दल जर मन संशययुक्त राहिलें तर केलेला सर्व परमार्थ बुडाला च असें समजावें हें च परमार्थाचें वर्म होय. यास खोटें म्हणेल तो अधम व खोटें मानील तो अधमाधम. आतां बोलण्याची सीमा झाली. परमात्म्याला जाणलें च नाहीं, तर तो कळणार च नाहीं अर्थात् अज्ञानांत जर आपण राहिलों तर परमात्मा कळणार च नाहीं हें खोटें नव्हे. सर्वोत्तमा तूं हें जाणतो च आहेस. माझ्या उपासनेची ही च थोरवी आहे कीं, प्रत्ययाचें ज्ञान सांगावें. प्रचीतीशिवाय ज्ञान जर मी सांगूं लागलों तर त्याचा दोष प्रभूला लागेल म्हणून मुख्य कर्त्यास ओळखिलें पाहिजे, व मायोद्भवाचें मूळ शोधिलें पाहिजे, असें जें मी म्हणतों तें सत्य च आहे. लोक व शास्त्रधारी या दोहोंचें रक्षण करून च प्रचीतीनें हें कोडें मी उकलून दावीन व श्रोत्यांस उमजण्या-करितां बोलिलेलें च निरूपण मी पुन: करीत आहें तें श्रोत्यांनीं सावधान होऊन ऐकावें. या प्रमाणें या आठव्या समासांत प्रचीतीचें निरूपण केलं म्हणून या समासास प्रचीतिनिरूपण असें नांव दिलें.

पांचव्या समासात जगज्जोती निमाली म्हणून स्वरूपस्थिति उरली असें सांगितलें, पण या स्थितीशिवाय जें कांहीं दिसतें तें सर्व भ्रमरूप असें सहाव्या समासांत सांगितलें. हा भ्रम अज्ञानी जीवांत च पैसावतो म्हणून ज्ञानी होण्याची खटपट करावी असें सातव्यांत सांगितलें त्यास दोन च मार्ग, एक निष्काम सगुणभजन व दुसरें निर्गुणज्ञान. आतां भक्ति निष्काम झाली कीं नाहीं व तसें च निर्गुण ज्ञान प्रचीतिपूर्वक झालें कीं नाहीं हें पटण्यास प्रचीतीच्या समाधानाची कसोटी लागते. यांत यत्किंचितही अनुमान राहिलें तर परमार्थ बुडाला च. प्रचीतीशिवाय समाधान मिळावयाचें च नाहीं व स्वरूपस्थितीची प्राप्तिही होणार नाहीं हें समर्थांनीं मोठ्या कळकळीनें आठव्या समासांत श्रोत्याच्या नजरेस आणून दिलें आहे. आपण कोण, मूळकर्ता कोण, मायोद्भवाचें मूळ काय हें उमजलें म्हणजे आत्मनिवेदन यथार्थ झालें असें समजावें. असें सांगून मूळप्रश्नाचा म्हणजे मायोद्भवाच्या मुळाचा प्रश्न श्रीसमर्थ उकलीत आहेत.

*या ठिकाणीं मन पूर्वक विचार न केल्यास सहा ते आठ समासाचा समावेश* जगज्जोतीच्या दशकांत कसा झाला असा संशय वाचकाच्या मनांत येणें साहजिक आहे. परंतु जीवाचें विपरीत ज्ञान हाच भ्रम. वस्तुत जीव हा ब्रह्मांश आहे, पण तोच मायागुणामुळें अंतरात्मा होतो असें वर दाखविलें च आहे अंतरात्माच प्रवर्तक हें सर्वांस मान्य, अंतरात्माच जगज्जोती असेंही ते दाखवितात. मग

अंतरात्म्याच्या क्रिया जरी विषयांच्या ज्ञानाकडे वळल्या तरी त्या सर्व प्रश्नांशावरच होत आहेत हें निर्विवाद आहे, म्हणजे विपरीत ज्ञान अथवा भ्रम यास जाणिवेचें ( जगज्जोतीचें ) अधिष्ठान आहे. म्हणूनच भ्रमाचा निरास होऊ शकतो, व स्वरूपस्थिति प्राप्त होऊं शकते. शुद्धीच्या प्रकाशामुळें निष्काम भजन व निर्गुणज्ञान प्राप्त होतें असें जेव्हां आठव्यात सांगितलें, तेव्हां श्रीसमर्थांनीं श्रोत्यास जाणिवेकडे नेऊन नाहीं का सोडलें? मग शीर्षकाचा धागा कसा तुटतो? पण याची प्रचीति समाधानावर अवलंबून असते. जाणिवेंत यत्किंचित् मल राहिला तर समाधानात अंतर पडणारच असें सांगून इच्छारूपी जगज्जोतींतून श्रीसमर्थ श्रोत्यास न कळूं देता कसे शुद्ध जाणिवेंत समरस करीत आहेत असें पाहिलें म्हणजे त्यांचे आभार मानावे तितके थोडेच. आता नवव्या समासात सिंहावलोकनाच्या धर्तीवर श्रीसमर्थ कथानुसंधान देत आहेत तें केवळ श्रोत्यास त्यांचें सूक्ष्म निरूपण समजण्याकरिता च बोलिलें चि पुन बोलावें लागत आहे, व घरोंवरच जगज्जोतीची यथार्थ कल्पना ते देत आहेत.

वटबीज फोडून पाहिलें असता झाड दिसत नाहीं, तद्वत् बीजरूप मूळमायेचा विस्तार दिसत नाहीं. तिचें स्वरूप पाहू गेल्यास तेथें दोन भेद असल्याची प्रचीति येते. निश्चल स्वरूपात जी चंचल स्थिति तोच वायु. त्या वायूमध्यें जी जाणीवकला आहे ती जगज्जोतीचा जिवंत झरा आहे. वायु व जाणीव मिळून मूळमाया म्हणतात. सरिता शब्दानें बायको भासते तरी पण खरोखर तेथें पाणीच असतें. त्याप्रमाणेंच मूळमायेचा प्रकार आहे. वायूला प्रकृति म्हणतात व पुरुषाला जगज्जोती म्हणतात, म्हणून प्रकृतिपुरुष, शिवशक्ति, अर्धनारीनटेश्वर अशीं नावें तिलाच देतात. वायूमधील जो जाणीव गुण तेंच ईश्वराचें लक्षण. पुढें त्यापासून त्रिगुण झाले. जाणिवेला सत्वगुण म्हणतात, त्याचा देहधारी जो विष्णु त्याच्या अंशानें जग चालतें. येक जाणीवच सर्व प्राणिमात्रात विभागली गेली म्हणून तिच्या योगानें जाणून जाणूनच सर्वांचे देह वाचविले जातात. तिलाच जगज्जोती असें नाव देतात. किड्यापासून तों ब्रह्मदेवापर्यंत सर्वांच्या अंगीं ही जाणीवरूप जगज्जोती खेळत असते त्यामुळें सर्व प्राणी जाणूनच पळतात, देह लपवितात व आपले प्राण वाचवितात. सगळ्या जगाला ही वाचविते म्हणून हिला जगज्जोती म्हणतात. ती जर गेली तर प्राणी जेथल्या तेथेंच मरतात.

जसे उदकाचे तुषार तसे जाणिवेचे विकार मुळांतच असतात, म्हणून त्याचा विस्तार होतो. ह्या जगज्जोतीमुळें देव देवता दैवतें व भूतें वायुस्वरूपानें विचरतात व संकल्पबद्ध अज्ञान्याला बाधतात. ज्ञान्याला संकल्प नसतो म्हणून त्यास बाधा होत नाहीं, एवढ्याकरिता आत्मज्ञानाचा अभ्यास करावा. ज्ञानावाचून कर्म सुटत नाहीं व सद्गुरूवाचून ज्ञान होत नाहीं म्हणून सत्संग करावा. तत्वानें तत्वाचा निरास

केल्यावर आपले आपणच उरतों व सार्थकता होते. स्वरूपस्थिति हाच सिद्धांत तो साधण्याकरितां वर निर्दिष्ट केलेला पूर्वपक्ष लटका म्हणून उडवावा लागतो पण साधकाला जर श्रवणमननिदिध्यास याच्या योगानें प्रचीति येऊन स्वरूपावर त्याचा विश्वास बाणला तर साक्षात्काराकरिता सायास करण्याची आवश्यकता राहत नाहीं. या समासात जगज्जोतीची प्रचीति आणून दिली म्हणून यास प्रचीतनाम म्हटलें.

या दशकाचा उपसंहार सुरू झाल्या म्हणूनच ' अंत करण एक ' व ' देह आशंकाशोधन ' या दोन समासांत केलेलें निरूपण संगतवार सागून या दशकाच्या शीर्षकाची सार्थकता दाखविली, म्हणजे जगज्जोतीची प्रचीति आणून दिली. देह कसे झाले अशी श्रोत्यानें दुसऱ्या समासात शंका घेतली होती व बरोबरच मायोद्भवाचें मूळ विचारिले होतें, पैकीं पूर्वार्धात देहाची शंका सोडविली, पण मायेचें मूळ दाखविलें नाहीं तें नवव्या समासात निश्चळीं जे चंचल स्थिति या स्वरूपात दाखविलें व बरोबरच जगज्जोतीचें स्वरूपही पूर्णत्वानें दाखविलें. आता दहाव्या समासात चल व अचल या दोहोंचें स्वरूप दाखवीत आहेत.

सृष्टीतील गगन व वायु याची च उपमा देऊन ब्रह्म व माया यांची ओळखण श्रीसमर्थ करून देत असतात, यामध्येंही रहस्य आहे च, पण तें उलगडण्याचा हा प्रसंग नव्हे असो. चारी भूतें सामावतात म्हणून गगन पोकळ, तसें च अनंत ब्रह्माडें सामावतात म्हणून ब्रह्म पोकळ. अंतराळ भूताहूनही उंच व उदंड असतें. त्याप्रमाणें च ब्रह्म सर्व ब्रह्माडास व्यापूनही त्यांच्यापलीकडचें व विभु असतें. जसें गगन भूतामुळें गुणवार लिप्त अथवा चलित होत नाहीं, तद्वत् ब्रह्मही मायेमुळें व तिच्यांतील गुणामुळें गुणवान् किंवा लिप्त न होतां निश्चल व निर्विकार च राहतें. आकाश विस्तीर्ण असून तें भोंवती अवकाश देतें पण तेथें नीलिमेचा भास होतो. ब्रह्म अवकाश तर देतें च पण भासरहित असतें. याचें कारण तेथें कल्पना च नाहीं. कल्पनेनें च भास होतो हें नवव्या दशकात सांगितलें आहे. ब्रह्म पाताळात आहे. अंतराळास त्याचा अत लागत नाहीं म्हणून सर्व काळात तें नित्य संचलेलें च असतें. त्यास परमात्मा किंवा आणखीही कित्येक नावें देतात पण आदि मध्य व अवसानीं तें जसेंच्या तसें च असतें. या अशा अचंचलात जें चंचल भासतें त्यास मूळपुरुष, मूळप्रकृति, मूळमाया अशीं पुष्कळ नामें देतात. दिसत नाहीं म्हणून नांव ठावयाचें व इंद्रियास अगोचर म्हणून खूण पटवायाची. हेतु इतका च कीं, तें जाणलें जावें. वस्तुत ज्याचें नाव ठेवावयाचें त्यास अगोदर ओळखलें पाहिजे. तसें न होता रूप दिसत नसल्यामुळें नामामुळें भटकावें भाग लागतें व मग प्रत्यय नसल्यामुळें सगळा च घोंटाळा उडतो. निश्चल गगनात जरी चंचल वारा वाहू लागला तरी गगन व वायु यात भेद आहे त्याचें च स्पष्टीकरण आता पंचीकरणशास्त्राप्रमाणें केलें जात आहे. ती च गुणमयी झाल्यावर तिला अव्याकृति असें नाव ठेऊन कारणदेह

घनविला, नंतर हिरण्यगर्भ हा सूक्ष्म देह व विराट् हा स्थूल देह. याप्रमाणें ईश्वराचें तनुचतुष्टय आहे म्हणून च आम्ही मूळमायेला जाणीव असें म्हणतों.

ज्या प्रमाणें गगनांत पवन चालतो त्याप्रमाणें निश्चल ब्रह्मावर जें ' अहं-ब्रह्मास्मि ' असें स्फूर्तिरूप चलन झालें, तें इच्छास्फूर्तीचें जनक होय. म्हणजे त्याच्या पोटांत इच्छारूप स्फूर्ति अव्यक्त दशेंत होती. अहंपणामुळें तें च जाणतें चलन जाणीव झाली. ती च मूळमाया व ब्रह्मांडांचा महाकारण देह.

आतां या चंचलाचीं पुरुषनामें पुष्कळशीं दिलीं जात आहेत. जगदीश सत् , चित् , द्रष्टा, साक्षी, क्षेत्रज्ञ व देहांत कुटस्थ, तीन देव व इतर देव यांचा आत्मा, ऋषि गंधर्वादिकांचा सर्वांतरात्मा, स्वर्ग, मृत्यु, व पाताळ या लोकांचा प्रवर्तक अशा रीतीनें चंचल आत्मा पाल्हाळला. नंतर मूळमाया, लोकजननी, जगज्ज्योती, जी तीन वाणी, अंतःकरण अंतर्कळा यांना उकलून दाखविते, व काळअवस्था, तादरूप्य, अध्यात्मविद्या, सहजस्थिति, शांति यांना प्राप्त करून देते अशीं स्त्रीनामें दाखविलीं व सर्वज्ञपण, मी-तूंपण, चैतन्य वगैरे नपुंसक नामें सांगितलीं. अशी जरी पुष्कळ नांवें त्याला असलीं तरी ती एक च जगज्जोती असून तिला च सर्वांतरात्मा असें विचारवंत जाणतात.

हे तर नांवाचे ढीग, मग सृष्टिरचनेचे किती असतील याचा विचार करा. किड्यापासून तों ब्रह्मदेवापर्यंत सर्वांना वर्तविणारा जो अंतरात्मा तो जाणला जातो पण दृष्टिगोचर मात्र नाहीं. दृश्यसंबंध असल्यामुळें मनास भासत नाहीं व शरीरांत एके ठिकाणीं राहत नाहीं. कारण पंचज्ञानेंद्रियांच्या क्रिया त्यारा च जाणाव्या लागतात. शिवाय गगनांत सूक्ष्मत्वानें भरलेला असतो व पदार्थ पाहून चहूंकडे उरलेला च असतो. पुरुष, स्त्री व नपुंसक यांचा देहधारी असला तरी त्याहून तो निराळा च असतो म्हणून त्यास अक्षर असें म्हणतात. कारण इतकें च कीं नित्य चंचल जें मायेचें अव्यक्त कूट त्यामध्यें तो निष्क्रियत्वानें राहतो. पण या क्षराक्षर पुरुषांहूनही भिन्न असा जो उत्तम पुरुष, त्याच्यांत साक्षित्व नसल्यामुळें ब्रह्मस्वरूपी अव्यक्तांत स्थाणूप्रमाणें स्थिर असतो. अतः निष्प्रपंच, निरंजन, निर्विकारी येक परमात्मा तो च. अगोदर चाऱ्ही देहांचें निरसन झाल्याशिवाय अनन्य भक्ताला ओळखतां येत नाहीं. देहमात्राचा निरास झाल्यावर मग अंतरात्मा कसा उरेल कारण निर्विकाराच्या ठायीं विकाराला ठाव च नाहीं. चंचल तितकें माइक असा निश्चयात्मक प्रत्यय आल्यावर ज्ञानी शाश्वत असें सार घेतात. पुढें ज्ञानाचें विज्ञान होतें; मन उन्मन होतें, मग चंचलत्व कोठलें ! हें सर्व अनुभवाचें काम सांगणी-पांगणीनें नव्हे. प्रत्ययाशिवाय शिणणें हें च पाप. सत्य म्हणजे स्वरूप. असत्य म्हणजे माया, मग दृश्य पाप ( माया ) ओसरल्यावरोवर पुण्य परब्रह्म च उरतें. आपण च तें स्वयंवस्तु असें महावाक्यानें बाणल्यावर पापराशि दग्ध होते यांत

नवल तें कोणतें ? शरीर तर पापाचें च वळलेलें आहे. मग त्यास वरवर धुतलें, मुद्रेनें लासिलें किंवा पोटांत गोमूत्र घेतलें तरी दोष कसे जाणार ? त्यास आत्मज्ञानाशिवाय दुसरें औषध च नाहीं. वेदशास्त्रांत वर्णिलेलें जें सत्यस्वरूप तें च या ज्ञानियाचें रूप. पण या सर्व प्रचीतीच्या गोष्टी. ती नसतां सर्व शोक. म्हणून श्रीसमर्थ शुभेच्छा करतात कीं, रघुनाथकृपेनें निश्चयाचा प्रत्यय राहो.

दहाव्या दशकांत जोडफळ मायेच्या ज्योतिर्मय अंगाचें संसरण याप्रमाणें दाखविलें. स्वरूपस्थितीशिवाय इतर सर्व भ्रम असें सहाव्या समासांत सांगितलें. भ्रमनिरसनाचा म्हणजे जीवाच्या विपरीत ज्ञानाचा निरास निष्काम सगुण भजनानें होतो म्हणून सगुण अंतरात्म्याचें भजन सातव्यांत सांगितलें. निष्काम भजनाची सिद्धि प्रचीतीच्या कसोटीवर असते व ती लागून पाहिल्याशिवाय समाधान अथवा स्वरूपसिद्धि प्राप्त होऊं शकत नाहीं म्हणून प्रचीतीचें निरूपण आठव्या समासांत केलें व एक च जगज्योती प्राणिमात्रांत वाटली गेली आहे असें सोपपत्तिक निरूपण नवव्या समासांत करून तिची प्रचीति वाचकांस पूर्ण करून दिली म्हणून नवव्या समासास प्रचीत नाम दिलें. क्षर म्हणजे भूतें व अक्षर म्हणजे देहांतील कूटस्थ आत्मा हीं दोन्हीं चंचलांत आहेत व त्यांच्याही पलीकडे निष्प्रपंच व निष्कलंक उत्तम पुरुष आहे असें दाखवून प्रचीतीशिवाय सर्व व्यर्थ म्हणून निश्चयाचा प्रत्यय सर्वांच्या हृदयीं राहो अशी शुभेच्छा करून चंचल व निश्चल यांचा स्पष्ट भेद स्वरूपप्राप्तीकरितां दहाव्या समासांत दाखविला हाच या दशकांतील उत्तरार्धाचा समन्वय होय.



( ४ )

॥ श्रीरामसमर्थ ॥

# ची ची म्हणजे दैन्य च

( लेखक — रा. अनंतदास रामदासी, गिरड )

श्री. शिवाजीराव भावे यांनीं ' श्री मनाचे श्लोक ' या श्रीसमर्थकृत प्रकरणावर जें सुंदर भाष्य लिहिलें आहे तें खरोखर अपूर्व असून त्यायोगें श्रीसमर्थग्रंथाच्या अभ्यासकांवर त्यांनीं फार उपकार केले आहेत. या भाष्यास जोडलेली शब्दसूची सहज चाळींत असतां ' ची ची ' शब्दावर पुढील टीप आढळली.

ची—[ ची ची ] ( छीः छीः अनुकरणवाचक ) छीः थू

श्री. आळतेकर, देवस्थळी वगैरे टीकाकारांनीं हा च अर्थ स्वीकारला आहे. तथापि मला वाटतें, ची ची हा अनुकरणवाचक शब्द असला, तरी तो ' छीः छीः ' चें अनुकरण नसावा. हत्ती अडचणींत सांपडून अगतिक, दीन, झाला म्हणजे पराजयदर्शक किंवा दीनतादर्शक जो चीत्कार करतो त्याच्या अनुकरणानें ची ची ( = दैन्य ) असा शब्द झाला असावा.

मनाच्या श्लोकांत ' ची ची ' हा शब्द दोन ठिकाणीं आलेला आढळतो.

विकारें घडे हो जनीं सर्व ची ची ॥ ५
विकल्पें उठे तर्क त्या नर्क ची ची । १०१

आणि या दोन्हीं चरणांचा संदर्भ पाहतां ' ची ची ' म्हणजे फजिती किंवा दैन्य असे दोन्हीं अर्थ तेथें संभवतात.

' ची ची ' च्या अर्थाविषयीं मी सुचवीत असलेल्या अनुमानाला माझे बंधु ग्वाल्हेरचे श्री. वि. गं. ओदक यांचेकडून मिळालेल्या माहितीवरून बळकटी च येते. श्री. ओदक यांनीं दिलेली माहिती येणेंप्रमाणें —

हत्ती मस्त होऊन मोकाट सुटला तर त्याला पकडण्यासाठीं सांडसाच्या आकाराचा एक प्रकारचा सांपळा तयार केलेला असतो, त्याच्यायोगें त्या मस्त हत्तीस पकडतात. मागच्या दांव्या दावल्या कीं पुढलें हि तोंड दावलें जावें अशी

सांडसाची रचना असते. याच्या उलट हा हत्तीचा सांडस मागील दांडे दाबले असतां त्याचें पुढील तोंड उघडेल व ते दांडे मोकळे सुटतां च पुढील तोंड मिटेल अशा प्रकारचा असतो. पुढचा गोल भाग हत्तीचा पाय मावेल एवढा मोठा असतो आणि त्या गोल भागांत सुमारें १॥-२ सूत जाडीचे तीक्ष्ण धारेचे असे चार सहा खिळे असे समोरासमोर बसविलेले असतात कीं, सांडसाचे गोल तोंड मिटतां च खिळ्यांचीं टोकें एकमेकांस जुळून जावींत. मस्त हत्ती मोकाट धांवूं लागला म्हणजे मागील बाजूनें जाऊन युक्तीनें हा सांडस त्याच्या एकाद्या पायांत अडकवितात; तो इतका जोरानें बसतो कीं, बेफाम धावणारा हत्ती पाय सांडसांत अडकतां च खिळे मांसांत खोल घुसल्यामुळें एकदम गुडघे टेकून ' ची ऽ ऽ ऽ ' असा दीनवाणा शब्द काढतो. त्याला पुढें पाऊल टाकणें च अशक्य होतें. हिंदी भाषेंत हि दैन्य, हार, पराजय, माघार अशा अर्थी ' ची ' हा शब्द योजितात. दोन पक्षांत भांडण उपस्थित झालें व त्यांतील एकादा पक्षानें माघार घेतली म्हणजे त्यास उद्देशून म्हणण्यांत येतें कीं, " क्या उसने ची बोल दिया ! "

यावरून ' ची ची ' हें ' छीः छीः ' चें अनुकरण नसून हत्तीच्या चीत्काराचें आहे आणि त्याचा अर्थ ' फजिती ' नसून ' दीनता ' आहे, हें निश्चित दिसतें.



तुझ्या ध्यानात येतें का ? तूं देव्हाऱ्यात श्रीविठ्ठलरुक्माईच्या मूर्ति पूजतोस या श्रीक्षेत्र पंढरपूरच्या मूर्ति पाहून केलेल्या मूर्ति आहेत. श्रीरामकृष्णदत्तात्रेयादिकांच्या मूर्ति तुझ्या देव्हाऱ्यात अशाच शिरल्या आहेत तर मग तुझ्या ध्यानात हें आलें ना कीं, तू जे देव प्रत्यहीं पूजतोस त्याच्या त्या प्रतिमा क्षेत्रांतल्या मुख्य देवाच्या प्रतिमेवरुन बनविलेल्या आहेत.

नाना प्रतिमा देवाचें मूळ । तो हा क्षत्रदेव चि केवळ ।
नाना क्षत्रें भूमंडळ । शोधून पाहावें ॥ १८–८–५

गावोगाव, घरोघर पूजल्या जाणाऱ्या प्रतिमादेवाचे मूळ क्षेत्रांतील देव आहेत, हें शोधून पहा, म्हणजे सहज कळेल. क्षेत्रात तरी तुला साक्षात् देव भेटला का ? नाहीं, तो ' क्षत्र देव ' हि ' पाषाणाचा ' च आहे ना ? क्षेत्रात तरी या ' प्रतिमा ' कोठून आल्या, याचा आणखी थोडा विचार करशील तर

क्षत्रदेव पाषाणाचा । विचार पाहाता तयाचा ।
तंत लागला मुळाचा । अवताराकडे ॥ १८–८–६

हरिहरानीं अनेक अवतार घेऊन साधूचें परित्राण व दुष्टाचा विनाश केला. त्यांच्या विविध अवतारातल्या प्रतिमा तीर्थक्षेत्रांत ठाण मांडून बसल्या आहेत, ही गोष्ट लक्षात येईल पण आज ते अवतार आहेत का ?

अवतारी देव सपले । देहे धरुनी वर्तोन गेले ।
त्याहून थोर अनुमानले । ब्रह्मा विष्णु महेश ॥ १८-८-७

ब्रह्माविष्णुमहेशानीं हे अवतार घेतले. हे तिघे देव थोर खरे, पण हे तिघे देव तरी कोठें आहेत ?

त्या तिही देवास ज्याची सत्ता । तो अंतरात्मा चि पाहाता ।
कर्ता भोक्ता तत्त्वता । प्रतक्ष आहे ॥ १८-८-८

' तिन्ही देव जथून निर्माण झाले ' तो अंतरात्मा. तो प्रत्यक्ष ' कर्ता ' ' भोक्ता ' आहे यासाठींच मूर्तिपूजेवरून अंतरात्म्याच्या पूजेवर आल्यावाचून अर्चनभक्ति साग घडणार नाहीं, हें ध्यानीं ठेव आणि देहरूपी देवाल्यांत नांदणाऱ्या अंतरात्म्याची पूजा म्हणजे च त्याचा संतोष करून अर्चनभक्तीचें खरें पुण्य गांठीं बांध।'

( ४ ) ' अंतरात्म्याचा संतोष ' ही च खरी देवपूजा असल्यामुळें श्रीसमर्थांनीं अर्चनभक्तीचें–केवळ मूर्तिपूजेचें–जुनेंपुराणें स्वरूप कसें पार बदलून टाकलें आहे, हें ध्यानीं घेऊन सच्या परमार्थी पुरुषानें तशी अर्चनभक्ति केली पाहिजे.

मूर्तिपूजेच्या उपचाराचा उपयोग हि जनताजनार्दनाच्या अंतरात्म्यास च तृप्त करण्याकडे व्हावयास पाहिजे.

पंचामृतें गंधाक्षतें । पुष्पें परिमळद्रव्यें बहुतें ।
धूपदीप असंख्यातें । नीरांजनें कर्पुराचीं ॥ ४-५-१८
नाना खाद्य नैवेद्य सुंदर । नाना फळें तांबोलप्रकार ।
दक्षणा नाना आळंकार । दिव्यांबरें वनमाळा ॥ १९

या सर्व वस्तु अत्यादरानें मूर्तिपूजेसाठीं गोळा केल्या तरी ' नाना खाद्य ' ' सुंदर नैवेद्य ' ' नाना फळें ' व ' तांबोलप्रकार ' याचा उपभोग विद्यमान अंतरात्मा च घेत असतो हें उघड आहे. पण अशा आडपडद्यानें च केवळ नव्हे तर प्रत्यक्ष अंतरात्म्याची सेवा प्रत्येक मंदिरामार्फत, निदान तीर्थक्षेत्रातल्या मंदिराकडून कशा प्रकारें व्हावी याविषयीं अर्चनभक्तीच्या समासात श्रीसमर्थ लिहितात —

" मंदिराभोंवतीं वापी, कूप, सरोवरें, मठ, मंडप, धर्मशाळा, पडशाळा बांधलेल्या असाव्यात. तेथें नानावस्त्रसामग्री असावी. तसें च

आळंकार आणी आळंकारपात्रें । द्रव्य आणी द्रव्यपात्रें ।
अन्नोदक आणी अन्नोदकपात्रें । नाना प्रकारीचीं ॥ ४–४–२५

असावीं शिवाय वनें, उपवनें, पुष्पवाटिका, तापसी जनासाठीं पर्णकुटिका हि बांधून जगन्नायकाला यथासांग पूजा समर्पावी ! "

केवळ मंदिरांतल्या मूर्तीसाठीं पूजेचा एवढा खटाटोप खचित सांगितला नाहीं. मंदिरांतल्या मूर्तीला काय गाभाऱ्यांत अपुरी जागा पडते म्हणून धर्मशाळा पाहिजे ? देवाला पहुडण्यासाठीं गाभाऱ्यातल्या एका कोपऱ्यात च छोटासा पलंग व गादीगिरद्याची उत्कृष्ट व्यवस्था असता मंदिराभोंवतीं ' पडशाळा ' म्हणजे निद्रिस्तांकारणें विशाळ स्थळाचा गरज च काय ? ' वनें ' ' उपवनें ' ' पुष्पवाटिका ' कोणासाठीं ? अन्नोदकाचा मुबलक साठा आणि भरपूर

अन्नोदकपात्रें काय केवळ मंदिरांतल्या मूर्तींना समर्पावयाच्या नैवेद्यासाठीं लागतील ? ' नाना वस्त्र सामग्री ' तसेंच ' नाना अळंकार ' नुसत्या गाभाऱ्यांतला मूर्तीसाठींच गोळा करून ठेवावे, अशी त्या महापुरुषाची शिकवण खचित नाहीं. या नाना सुखसोयींचा उपयोग जनताजनार्दनाच्या सेवेसाठीं म्हणजे च विद्यमान अंतरात्म्याच्या संतृप्ततेसाठीं झाला पाहिजे. धर्मसंरक्षक अशा ब्राह्मणसाधुसंतयतिमहानुभावादिकांना व कार्यकर्त्या प्रचारकांना मंदिरांतल्या या सुखसोयींचें साह्य मिळालें पाहिजे. मंदिर म्हणजे स्वधर्मांतील दीनदुबळ्या गोरगरीबांना सर्व प्रकारचें आश्रयस्थान व सर्व प्रकारच्या चळवळींचें स्फूर्तिस्थान बनावें अशी श्रीसमर्थांची उत्कट इच्छा दिसते.

( ५ ) ' श्री समर्थांच्या लघुकाव्यां ' तील ' मानसपूजा ' प्रकरणांत मंदिरांतल्या मूर्तिपूजेच्या मिषानें जनपूजा कशी साक्षेपानें करावी, याविषयीं सविस्तर सुंदर विवेचन आहे. प्रत्येकानें तें एकवार तरी लक्षपूर्वक वाचावें मानसपूजेचा हा वर्णिलेला स्वर्गीय सोहळा नेहमींच साधकानें मनानें भगवंतास अर्पावयाचा नसून ' आपणास जें जें अनुकूल, तें तें करावें तत्काळ ' यासाठीं आहे व जें ' होईना तयास निवळ, विवेक उमजावा ' आणि अशक्य तें शक्य कोटींत आणून

जयेत्या पर्वें मोहोत्साव । असंभाव्य चालवी वैभव ।
जें देखतां स्वर्गींचे देव । तटस्त होती ॥ ४–७–१८

अशी अर्चन वा दास्यभक्ति प्रत्यक्ष करण्यासाठीं आहे.

कोणी मानसपूजेचें महत्त्व वर्णितात तें चंचल मन पूजेच्या वर्णनानें भगवंतीं जडावें म्हणून अथवा इच्छेनुरूप दिव्य पूजन घडण्याचा योग येईपर्यंत मनाला त्याचा ध्यास लागावा म्हणून च. प्रत्यक्ष पूजा कधींच करावयाची नाहीं. ' श्रेष्ठ ' म्हणून जन्मभर मानसपूजा च करावयाची असें कोणी साधक म्हणेल तर मात्र त्याचा तो वेडेपणा होईल.

कल्पना करूं कीं, एका गृहस्थाकडे कोणी अतिथि आला. त्याला अतिशय भूक लागली होती. यजमान मानसपूजेचें महत्त्व मानणारे होते. त्यांनीं त्या अतिथीची मानसपूजा सुरू केली. विचारलें त्याला, ' काय म्हणतां तुम्हांला भूक लागली आहे ? ठीक आहे. भाजीभाकरी आमचे येथें प्रत्यक्ष तयार आहे, पण असलें भिकार अन्न मी तुम्हांस वाढूं घालूं इच्छित नाहीं. मानसपूजेंतला महानैवेद्य मी

तुम्हांला भक्तिभावानें इतक्यांत समर्पण करतों.' असें म्हणून लगेच त्या गृहस्थानें डोळे झांकले व मनानें अतिथीला. चौरंगावर जेवावयास बसविलें, चांदीचें ताट, त्यांत किती तरी चटण्या कोशिंबिरी, शाकभाज्यांची खूप दाटी, पापडसांडगे कुरवड्यांची गर्दी, भात किती तरी प्रकारचे वाढले. पंचपक्वानांची रास ओतली. झालें यथेच्छ जेवण त्या अतिथीचें चांगली सुवर्णपुष्प दक्षिणा दिली. तांबोल दिला. भक्तिभावानें वंदन केलें व ' या बरें आतां ' म्हणून त्याला निरोप दिला. आणि चमत्कार असा कीं, खरोखर च डोळे उघडून तो गृहस्थ त्या अतिथीला नमस्कार करून म्हणाला ' या बरें आतां. ' घराबाहेर जाण्याचा इषारा मिळतांच भुकेनें कासावीस झालेला अतिथि कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें म्हणाला, ' काय म्हणतां ! जाऊं मी ? अहो मला भूक लागली आहे ना ! ' यावर शांतचित्तानें गृहस्थानें उत्तर दिलें, ' मी मानसपूजेचें महत्त्व मानणारा आहे, तुम्हांला यथेच्छ मानसिक भोजन घातलें, आतां खुशाल जा. '

वाचकहो, अशा मानसपूजेला तुम्ही श्रेष्ठपूजा खचित मानणार नाहीं.

( ६ ) श्रीसमर्थांनीं मानसपूजा प्रकरणांत वर्णिलेला अर्चनभक्तीचा सोहळा हि प्रत्यक्ष कृतींत आणण्यासाठीं वर्णिलेला आहे. श्रीसमर्थांच्या काळीं चाफळ क्षेत्रीं नित्यनैमित्तिक कार्यक्रम असाच चालत असेल. मंदिर व मंदिराचा प्राकार अर्चनभक्तीच्या समासांत लिहिल्याप्रमाणेंच येथें हि वर्णिला आहे.

पुष्पवाटिका वृक्षवनें । नाना प्रकारीचीं घनें ।
पक्षी स्वापदें गोधनें । ठाईं ठाईं ॥ मा. पू. १–८

तसेंच सभामंडप, चित्रशाळा, स्वयंपाकगृहें, भोजनशाळा, सामग्रीगृहें, धर्मशाळा, मठ, येकांतगृहें, होमशाळा, इतकेंच नव्हे तर नाट्यगृहें देखील, मंदिराच्या प्राकारांत असावीं. हीं सारीं गृहें व या साऱ्या सोयी जनताजनार्दनाच्या अर्चनासाठींच होत. तेथील पारपत्यधिकारी ( व्यवस्थापक )—

जाणती दुसऱ्याचें अंतर । सावधानता निरंतर ।
नेमस्त न्यायाचें उत्तर । वाच्छळ नाहीं ॥ मा. पू. २–४

पवित्र वासनेचे उदास । केवळ भगवंताचे दास ।
सारासार विचारें वास । हृदईं केला ॥ ५

असे असावेत.

मंदिरात येणाऱ्या जाणाऱ्या लोकाना अन्नसंतर्पण सर्वोत्कृष्ट प्रकारचें करणें हा अर्चनभक्तीचा आत्मा होय या अन्नसंतर्पणाचें स्वरूप किती तरी विस्तारानें 'मानसपूजा' प्रकरणात श्रीसमर्थांनीं वर्णिलें आहे किती गोड गोड आहे तें ! वाचून च पोट भरतें !!

स्वयंपाक करून साक्षात् अंतरात्मा संतृप्त करणाऱ्या स्वयंसेविका 'बहुत नेटक्या सुगरणी' 'सुचिस्मंत सबाह्य निर्मळ'

ज्यांची भगवंतीं आवडी । श्रीहरिभजनाची गोडी ।
मनापासून आवडी । कथाकीर्तनाची ॥ मा. पू. ३-३

असलेल्या, ज्यांच्या हातचें रुचकर अन्न खालें तर अत्यंत खंगलेल्या रोग्याचा रोग जावा,

रोगी अत्यंत खंगलें । तेणें तें अन्न पाहिजे भक्षिलें ।
भोजनरुचीनें गेलें । दुखणें तयाचें ॥ मा. पू. ३-७

अशा स्वयपाकिणी असाव्या.

यानतर स्वयपाकाची सामुग्री, भाडीकुंडी, इत्यादिकाचें वर्णन आहे. भोजनातल्या जिनसाची तर सहस्र नामावली दिलेली आहे ! त्यातल्या एकूणएक जिनसाची चव चाखायचें भाग्य सध्याच्या दैन्यावस्थेत फार च थोड्याना लाभेल. दुभत्याची चंगळ इतकी असली पाहिजे कीं,

दुध दही दाट साय । ताक लोणी कोण खाय ॥ मा. पू. ४-९

खाता खाता लोक कंटाळले पाहिजेत. जनताजनार्दनासाठीं अशा प्रकारचें उत्कृष्ट अन्नसंतर्पण, विश्रातीसाठीं सुंदर धर्मशाळा व पडशाळा, जपजाप्यासाठीं वा स्नानसंध्येसाठीं एकातगृहें व होमशाळा याची सोय, कथाकीर्तनप्रवचनाच्या द्वारें धार्मिक चळवळीची माहिती व स्वधर्मपालनाची स्फूर्ति सतत मिळण्याची व्यवस्था ज्या मंदिरामार्फत होईल, तेथें च अर्चनभक्ति योग्यप्रकारें चालू आहे, असें म्हणता येईल मंदिरें म्हणजे धार्मिक चळवळीचीं केंद्रस्थानें बनलीं पाहिजेत, अशी श्रीसमर्थांची उत्कट इच्छा दिसते.

( ७ ) पण सध्या अशीं मंदिरें आहेत का ? मंदिराची संख्या गावोगाव व शहरोशहरीं न जाणों वाढत च चालली असेल पण तेथें श्री समर्थांनीं वर्णिलेल्या

अर्चनभक्तीचा सर्वस्वीं अभाव च दिसून येत आहे. खेड्यांपाड्यांतील मंदिरांच्या दुर्दशेचें तर वर्णन च करावयास नको. मंदिरांत जिकडे तिकडे केरकचऱ्याचे घाण, बहुधा चोहोंकडे पडझड झालेली, शाटव, कुत्रीं व डुकरें यांची सदा वर्दळ देवाच्या भोंवतीं मेणचट साठलेलें, आंगावरून मुंग्या व झुरळांची रहदारी लागलेली, ठिकठिकाणच्या बिळांतून उंदराबेडकांची धावपळ चाललेली व क्वचित् प्रसंगीं त्यांच्या मागें बिळांतील नागोबा लागलेला, असाच देखावा बहुधा चोहोंकडे दिसेल !

गांवच्या लोकांचें मंदिराकडे लक्ष नाहीं. जमलेच कधींकाळीं मंदिरांत एकत्र, तर तेथें च तंबाखूच्या पिचकाऱ्या व विड्याकाड्यांच्या तुकड्यांचा ढीग टाकून निघून जावयाचे. देवापुढें नारळ फुटतील तेव्हां करवंट्यांचे ढीग देवासमोरच पडावयाचे ! कापूरखडीसाखरेचे कागद तेथेंच. असलें घाणेरडें व ओसाड ठिकाण म्हणजे सध्याचें खेड्यांतलें मंदिर बनलें आहे.

शहरांतल्या मंदिरांतून यापेक्षां थोडी सुव्यवस्था असली तरी खरी अर्चनभक्ति तेथें हि दिसत नाहीं. कित्येक ठिकाणीं केवळ मंदिरांतल्या मूर्तिपूजेचाच अतिरेक झालेला दिसतो, तर कित्येक ठिकाणीं भाड्याच्या दुकानांची गर्दी करून उत्पन्न वाढवून मालक स्वतःच्या संपत्तींत भर टाकण्यांत दंग झालेले दिसतात. कोठें पुजाऱ्याच्या घराचाच पगडा मंदिरावर बसलेला, तर कोठें गाईच्या गोठ्याचें अथवा घोड्याच्या तबेल्याचें स्वरूप मंदिरास आलेलें आहे. कशीबशी पुजाऱ्यानें पूजा करून आरतीचें धुपाटणें कोठें ओवाळावें तर तेवढ्याचाहि कोठें पत्ता नाहीं ! कथा पुराणांची रे रे कांहीं ठिकाणीं आढळत नाहीं, असें नाहीं. पण सामुदायिक उपासनेचा वा प्रार्थनेचा प्रसंग फारच दुर्मिळ; नित्य अन्नसंतर्पण वा अनाथ निराश्रितांना आधार फारच थोड्या मंदिरांतून कदाचित् मिळत असेल; बहुधा नाहींच. कांहीं मंदिरांतून वार्षिक उत्सव महोत्सव होत आहेत, पण ते हि खऱ्या अर्चनभक्तीला अनुसरून होत नाहींत.

पुण्यासारख्या शहरांत शंभरावेवर मंदिरें असतील. स्वधर्मांतल्या दीन दुबळ्या व निराधार लोकांना एवढ्या ठिकाणीं आश्रय मिळाला तर सहज हजार दोन हजार गरिबांचें संरक्षण होईल. अनाथ महिलाश्रम व बालकाश्रमांचें काम हलकें होईल. कार्यकर्ते, प्रचारक, वैदिक, हरिदास, पुराणिक यांना आश्रय मिळेल. उपासनेचा गजर व धर्मजागृति होईल. सामुदायिक प्रार्थनेंत हजारो लोक भाग

येतील व धर्मावरील संकटाचा प्रतिकार करण्यास जनता सज्ज होईल. पण यापैकीं कोणत्या गोष्टी घडून येत आहेत ?

मंदिरें खासगी मालकांची न राहतां सार्वजनिक होतील, योग्य अधिकारी पंचाच्या ताब्यात तीं जातील, जनतेकडून मंदिरास भरपूर द्रव्यसाह्य होऊं लागेल, तेथें श्रीसमर्थांनीं सांगितल्याप्रमाणें अर्चनभक्ति घडेल, तर च मंदिरें हीं धार्मिक चळवळीचीं केंद्रस्थानें शोभतील व त्या ठिकाणीं मूर्तिपूजेच्या अधिष्ठानावर जनसेवा योग्य प्रकारें घडेल. अर्चनभक्तीचें हें समर्थस्वरूप जनतेच्या ध्यानीं येईल तो सुदिन !



## ( ७ )

# सगुण उपासना

( लेखक – रा. अनंत सखाराम पणीकर, अहमदाबाद )

औंध येथील ' पुरुषार्थ ' मासिकाच्या मे महिन्याच्या अंकांत नामस्मरणा-संबंधानें एक छोटासा लेख आला आहे. लेखकानें त्या लेखांत नामस्मरणाची महति वर्णिली आहे. नामस्मरणाच्या पुढील पायरी म्हणजे उपासना, त्या उपासनेविषयीं अल्प असे माझे विचार रामदासी मासिकाच्या वाचकांपुढें मांडावे असें मनांत येतें.

उपासना दोन प्रकारची आहे : एक सगुणोपासना व दुसरी निर्गुणोपासना. निर्गुणोपासना ही च अंतिम उपासना होय. सगुणोपासना ही नित्य व्यवहारांतली असल्यामुळें उपासनेचा तो राजमार्ग होय. श्रीसमर्थ म्हणतात :

सगुणाचेनि आधारें । निर्गुण पाविजे निर्धारें ।
सारासारविचारें । संतसंगें ॥ ६-६-५५

तेव्हां निर्गुणाकडे वळण्याचा सोपान म्हणजे सगुणोपासना. त्या सगुणोपासनेविषयीं आज थोडा विचार करावयाचा आहे. निर्गुणोपासना कळत नाहीं म्हणून, आणि प्रत्यक्ष प्रमाणाचे अभावीं सगुणोपासनेवर विश्वास बसत नाहीं म्हणून, अविश्वासाच्या मार्गाकडे वळून जनता आडमार्गानें जाऊं लागते, आणि श्रीसमर्थांनीं म्हटल्याप्रमाणें

निर्गुण नेलें संदेहानें । सगुण नेलें ब्रह्मज्ञानें ।
दोहिंकडे अभिमानें । घोस केलें ॥ १४-५-९

अशी जनतेची स्थिति होते. आणि म्हणून श्रीसमर्थ प्रचीतीनें सांगतात :

तरी आतां ऐसें न करावें । रघुनाथभजनीं लागावें ।
तेणें चि ज्ञान बोलावें । चळेना ऐसें ॥ ६-७-२८
करी दुर्जनाचा संव्हार । भक्तजनासी आधार ।
ऐसा हा तों चमत्कार । रोकडा चाले ॥ २९

मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघें चि नासोन जातें ।
कृपा केलियां रघुनाथें । प्रचित येते ॥ ३०
रघुनाथभजनें ज्ञान जालें । रघुनाथभजनें महत्व वाढलें ।
म्हणौनियां तुवा केलें । पाहिजे आधीं ॥ ३१
हें तों आहे सप्रचित । आणी तुज वाटेना प्रचित ।
साक्षात्कारें नेमस्त । प्रत्ययो करावा ॥ ३२

याप्रमाणें स्पष्ट व साध्या शब्दात आपल्या स्वानुभवाचा आणि प्रचीतीचा उपदेश श्रीसमर्थ जनतेला करीत आहेत. कोणाला श्रीराम विघ्नहर्ते वाटतात, कोणाला श्रीविठोबा विघ्नहर्ते वाटतात, तर कोणाला श्रीकृष्ण विघ्नहर्ते वाटतात, आणि या *सर्वांच्या साक्षी आपआपल्या उपास्यदेवतेसंबंधानें सारख्या च खात्रीच्या असतात.* मग प्रश्न असा येतो कीं, त्या श्रीराम, श्रीकृष्ण व श्रीविठ्ठलाचें सत्व आता च कोठें गेलें ? प्रचीति का येत नाहीं ? व प्रचीति जर येत नाहीं तर त्याना मानावें तरी कसें ? शंका योग्य आहे, परंतु

येव्ह्या देखिल्यासाठीं । उठिवणा कराव्या ग्रंथकोटी ।
संतामहंताच्या गोष्टी । त्या हि मिथ्या मानाव्या ॥ ६-८-२

हें बरें नव्हे, अशा रीतीनें संतानीं स्वानुभवानें सांगून ठेवलेल्या वचनावर हरताळ फासणें बरें नव्हे. *श्रीसमर्थांचे ते च राम, श्रीतुकारामांचे ते च विठोबा,* आणि श्रीमिराबाईचे ते च कृष्ण आज हि ती च प्रचीति देतील, परंतु

कांहीं च भक्ती केली नस्तां । आणी इछिती प्रसन्नता ।
जैसें कांहीं च सेवा न करिता । स्वामीस मागती ॥ १८-७-२

अशी तर आमची स्थिति झालेली आहे, जणूं काय ही संवय च आम्हाला जडून गेली आहे. काहीं च सेवा न करिता वेतन मागणाऱ्या सेवकाला कोणता स्वामी *वेतन देईल ? काहीं च भक्ति केली नसता कोणती देवता सत्वावर प्रसन्न होईल ?* श्रीरामकृष्णविठ्ठलादींच्या, आपआपल्या उपास्यदेवताच्या, सगुणोपासनेच्या बळावर च श्रीसमर्थतुकारामादि सर्व भक्त आपआपलीं सर्व कार्यें करीत असत व त्यात त्याना यश येत असे. पण आम्हाला तर असा काहीं च प्रत्यय येत तर नाहीं च, पण उलट असा अनुभव येतो कीं, *श्रीरामकृष्णविठ्ठलादींच्या* सगुण मूर्ति उचलून फेकून देण्यास कोणी दुष्ट प्रवृत्त झाला असता हि तीं तीं दैवतें त्या दुष्टाचा प्रतिकार हि करीत नाहींत ! आणि म्हणून ' हें कसें ' हा प्रश्न सहाजिक च येथें उपस्थित होतो; पण थोडा विचार केला असता या प्रश्नाचें उत्तर मिळण्यासारखें आहे. एक

दोन दृष्टांत घेऊन, शाखाचंद्र न्यायानें, याविषयीं थोडासा विचार केल्यास वरील शंकेचें निरसन होणार आहे. दृष्टांतांच्या बाबतींत सर्वसाधारण एक नियम लक्षांत ठेवणें जरूर आहे, आणि तो नियम हा कीं,

दृष्टांत तितुका येकदेशी । देणें कळाया वस्तुशी ।

येवढें लक्षांत ठेवून वाचकांनीं खालील दृष्टांतांचा नीट मननपूर्वक विचार करून आपआपलीं मतें बनवावीं, अशी विनंति आहे.

दृष्टांत पहिला — कल्पना करा कीं, एका वीराजवळ एक लाठी आहे. त्याला विचारिलें असतां तो स्वानुभवानें सत्य सांगतो कीं, ही लाठी आपल्याजवळ असली तर शेकडों शत्रूंना आपण भारी होऊं आणि त्यांना जमिनीवर लोळवूं. थोड्या वेळानें घराच्या कोपऱ्यांत ती लाठी ठेवून आपला वीर बाहेर निघून जातो. तेवढ्यांत त्याचा लहान मुलगा येतो आणि त्या लाठीचा घोडा करून खेळूं लागतो. घोडा घोडा खेळतांना त्या मुलाच्या मनांत येतें कीं, बाबा ज्या लाठीचा एवढा धाक दाखवीत होते, तिचा तर आपण सहज घोडा केला आहे; असें बाहून तो हसूं लागतो. थोड्या च वेळांत ती लाठी पायांत अडकल्यामुळें तो मुलगा पडतो, त्याचा हात मोडतो, दांत पडतात व तो रडूं लागतो. तें रडणें ऐकून त्याची आई येते, आणि झालेला प्रकार पाहून आपला राग त्या लाठीवर उगवते, आणि ती लाठी चुलींत घालून जाळून टाकते. त्यावेळीं तिच्या मनांत येऊन तिला हसूं येतें कीं, काय हा वेडेपणा, जी लाठी निर्जीव आहे, जिला अग्नींत टाकून जाळली असतांना हि जी लाठी थोडा देखील प्रतिकार करूं शकत नाहीं, ती लाठी म्हणे शेकडों शत्रूंपासून आमचें रक्षण करणार ! आणि प्रत्यक्ष प्रमाणवादी त्या बाईचें हें म्हणणें तेवढ्यापुरतें खरें आहे ! वीराच्या हातांत असतांना शेकडों शत्रूंना जमिनीवर लोळविणारी लाठी बालकाच्या हातांत 'घोडा' होते आणि एका स्त्रीकडून चुलींत घालून जाळली जाते.

दृष्टांत दुसरा — श्री शिवाजी महाराजांची ती भवानी तलवार काय, किंवा कोणा हि वीराच्या हातांचें शस्त्र काय, श्री राणा प्रतापांचा तो भाला काय, हीं सर्व शस्त्रें इतकीं भारी आहेत कीं, इतरांना तें तें शस्त्र एका हातानें उचलणें च जेथें शक्य नाहीं, तेथें तें तें शस्त्र फिरवून शत्रूची मान उडविणें तर दूर च राहिलें. पण श्री शिव छत्रपति आणि श्री राणा प्रताप यांनीं आपआपल्या शस्त्रांना जिवापलिकडे जपलें आणि त्यांच्या सहाय्यानें शेकडो, नव्हे हजारों, शत्रूंच्या माना उडविल्या आणि आपलें च आपल्या राष्ट्राचें रक्षण व संवर्धन केलें हा इतिहास सर्वांना ठाऊक आहे च. या घटकेला ती च तलवार किंवा तो च भाला आमच्यापुढें आणून ठेविला तर ज्या तलवारीला किंवा भाल्याला पाहून शत्रु जीव घेऊन पळत सुटत असत, त्या च तलवारीची आणि भाल्याची हवी तशी दुर्दशा आम्ही सहज करून

टाकूं व हिंमतीनें सांगूं शकूं कीं, पहा, ज्या तलवारीला आणि भाल्याला पाहून मोठमोठे वीर पळून जात त्या या शस्त्राची आम्ही काय दुर्दशा करून टाकली.

आतां या दोन्हीं दृष्टांताचें थोडेसें स्पष्टीकरण करूं या. लाठीच्या दृष्टांतापासून बोध घ्यावयाचा तो हा कीं, इतरांना निर्जीव दिसत असलेली परंतु त्या वीराचे हातात येता च शेकडोंना 'दे माय धरणी ठाय' करावयास लावणारी ती लाठी त्या वीराचें सगुण उपास्य दैवत होय आणि त्या दैवतावाचून तो वीर कुचकामाचा होय. खरें, लाठीच्या ठिकाणीं च कांहीं सत्व आहे असें मानावें, तर वर आपण पाहिलें च आहे कीं, एका बाईनें चुलींत घालून ती लाठी सहज जाळून टाकली. एकट्या त्या वीराचें सामर्थ्य आहे म्हणावें तर लाठी बाजूस ठेवून तो शत्रूवर चाल करून गेला तर परिणाम काय होणार हें उघड च आहे. दुसऱ्या दृष्टांतात ती च भवानी तलवार व तो च भाला, परंतु श्री शिवछत्रपतींचे हातीं किंवा श्रीराणाप्रतापांचे हातीं हीं शस्त्रे जोपर्यंत तळपत आहेत तोंपर्यंत तीं हजारों शत्रूना यमसदनाला पोहोंचवितील. एकटी भवानी तलवार कांहीं करू शकणार नाहीं, किंवा भवानीला सोडून एकटे शिवाजी महाराज कांहीं करू शकणार नाहींत. परंतु जेव्हा तें शस्त्र, शस्त्राला हातीं धरणारा अधिकारी वीर व त्या शस्त्राला हातीं धरण्याची क्रिया एकत्र होतील, म्हणजे उपासनेच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास उपास्य, उपासक, आणि उपासना, ही त्रिपुटी जेव्हा एकरूप होऊन कार्य करतील तेव्हा च कांहीं कार्य होईल. या तिन्हींपैकीं एक जरी उणें असेल तर कार्य घडणें शक्य च नाहीं, हें निःसंशय होय.

या च न्यायानें सगुणोपासना, संत म्हणतात त्या प्रमाणें, विश्वाचें पालन करणारी होईल. श्रीसमर्थ म्हणतात :

उपासना धुंडून पाहिली । तो ते विश्वपाळिती जाली ।

आपल्या उपासनेचें स्पष्टीकरण लहान मुलाला हि समजेल अशा अगदीं सोप्या भाषेंत श्रीसमर्थांनीं केलें आहे. श्रीसमर्थ म्हणतात

आमुचे कुळीं रघुनाथ । रघुनाथें आमुचा परमार्थ ।
जो समर्थांचा हि समर्थ । देवा सोडविता ॥ ६-७-२१

त्याचे आम्ही सेवकजन । सेवेकरिता जालें ज्ञान ।
तेथें अभाव धरिता पतन । पाविजेल कीं ॥ २२

करी दुर्जनाचा संव्हार । भक्तजनासी आधार ।
ऐसा हा तों चमत्कार । रोकडा चाले ॥ २९

अशी ही उपासना श्रीसमर्थांनी आजन्म केली, व जगोद्धार केला. इतकें सांगून हि जर कोणी दुर्लक्ष करील तर त्यास श्रीसमर्थ स्पष्ट शब्दांत सांगत आहेत कीं,

हरीहर ब्रह्मादिक । हे जयाचे आज्ञाधारक ।
तूं येक मानवी रंक । भजेसिना तरी काय गेलें ॥ ६-७-२०

तात्पर्य, हा जो सगुणोपासनेचा मार्ग अन्योन्यसंबंधाचा दाखविला आहे, त्याचें रहस्य न कळून उगा च सब झूट म्हणण्यांत काय अर्थ आहे ? ज्याप्रमाणें वरील दृष्टांतांतील निर्जीव वाटणारी लाठी किंवा भवानी वीराचे हातीं येते, तेव्हां ' करी दुर्जनांचा संव्हार ' ही प्रचीति येते व त्या बालकाप्रमाणें किंवा स्त्रीप्रमाणें एकाद्या नेभळटाच्या हातीं जाईल तर त्याचे स्वतःचे व त्याबरोबर त्या साधनाचे धिंडवडे उडतील, त्याचप्रमाणें उपास्य दैवत आणि उपासक यांची स्थिति आहे. श्रीसमर्थतुकारामांच्या काळीं त्यांचे श्रीराम आणि विठोबा समर्थतुकारामांना सहाय्य करीत होते आणि श्रीसमर्थतुकाराम जगाला छातीठोकपणें सांगत होते कीं,

ऐसा हा तों चमत्कार । रोकडा चाले ॥

त्या काळीं आलेली प्रचीति आज हि कां येणार नाहीं ? जरूर येईल. पण त्या तसल्या उपासनेच्या अभावीं जी त्या लाठीची दुर्दशा झाली, ती च दुर्दशा आज आपल्या उपास्यदेवतांची होत आहे; आणि हा आपला रोजचा च अनुभव आहे. यांत दोष कोणाचा हें ज्याचें त्यानें स्वतःच ठरवावयाचें आहे.

' आई चिंता करितो विश्वाची ' असें बालपणीं आपल्या मातेला सांगणारे श्रीसमर्थ मायापाश तोडून आणि प्रत्यक्ष जन्मदात्या आईचा हि त्याग करून निघाले व कृष्णातटाकीं आले आणि आमरण श्रीरामउपासना चालवून त्या उपासनेच्या बळावर त्यांनीं धर्मकार्य व राष्ट्रकार्य साधिलें. जनतेची उदासीन वृत्ति पाहून श्रीसमर्थांना अति वाईट वाटे. ते म्हणतात :

अग्न गृहासी लागला । आणि सावकास निजेला ।
तो कैसा म्हणावा भला । आत्महत्यारा ॥ ११-३-७

तरी आतां ऐसें न करावें । बहुत विवेकें वर्तावें ।
इहलोक परत्र साधावें । दोहीकडे ॥ ९

इतकें च नव्हे, परंतु व्यवहारांत वागणाऱ्या सर्व प्रपंची जनांना श्रीसमर्थ सांगतात :

ज्या ज्याचा जो व्यापार । तेथें असावें खबरदार ।
दुश्चितपणें तरी पोर । वेढा लावी ॥ १९

यापेक्षां आणखी स्पष्ट काय हवें ! हें सर्व कशाच्या बळावर केलें असें श्रीसमर्थांना विचारलें तर श्रीसमर्थ स्पष्ट उत्तर देतील कीं, रघुनाथ स्मरून व त्याची उपासना चालवून आपण हें सारें केलें.

रघुनाथ स्मरोनि कार्य करावें । तें तत्काळ चि सिद्धी पावे ।

महाराष्ट्राला पुन्हां एकदां त्या रघुनाथ उपासनेचें वेड लागो आणि पुन्हां तो भाग्याचा दिवस लाभो ही च श्रीसमर्थचरणीं अंतिम प्रार्थना.

तारीख ८-६-१९४०



## (८)

# श्री रोकडारामांची पुण्यतिथी

(१) *नागपुरचे सेवानिवृत्त प्रिन्सिपॉल रा. दामोदर केशव ओक यांनीं मला* पत्र पाठवून कळविलें कीं, " श्री सांप्रदायिक विविध विषय, प्रथम खंड, पृष्ठ ७८ वर श्री रोकडारामांची पुण्यतिथी शके १५८८ अशी दिली आहे ती बरोबर नसावी, कारण ' ते श्रीसमर्थांचे शिष्य नसून प्रशिष्य होते. ' ( पृष्ठ ७३ पहा. ) हा शक १६८८ असावा असें वाटतें. "

(२) रा. ओक यांची शंका बरोबर दिसते. मात्र रा. ओक यांनीं दिलेलें कारण निर्णायक नसलें, तरी ज्यावरून कदाचित् शंका येऊं शकेल असें तें कारण होऊं शकतें इतकें खरें. *श्रीसांप्रदायिक विविध विषय, प्रथम खंड, या ग्रंथाच्या* पृष्ठांक ७२ ते ८० वर " बाळकरामांचे शिष्य रोकडाराम " हा लेखांक आलेला आहे. त्यांत पृष्ठ ७८ वर ' शके १५८८ चैत्र वद्य १३ स रोकडारामांनीं आपला अवतार संपविला ' असें म्हटलें आहे. हा १५८८ शक बरोबर नसावा, त्या ऐवजीं १६८८ पाहिजे, अशी शंका रा. ओक यांनीं प्रदर्शित केली आहे.

(३) त्या च लेखांकाच्या ७७।७८ पृष्ठांवर रोकडारामांचे शिष्य विठ्ठल किंकर यांनीं रोकडारामांवर केलेलें एक अष्टक दिलें आहे, त्याचे पहिले तीन श्लोक असे :

गुरु रोकडाराम तो रामदासी । महा सिद्ध योगी स्वरूपी उदासी ।
*तिहीं टेविला देह तो चैत्रमासीं । तिथी तेरसी वद्य पक्षीं क्षितीसी ॥ १*
असे वार अंगार * मध्यान्हकाळीं । दिवा रोकडे नाथ ते धर्मशाळीं ।
ऋतु श्रेष्ठ षट्कामधें त्या वसंतीं । गुरुराज वैकुंठधामासि जातीं ॥ २
उडु रेवती प्रीतियोगीं सुकाळीं । व्यया नाम संवत्सरीं शिष्यमेळीं ।
मुखीं राम बोलोनि चिन्मात्ररूपीं । मिळाले गुरु निर्विकार स्वरूपीं ॥ ३

---

* मंगळवार

यावरून स्पष्ट होतें कीं, व्यय नाम संवत्सराच्या चैत्र महिन्यांतील वद्य पक्षाच्या त्रयोदशीला, मंगळवारीं, रोकडारामानीं आपला देह पंचभूतांच्या हवालीं केला.

( ४ ) रा. ओकांचें पत्र येतां च मी हा लेखाक वाचला आणि वरील श्लोक वाचून 'मोडकजत्री' आणि 'खरेजंत्री' या दोन सहाय्यक ग्रंथांकडे वळलों. खरेजंत्रींत शक १५८८ ला 'पराभव' संवत्सर असून चैत्र वद्य १३ ला रविवार आहे. त्यामुळें १५८८ हा शक चूक आहे इतकें ठरलें. नंतर शक १५६८, १६२८ व १६८८ या तीन शकांना 'व्यय' संवत्सर असल्यामुळें त्याचा संदर्भ पहाणें जरूर झालें. रोकडाराम हे श्रीसमर्थांचे शिष्य नसून प्रशिष्य असल्यामुळें त्याच्या पुण्यतिथीचा शक १५८८ जर संभवत नाहीं, तर १५६८ तर मुळींच संभवणार नाहीं, हें उघड आहे शिवाय खरे-जंत्रीवरून १५६८ च्या चैत्र वद्य १३ ला शुक्रवार असल्याचें दिसून येतें. तेव्हां शक १५६८ हि संभवत नाहीं. शक १६२८ च्या चैत्र वद्य १३ ला रविवार होता असें खरे-जंत्री सांगत असल्यामुळें १६२८ हा शक बाजूस सारावा लागतो. मोडक-जंत्रींत शक १६८८ पहातां त्या वर्षी चैत्र महिना अधिक आला होता आणि अधिक चैत्राच्या वद्य १३ ला सोमवार होता, असें दिसतें. चैत्राच्या वद्य १२ ला मंगळवार आणि वद्य १४ ला बुधवार असून त्रयोदशीचा क्षय दिसतो तिथींच्या क्षयवृद्धीबद्दल जंत्रीच्या प्रस्तावनेंत रा. बाळाजी प्रभाकर मोडक लिहितात " सूर्योदयीं किंवा त्याच्यापूर्वी ज्या तिथीस आरंभ होतो ती तिथि त्या दिवसाची समजतात. आणि ज्या तिथीचा आरंभ सूर्योदयानंतर होतो व त्या च दिवशीं तिची समाप्ति होते, ती तिथि दुसऱ्या दिवसाची असें समजून तिचा क्षय धरितात." याचा अर्थ असा कीं, १६८८ चैत्र वद्य १२ ला मंगळवारीं सूर्योदयीं द्वादशी होती, आणि सूर्योदयानंतर त्रयोदशी सुरू होऊन त्या च दिवशीं तिची समाप्ती झाल्यामुळें त्रयोदशीचा क्षय झाला आणि दुसऱ्या दिवशीं म्हणजे बुधवारीं सूर्योदयाला चतुर्दशी होती तेव्हां रोकडारामाची पुण्यतिथी शक १६८८ चैत्र वद्य १३ म्हणजे १६८८ चैत्र वद्य १२ सह १३ मंगळवार ( ता. ६ मे १७६६ ) ही होय, असें वाटतें. जाणत्यानीं निर्णय करावा.

( ५ ) १५८८ हा शक निःसंशय चूक आहे, हें आपण पाहिलें च आहे. त्या लेखाच्या मूळ हस्तलिखितात च हस्तदोषानें १६८८ ऐवजीं १५८८ पडलें होतें, कीं ६ चें ५ होण्यास 'छापखान्यांतील भूत' कारणीभूत झालें हें समजण्यास आज मार्ग नाहीं. रा. ओक यानीं ही चूक निदर्शनास आणली याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

ग. श्री. दे

१८६२ मार्गशीर्ष शुद्ध ९

( ९ )

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील

## एक अपूर्व ग्रन्थ

## जयबोध

( लेखक – शंकर श्रीकृष्ण देव )

माझ्या कल्पनेप्रमाणें या मंदिरांत जे चार पाचशें लहान मोठे अप्रकाशित ग्रन्थ आहेत त्यांत जयरामकृत जयबोध हा एक अपूर्व ग्रंथ आहे. तो जसा अपूर्व आहे, तसा च प्रचंड हि आहे. त्याची नुसती ओवीसंख्या १९०७४ आहे, म्हणजे नाथभागवताहून हि तो थोडा मोठा आहे. प्रकाशित भागवताची ओवीसंख्या १८७९८ आहे. हा ग्रंथ मला माझे एक परम मित्र कै. गोविंद काशीनाथ चांदोरकर यांच्या कृपेनें मिळाला होता व त्याला आज श्रीसमर्थ-वाग्देवतामंदिरांत क्रमांक १५९१ वें स्थान प्राप्त झालें आहे. या ग्रन्थाचें वाचन मी नुकतें च संपविलें, म्हणून त्याची आज वाचकांस हि ओळख करून द्यावी, असें मनांत येतें.

श्रीमत् दासबोधाच्या ७७५१ ओव्यांचा जयरामांनीं या ग्रन्थांत १९०७४ ओव्यांत विस्तार केला आहे. दासबोधाचे २० दशक तर जयबोधाचे २० अध्याय. त्यांनीं दासबोधांतील दोन तीन हजार ओव्या जशाच्या तशा च जयबोधांत घेतल्या आहेत व आणखी दोन चार हजार ओव्या, थोडा फार फरक करून घेतल्या आहेत. दासबोधाच्या २० दशकांत ज्या ज्या विषयाचें विवेचन आहे, क्रमशः ते च विषय जयरामांनीं विवेचिले आहेत. दासबोधांतील कठीण स्थळांचा अर्थ लावण्याला या ग्रन्थाचा फार उपयोग आहे.

इतकें सारें खरें असून अत्यंत आश्चर्याची गोष्ट अशी कीं, आपण दासबोधग्रन्थाधारें लिहित आहोंत, किंवा दासबोधाची टीका लिहित आहोंत, त्याचा विस्तार करीत आहोंत, असें कांहीं तरी चुकून सुद्धां कोठें, सबंध ग्रन्थांत, जयरामांनीं म्हटलें नाहीं. हा ग्रन्थ लिहित असतां दासबोधग्रन्थाची प्रत जयरामांच्या

सारखी हाताशी होती, असली पाहिजे, याविषयीं शंका नाहीं. मी जयबोध ग्रन्थ, अनेक कारणांसाठीं, अत्यंत उत्सुकतेनें वाचला. मला माझ्या अनेक प्रश्नांची उत्तरें पहावयाची होती,-दासबोधांतील ओंव्या जयराम कशीं उलगडतात तें पहावयाचें होतें, श्रीसमर्थांविषयीं ते काय म्हणतात हें जाणण्याची उत्सुकता होती, अफझुलखानाच्या वधप्रसंगीं सांगितलेल्या १८४६ या रामाधाचा संदर्भ जयरामांच्या तोंडून ऐकण्याची मला तळमळ लागली. होती, इत्यादि कारणांनी माझें चित्त या ग्रन्थानें सारलें वेधून घेतलें होतें. अध्यायामागें अध्याय वाचीत चाललों, तशी माझी उत्सुकता वाढत चालली, २० वा अध्याय आला,.तरी श्रीसमर्थांविषयीं कोठें कृतज्ञतेचा उद्गार आढळला नाहीं, तेव्हां वाटले, २० वा अध्याय संपवितांना तरी, आपला ग्रन्थ म्हणजे केवळ दासबोधग्रन्थाचा विस्तार होय, अशी कबुली जयराम देतील, पण, या बाबतींत जयरामांनीं माझी निराशा केली व मला आश्चर्य करीत च ठेवलें. उलट, आपणांस हें सारें ज्ञान आपल्या सद्गुरूच्या कृपेनें झालें, ते स्फूर्ति देत आहेत आणि आपण लिहित आहोंत, असें अनेक ठिकाणीं उद्गार काढीत, दासबोधाचा उल्लेख न करतां, जयराम हे दासबोधांतील ओंव्यामागें ओंव्या उतरून घेत होते. एक तऱ्हा अशी पाहिली, पहिलीं तीन चरणें शब्दशः दासबोधांतलि कायम ठेवून चवथें चरण मात्र थोडें लांबवावयाचें !

त्यांनी श्रीसमर्थांचा किंवा दासबोधाचा मुळीं च उल्लेख केला नाहीं, असें नव्हे. दुसऱ्या अध्यायांत नमन करतांना इतरांबरोबर रामदासांना हि नमन केलेलें आहे :

श्री ज्ञानराज ज्ञानमूर्ति । येकनाथ रामदास स्वानंदस्थिति ।
श्री मुकुंदराज तुकाराम चिन्मयधृति । नामदेव युक्ती नमन त्या ॥ ५७

आणि चवथ्या अध्यायांत इतर ग्रन्थांबरोबर दासबोध आणि आत्माराम यांचा हि निर्देश आदरानें केलेला आहे.

श्रीज्ञानेश्वरी भागवत । ग्रंथसिंधु हा प्रख्यात ।
दासबोध ज्ञान संत । श्रवणयुक्त हे ग्रंथ ॥ ९४

अमृतानुभव सिद्धांतीचा । स्वात्मानुभाव श्रीस्वामीचा ।
स्वात्मसुखी स्वात्मसुखाचा । निज ज्ञानाचा निजलाभ ॥ ९६

आत्माराम रामदासी । पूर्ण ज्ञान तेजोरासी ।
शब्द घदले निशब्देंसी । स्वानुभूतीसी सुकाळ ॥ ९७

श्रीविवेकसिंधु ज्ञानेश्वरी । भागवताचें मनन करी ।
अर्थ पाहे बहु कुसरी । श्रीसद्गुरुघरीं जाउनी ॥ १०६

एवढे च उल्लेख काय ते. पण दासबोध ग्रन्थ पुढें ठेवून दशकामागें दशक आणि समासामागें समास यांचें क्रमशः निरूपण करीत असता हि तसें आपण करीत आहोंत, असें जयरामानीं कोठें हि स्पष्टपणे तर म्हटल नाहीं च, पण ध्वनित हि केलें नाहीं. किंबहुना,

मना सत्य तें सत्य याचें वदावें ॥

ही आज्ञा प्रमाण मानून मी असें म्हणू शकतों कीं, आपण आपल्या सद्गुरूच्या कृपेनें पण स्वतंत्रपणें ग्रन्थरचना करीत आहोंत, असा च भाव जयरामानीं अनेक ठिकाणीं आणला आहे. हें असें कां घडलें हें मला कोडें वाटतें व त्याचा मला उलगडा होत नाहीं.

मी हा ग्रन्थ अत्यंत प्रेमानें आणि आतुरतेनें वाचला असल्यामुळें, वरील कोडें कायम ठेवून हि, मी निःशकपणें म्हणू शकतों कीं, ग्रन्थ पूर्णपणें प्रासादिक आहे. ७७५१ ओव्यांचा १९०७४ ओव्या इतका विस्तार करणें गुरुकृपेवांचून शक्य नव्हे

ही प्रत खुद्द ग्रन्थकाराच्या हातची आहे व खुद्द पुण्यास आणि पुणें प्रांतीं राहून च ग्रन्थकारानें हा ग्रन्थ रचला आहे त्याचा रचनाकाळ हि महत्त्वाचा आहे. पहिला अध्याय शके १६९९ त रचला गेला, दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं रचनाकाळ दिलेला नाहीं. पण मग तिसऱ्या अध्यायापासून तों विसाव्यापर्यंत सर्व ग्रन्थ १७०१ च्या वैशाखापासून तों आश्विनापर्यंतच्या सहा महिन्यांत च रचला गेला असें दिसतें. या ग्रन्थाच्या रचनेचें स्थळ आणि रचनाकाळ हीं दोन्हीं एका दृष्टीनं महत्त्वाचीं आहेत. कांहीं कांहीं आधारांवरून मी असें मानीत आलों आहे कीं, श्रीसमर्थांच्या पश्चात् त्यांच्या शिकवणीचें स्मरण महाराष्ट्राला आणि विशेषतः राजकारणी पुरुषांना शंभर वर्षें निश्चित होतें, नंतर तें स्मरण कमी कमी होत त्याचें पूर्ण विस्मरण आणि पेशवाईचा अंत हीं एका च काळीं झालीं. श्रीसमर्थांचा नामनिर्देश न करतां त्यांच्या तत्त्वज्ञानाचा जसा या ग्रन्थानें पुरस्कार केला आहे, त्या च प्रमाणें श्रीमत् दासबोधाचा उल्लेख न करता शके १७०४ त कोणी माधवराव अनंत वेदांती यानीं अकराव्या दशकाच्या पांचव्या समासातील श्रीसमर्थ-संप्रदायाचीं लक्षणें श्रीमंत राजश्री पंत प्रधान सवाई माधवराव यांना उपदेशिलीं होतीं, असें मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें – खंड ६ वा – लेखांक ४३६ या पत्रावरून दिसतें. या माझ्या मताचा, या ठिकाणीं, विस्तार करणें अप्रस्तुत होईल, पण अनेक प्रमाणांवरून मीं मात्र माझी समजूत करून घेतली आहे कीं, " श्रीसमर्थ हे महाराष्ट्राचे प्राण होत, त्यांचें विस्मरण म्हणजे महाराष्ट्राचें मरण होय, पण त्यांच्या चरणांवरून महाराष्ट्राची दृष्टि न ढळेल, तर महाराष्ट्र अमर होईल, त्यास कोणी मारूं शकणार नाहीं ! "

हा ग्रन्थ छापला जाण्याचा काळ माझ्या दृष्टिपथांत येत नाहीं. म्हणून तो वाचीत असतां मी माझ्या उपयोगासाठीं जें टाचण करीत गेलों, त्यापैकीं कांहीं

भागे वाचकांस हि उपयुक्त वाटेल, अशा समजुतीनें येथें सादर करतो. त्यावरून या ग्रन्थाचे कर्ते खास्ती श्रीसमर्थांना वाट पुसत कसे चालले आहेत, हें हि वाचकांच्या प्रत्ययास येईल. श्रीसमर्थवाङ्मयाचा – विशेषतः दासबोधाचा – ज्यांना खोल अभ्यास करावयाचा असेल त्यांनीं स्वतः हा ग्रन्थ अवलोकिला पाहिजे, हें उघड आहे.

**अध्याय १** – ओवीसंख्या ४९७; पत्रें ४६

रचनाकाळ –

शके सोळासें येक्याणव । खर संवछर दीपोत्छव ।
कार्तिक शुध्ध वारविभव । गुरुवार नाव मंगळी ॥ ४९६

इति श्री ग्रंथ जयबोध । गुरुशिष्यसंवाद ।
जाला चंदनसंवाद । मूर्ख भेद पुढें आहे ॥ ४९७

या अध्यायांत सद्गुरु, गणपति, शारदा, कुळदैवत खंडेराव, येकवीरा, श्रीनृसिंह, आत्माराम, श्रीशंकर, संतसज्जन, श्रोते, कवेश्वर, सभा, परमार्थ, नरदेह यांचें स्तवन आणि त्यांना नमन आहे. दासबोधांतील ओव्यांच्या ओव्या त्यांत आल्या आहेत.

सत्य हेतु साभिमान । त्याचें नांव निराभिमान ॥ ७४
जेथें परीक्षवंत ठकले । डोळस आंधळे जाले ।
तथापि वस्तु नवचे बोलें । संत मिनले वस्तुसी ॥ २२३
सोळा कळी सूर्य पूर्ण । कळारासी प्रकाशमान ।
परी वस्तु न संगवे प्रमाण । संत म्हूण जाणती ॥ २२४
विचित्र कळा ये मायेची । वोळखी न संगवे वस्तुची ।
मायातीत अनंताची । संतास चि वोळखण ॥ २३२
मोक्षलक्ष्मीसाळंकृत । ते हे संत श्रीमंत ।
जीव दरिद्रियां देती आंग । कृपायुक्त संत हे ॥ २४२
पालटाकारणें अंब्ल घेणें । माझीं वचनें तैसीं घ्या ॥ २८४
मी वाग्दुर्बळ मतीखळ । तुम्ही श्रोते परम सबळ ।
तुमची पूजा वाचाबरळ । धरिलें बळ मनानें ॥ २८६
गणेश सद्गुरु अभिन्न नमन । शारदा संत श्रोते जन ।
कवि सभा परमार्थस्तवन । नरदेह पूर्ण स्तवियेला ॥ ४८५

अध्याय २ – ओवीसंख्या ७९७, पत्रें ६८

त्राहे त्राहे सद्गुरुराया । आता सोडवावें जी भवभया ।
अनन्य शरण दृढ पाया । करी दया मजवरी ॥ ७४

जे प्रपंचिक अज्ञान जन । नाहीं परमार्थाचें लक्षण ।
तें चि सांगतों विवरण । मूर्खलक्षण या नावें ॥ ११०

मूर्खामाजी शिरोमणी । संसार सत्य हें चि मानी ॥ १५४

थोडा फार फरक करून अगणित ओव्या दासबोधातून घेतल्या आहेत, त्या कोठवर घ्याव्या या अध्यायात आपण क्रमश मूर्खलक्षण, उत्तमलक्षण, कुविद्यालक्षण, नरदेहस्तवन, रजोगुण, तमोगुण, सत्वगुण, सद्विद्यालक्षण, विरक्त आणि पढतमूर्ख-खूण अशा दहा गोष्टी सांगितल्या आहेत, असें, ग्रन्थकार ७८७–७९० या ओव्यात म्हणत आहेत, ह्या दहा गोष्टी दुसऱ्या कोणत्या हि नसून क्रमश दासबोधातील दुसऱ्या दशकातील दहा हि समास होत पण दासबोधातील चवथ्या समासाचें नाव भक्तिनिरूपण आहे ते या ग्रन्थात नरदेहस्तवन आहे, एवढा च फरक आहे

पुढें संसारकथा गहन । सद्गुरु सांगती कृपे करून ॥ ७९४

असा पुढच्या अध्यायाचा म्हणजे आपल्या तिसऱ्या दशकाचा उपक्रम हि करून ठेवला आहे

अध्याय ३ – ओवीसंख्या ८०३, पत्रें ७४

**रचनाकाळ व स्थल** – " वैशाख शुध्ध त्रयोदसी सौम्येवार शनिप्रदोष शुकाश शहर पुणें पेठ शनवार असमत नदीचा पूल शक १७०१ विकारी नाम संवछर श्रीसन्मुख "

ब्रह्म सद्गुरु अभिन्न भाव ॥ ७५
प्राकृत राजे काय देती । देती तें सर्वेच घेती ।
देण्हारासी च पदच्युती । ते काय देती इतरातें ॥ ७७

तैसे नव्हती सद्गुरुनाथ । अक्षयदाते स्वात्मभरित ।
परमानदें शिष्य तृप्त । निज प्राप्त म्हणोनिया ॥ ८१

गणेश म्हणजे च सद्गुरु मयोरेश्वर, अंबा, विठ्ठल, श्रोतेजन याना नमन करून जन्मदु खाची कथा आरंभिली आहे

*तिसऱ्या दशकाला क्रमश घरून हा अध्याय आहे*

जन्म काळाची काकडी ॥ १२६

पेहानें पोट मोठें केलें ॥ १९५

पृष्ठ २९ वर समासांत मोडी लिपींत वचन दिलें आहे— " कबीर कहे जग अंधा है अंध जैसी गाय । बचडा तो मर गया झुटे चाम चटाय "

त्रिविध ताप, मृत्यु, संसार याचें वर्णन.

आतां स्वामी सद्गुरुनाथा । सोडवि संसार भववेथा ।
सीमा जाली कृपानाथा । मज अनाथा सोडवावें ॥ ५४६

संसारतापें बहु तापलों । अगाध माया भ्रमित जालों ।
प्रपंचगर्तेमाजी गेलों । निर्बुजलों अघाता ॥ ५४९

दीनोद्धारा मायबापा । विलंब न करी करावी कृपा ।
शरण शरण स्वामीस्वरूपा । सोडवि बापा त्वरेंसी ॥ ५५०

माझे पाहासी गुणदोष । आहे अन्यायाची रास ।
न कळे भक्ति न कळे भास । शरण पायास निश्चयें ॥ ५५१

सद्गुरुस्तवन करूं लागले म्हणजे जयराम प्रेमाच्या उच्चकोटीला जाऊन पोचतात. ५४६ ते ५६३ ओव्या पाठ असाव्या.

संसारमुक्तीचें कारण । वैराग्य उपरती आणि ज्ञान ॥ ५६८
दृढ वैराग्येवीण कांहीं । ज्ञान कदापि होणार नाहीं ॥ ५८३

शास्त्रीं नव्हे निर्गमगती । शिष्य गेला सद्गुरुप्रति ।
सद्गुरुकृपा जाली पुर्ती । नवविध भक्ति आज्ञापी ॥ ७७६

श्रवण कीर्तन स्मरण । पादसेवन अर्चन वंदन ।
सख्य दास्यमात्मनिवेदन । होईल कथन चतुर्थीं ॥ ७७८

*आपण कांहीं जाणत नाहीं, आपणांस कांहीं येत नाहीं, आपले सद्गुरु आपणास जसें बोलवीत आहेत, तसें आपण बोलत आहोंत, असें ग्रन्थकार या अध्यायाच्या शेवटीं दहा वीस ओव्यात म्हणत आहेत, पण आपण जवळ दासबोधग्रन्थ घेतला आहे, असें मात्र सांगत नाहींत !*

**अध्याय ४** – ओवीसंख्या ९६५, पत्रें ७०

**रचनाकाळ व स्थळ** – " सके १७०१ विकारी नाम संवत्छरे जेष्ठ शुद्ध त्रीतीया भोमवार जयरामेन लीखीत मुकाम पूणे "

हा अध्याय वाचीत असतां ग्रन्थाचें अलौकिकत्व माझ्या प्रत्ययास येत आहे. ग्रन्थकाराचें हृदय गुरुभक्तीनें पूर्ण भरलेलें असल्यामुळें त्याच्या वाणींतून अनुपम प्रसाद सहज उतरला आहे. ग्रन्थ अत्यंत प्रासादिक आहे, याविषयीं मला शंका उरली नाहीं. माझी शंका निराळी च आहे व ती कायम च आहे.

(१) प्रत्यक्ष श्री येकनाथा घरीं ।
देव आपण सेवा करी ॥ ८१

(२) ज्ञानेश्वर सिद्ध जाले । त्याचे आज्ञे रेडा बोले ॥ ९०

(३) संदेहरहित ज्ञान । तें चि साक्षात्काराचें चिन्ह ॥ १४१

(४) प्रगट रामाचें निशाण । आत्माराम ज्ञानघन ॥ ३४७

(५) नामस्मरणाची महती गातांना उदाहरणें देतात :

श्रीनिवृत्ति ज्ञानेश्वर । सोपान मुक्ताई सुंदर ।
नामदेवादि भक्त थोर । नामीं सार विश्वासले ॥ ३६४
श्रीरामदास तुकाराम । यांसी नामाचा आराम ।
भागवती पूर्णकाम । नामविश्राम वर्णियलें ॥ ३६५

(६) सद्गुरुचरण पादपीठ । हृदईं धरावें उद्भट ॥ ४१६
सद्गुरुचरण हा चि देव । सद्गुरुचरण हा चि भाव ।
सद्गुरुचरण मुक्तिठाव । ऐसा भाव असावा ॥ ४२६

(७) ४४८ ते ४५८ या अकरा ओव्यांत ब्राह्मणांचें महत्त्व वर्णिलें आहे.

(८) निसग आणि निवेदन । विदेहस्थिति अलिप्तपण ।
सहजस्थिति उन्मनी विज्ञान । अनुभव पूर्ण साताचा ॥ ४८५

(९) देव गुरु संत जन । यासी साष्टांग अभिवंदन ।
वरकड नमन पाहोन । यथान्वयानें करावें ॥ ६२८

(१०) आश्चर्य असें, दासबोधाचा चवथा दशक पुढें ठेवून विवेचन चालू असतां आधार निराळा च सांगतात :

नमन येव्हडा मंत्र सार । आणीक नाहीं साचार ।
श्रीजगद्गुरु ज्ञानेश्वर । हें चि साचार बोलिले ॥ ६३५

अध्यायाच्या शेवटीं शेवटीं हि तो च आधार उल्लेखिला आहे :

ज्ञानेश्वरें कृपा केली । सहज वृत्ति उपरति जाली ।
ध्यानभक्ति फळा आली । प्रीति केली सद्गुरुवें ॥ ९५२
सद्गुरुकृपें फळलें फळ । रेडा पढ वेद बोले ।
श्रीज्ञानराजकृपावळें । ऐसें जालें सार्थक ॥ ९५३

( ११ ) या अध्यायात पहिले आठ च भक्तीचे प्रकार सागून आत्मनिवेदन-भक्ति पुढच्या अध्यायात सागूं असें म्हणून हा अध्याय संपविला आहे.

अध्याय ५ – ओवीसंख्या ५०१, पत्रें ३९

**रचनाकाळ व स्थळ** – " शके १७०१ विकारी नाम संवत्छर जेष्ठ शुध्ध येकादसी सौम्येवार पुण्यास जयरामेन लीखीते "

हा अध्याय महत्त्वाचा आहे. तो मननपूर्वक अभ्यासिला पाहिजे. आत्मनिवेदनाचें निरूपण करण्यापूर्वी त्यात आरंभीं तत्त्वविवरण केलें असून, दासबोधात पंचीकरण जें पुढें १७ व्याच्या ८ व्या आणि ९ व्या समासात आलें आहे, तें विस्तृतपणें सांगितलें आहे. त्यामुळें पचीकरण, पंचभूतें, चत्वार देह इत्यादि ज्ञान होऊन आत्मनिवेदन भक्ति समजण्यास सुलभ होते.

सर्वे तत्त्व वोसरलें । ज्याचें त्यास अर्पण जालें ।
पाप पुण्य सहज गेलें । भिन्न राहिलें आत्मत्व ॥ ८५

पिंडब्रह्मांडातील मिळून
अष्ट देह निरसिता भलें । निवेदन जालें सहजें चि ॥ २३५

३६७ व्या ओवीपर्यंत आत्मनिवेदनभक्तीचें निरूपण चालवून मग चत्वार मुक्ति म्हणजे दासबोधातील ४ थ्या दशकाच्या ९ व्या समासाकडे जयराम वळले आहेत. म्हणजे या अध्यायांत पाचव्या दशकातील विषय न घेता चवथा च दशक सपविला आहे.

पंचम अध्याय समास केला । आत्मनिवेदनी भाव जाला ।
पुढील प्रसंगीं कथेला । गुरुनिश्चयाला होईल ॥ ४९८

अध्याय ६ – ओवीसख्या ६६४, पत्रें ५७

**रचनाकाळ व स्थळ** – " जेष्ठ वद्य षष्ठी भृगुवार पुण्यास जयरामेन लीखीते "

गुरुनिश्चय, गुरुलक्षणें, शिष्यलक्षणें, उपदेशलक्षणें, बहुधा ज्ञान, शुद्ध ज्ञान हे पांचव्या दशकातील विषय या अध्यायात आले आहेत.

ज्ञानेविण उपदेश । तो म्हणों नये निशेष ॥ ३४५

बद्ध, मुमुक्षु, साधक, सिद्ध या चलार जीवांचा विचार दासबोधाच्या पांचव्या दशकांत च आला, तो जयरामांनीं पुढील अध्यायावर टाकून-हा अध्याय संपविला आहे.

या ग्रन्थाचा एक विशेष सांगावयाचा राहिला. तो हा अध्याय वाचीत असतां विशेष नजरेंत भरतो. ग्रन्थकाराच्या हातची च ही पोथी असल्यामुळें, मधून मधून ग्रन्थकाराचें हृदय अष्टभावानें भरून येऊन मनाची जी अवस्था होई तीं ग्रन्थकारानें पोथीच्या समासांत ठिकठिकाणीं मोडी लिपींत लिहून व्यक्त केली आहे.

अध्याय ७ – ओ. सं. ८३९; पत्रें ६७

**रचनाकाळ व स्थळ** – " जयरामेन पुण्यास लेखन ॥ जेष्ठ वद्य त्रयोदसी रवीवार दोन प्रहर ॥ समाप्त ॥ " यापुढें मोडी लिपींत मजकूर आहे तो असा : " आज भोजन करून साहावा व सातवा अध्याय घेऊन इडपसरास गेलो उदेक येणार श्रीराम मगलवारी दोन प्रहरी येऊन भोजन करून आठवे अध्या आरंभ जाला "

या अध्यायांत फक्त बद्ध, मुमुक्षु, साधक, सिद्ध यांचा च विचार केला. तो श्रीमत् दासबोधाला धरून तर केला आहे च, पण अवांतर विषय हि पुष्कळ च आणले आहेत.

( १ ) बारा वर्षे गुरुद्वारासी । आंगण झाडीन स्वहस्तेसी ।
प्राप्ती करून गुरुकृपेसी । निजज्ञानासी मागेन ॥ २२७

( २ ) षड्भाव – यश श्री औदार्य । ज्ञान वैराग्य भक्ति कार्य ॥

( ३ ) महावाक्यें – शिवोहं ऋग्वेद । अहं ब्रह्मास्मि यजुर्वेद ।
अहमात्मा सामवेद । अथर्वणवेद तत्त्वमसि ॥३०४

( ४ ) *यम, नियम, त्याग, मौन, देश, काळ, आसन, मूळबंध, समता, दृष्टि, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधी इत्यादिकांचें विवेचन केलें आहे.*

( ५ ) नाहीं सुख देवासी । किंवा पृथ्वीचे भूपतीसी ।
तें सुख साधकासी । मननशीळांसी येकांत ॥ ४०२

( ६ ) *दासबोधांतील कुठल्या हि ओव्या कुठें हि हजारों घेतल्या आहेत, पण चुकून हि " संमत दासबोध " असें म्हटलें नाहीं, पण ' संमत ज्ञानेश्वरी ' ' संमत भागवत ' असें अनेकदां आढळतें.*

( ७ ) *" कर्ममार्गी संशय भरला " याचीं उदाहरणें संशयाचा धिःकार करीत ७५७ ते ७७६ ओव्यांत दिलीं आहेत.*

( ८ ) बद्ध मुमुक्ष साधकपण । सांगितलें सिद्धाचें लक्षण ।
पुढें देवभक्ताचें शोधन । होईल कथन अष्टमाध्याईं ॥ ७८३

म्हणजे सहाव्या दशकाचा विषय आठव्या अध्यायांत घेत आहेत.

**अध्याय ८ – श्लो. सं. १०५८, पत्रें ८२**

**रचनाकाळ व स्थळ** – पहिल्या च पानावर ' आषाढ शु॥ प्रतिपदा मंगळवार ' असून शेवटीं " आषाढ शुध दशमी पुण्यास जयरामेन लीखीते ॥ शके १७०० सौम्यवासर "

(१) भक्त आणि देव म्हणजे जीव आणि शिव. दोन्ही अभेद

आधीं देवासी ओळखावें । देव कवणासी म्हणावें ।
हें निश्चयासी आणावें । मग भजावें तयासी ॥ ४८

(२) पिंड-ब्रह्मांडातील देहांचें सविस्तर विवेचन

(३) ऐकें सद्गुरूचें लक्षण । क्रियेसहित ब्रह्मज्ञान ॥ ३२४

(४) प्रपंचीं असावें सुवर्ण । परमार्थासी पंचीकर्ण ॥ ३६९

(५) आपल्या सद्गुरूचें स्तवन जयरामानीं वारंवार ठिकठिकाणीं केलें आहे. तें सारें अत्यंत प्रेमळ आहे. नमुन्यासाठीं पांच सहा ओंव्या, या अध्यायातील देतों :

धन्य धन्य सद्गुरु स्वामी । काय प्रत्युपकार फेडूं मी ।
स्वामी सर्वज्ञ चूडामणी । केली सोडवणी संसारा ॥ ४५९
जरी सद्गुरु न भेटता । तरी शीण कोण माझा हर्ता ।
व्यर्थ जातों आकांता । कृपा समर्था बहु आली ॥ ४६०
नाहीं पाहिला माझा भाव । सद्गुरुहृदय कृपानुभव ।
नसता संसार केला वाव । प्रेमगौरव कृपेचें ॥ ४६१
सद्गुरुस्तवन वारंवार । करिता आनंदाचा पूर ।
लाभ होतो अपरापर । दक्ष साचार जाणती ॥ ४६२
जयासी सद्गुरूची आवडी । तयाची साचार तुटली बेडी ।
केली कृतकार्य जोडी । येढावेढी चुकल्या ॥ ४६३
जाणत्यानें गुरु भजिजे । सर्व निश्चय हा चि कीजे ।
जन्ममरण चुकविजे । पूर्ण लाहिजे समाधान ॥ ४६४

वगैरे

(६) चौदा ब्रह्में

(७) शिष्या ब्रह्मज्ञानाची किल्ली । तुज सांगतों येके चि बोली ।
जेथें कल्पना मावळली । भ्रांती जाली तयासी ॥ १०३०

(८) शेवटीं मोडी लिपींत "श्रीसद्गुरुस्वामी दयाघना तूं समर्थ आहेस हे रामचंद्रजी विनंतिपत्राचें स्मरण करून समर्थे धर्मस्थापना करावी हे विज्ञप्ति" अध्याय ९ – ओवीसंख्या ९५२, पत्रें ८२

**रचनाकाळ व स्थळ** – "आरंभ आषाढ शु॥ १५ रविवार दोन प्रहर समाप्त आषाढ व॥ ५ भृगुवार दिवस ॥ ५ ॥ जयरामेन पुण्यास लेखन"

या अध्यायांत ब्रह्मनिरूपण आहे. आरंभीं सद्गुरु, श्रीज्ञानेश्वर व श्रोतेजन यांना नमन केलें आहे.

(१) ब्रह्मज्ञानेविण उपदेश ॥ ६२
तत्त्वाचें गांठोडें शरीर ॥ ९३
तत्त्वीं तत्त्व मेळविलें । त्यासी देह नाम ठेविलें ॥ ९५

चारी युगाची वर्षसंख्या वगैरे सांगून

अनंत शक्ति होति जाति ॥ १७४
ब्रह्म जाणती शाश्वत । ते चि ब्राह्मण निश्चित ॥ १९७
जीवभूत सनातन ॥ २६४
सृष्टि मिथ्या सिद्धांत जाण ॥ २८७
निर्गुणें ज्ञानें मोक्ष होतो । सगुण काय देऊं पाहातो ॥ ४२२
जेथें मुरालें मीपण । ते चि अनुभवाची खूण ॥ ८२०
सद्गुरुभजनावरुतें कांहीं । आणीक सर्वथा थोर नाहीं ॥ ९२८
सद्गुरुकृपेवीण कांहीं । भवतरणोपाव होणें नाहीं ॥ ९३९

इत्यादि शेकडों वचनें – शब्दश: किंवा किंचित् फरकानें – दासबोधांतील.

(२) सांगितलें ब्रह्मपावन । मायोद्भवाचें निरोपण ।
शुद्ध ब्रह्माचें अनुसंधान । मायाब्रह्म जाण निरोपिलें ॥९४६
सांगितलें सृष्टीचें कथन । सगुण भक्ति केलें कथन ॥
सगुणी भजावें आदरेंकडून । हें साक्षेपानें निवेदिलें ॥ ९४७
कथिलें दृश्याचें निरसन । सारांश सांगितलें शुद्ध ज्ञान ।
अनुर्वाच्याचें निजकथन । येयाक्रमानें निवेदिलें ॥ ९४८

वाचकाच्या तेव्हां च लक्षांत येईल कीं, क्वचित् हीं च नावें सहाव्या दशकांतील समासाचीं आहेत.

**अध्याय १० – ओ. सं. ११३६; पत्रें ६६**

**रचनाकाळ व स्थळ** – आषाढ वा दशमी गुरुवार, पुणें

( १ ) ग्रन्थ निर्विवाद प्रासादिक आहे, कौतुकावह आहे, बुद्धिवंत आणि मरदवंत अशा गुरुभक्तानें च तो लिहावा ! पण दासबोधाचें ऋण मान्य करण्यांत कां आलें नाहीं ?

( २ ) पाल्हाळ न करतां या अध्यायाचा शेवट पाहूं :

अध्याय आला समाप्तीसी । यांत कथा जाली कैसी ।
पुन्हा सांगतों प्रत्ययेसी । तुज निश्चयासी कळावें ॥ ११०३
प्रथम सद्गुरुनमन । दुसरें ब्रह्मनिरोपण ।
तिसरे चौदा ब्रह्मविवरण । चौथे जाण विमळ ब्रह्म ॥ ११०४
पांचवें द्वैतनिर्शन । साहावें बद्धमुक्तलक्षण ।
सातवें अलिप्तपण । श्रवण जाण आठवें ॥ ५
नववें अध्यात्मश्रवण । साधकें पाहावें मनन करून ।
दाहावें देहातीत जाण । दश प्रश्न यापरी ॥ ११०६

म्हणजे क्रमशः सातव्या दशकाचे दहा हि समास !

( ३ ) कल्याण कल्याण कल्याण । सद्गुरुकृपा वरदान ।
जालें समाधानी समाधान । निजात्मखूण पावली ॥ ११३४

**अध्याय ११ – ओवीसंख्या १४९९ ; पत्रें ९०**

**रचनाकाळ व स्थळ** – " श्रीस्वामिसन्मुखश्रीग्रामि अधीक शुद्ध दशमी भृगुवार ॥ दोन प्रहर ॥ "

( १ ) शब्दचे शब्द, ओव्यांच्या ओव्या, विचारचे विचार, शेकडो नव्हे हजारों, दासबोधांतून घेतलेले आहेत. विस्तार हि खूप केला आहे. कांहीं अनुरूप असे नवीन विषय हि प्रतिपादिले आहेत.

( २ ) हा अध्याय म्हणजे आपला आठवा दशक.

**अध्याय १२ – ओ. सं. १२३८; पत्रें [illegible]**

**रचनाकाळ व स्थळ** – " अधीक वद्य अष्टमि गुरुवार जयरामेन लीखीते ॥ आरंभ श्रीग्रामि समास पुण्येग्रामि "

हा अध्याय म्हणजे आपला नववा दशक.

**अध्याय १३ – ओ. सं. १११०; पत्रें ९२**

**रचनाकाळ व स्थळ** – " श्रावण शु॥ प्रतिपदा गुरुवार दोन प्रहर जयरामेन लीखीते लेखन पुण्यास श्रीसद्वीध "

( १ ) या अध्यायाच्या पहिल्या ११९ ओव्यांत जयराम विशेषत आपल्या सद्गुरूचें स्तवन वर्णीत आहेत. तें त्यांचें स्वत चें, स्वतंत्र असून प्रेमळ आहे. ५९ व्या ओवीच्या बाजूला समासात " ब्रह्मानंद स्वानद जाला अधीक वद्य ९ मृगुवासर सकाळीं " असा मजकूर आहे. ओवी ७१ च्या बाजूला " सगद ( सद्गदित ) भाव जाला " असे उद्गार आहेत व ७७ व्या ओवीच्या बाजूला " सप्रेम " असा एक च शब्द आहे हे तिन्ही शेरे मोडींत आहेत. जयराम हे श्रेष्ठ प्रतीचे गुरुभक्त होते, हें निर्विवाद आहे व त्यांचे गुरु हि महान् अधिकारी असले पाहिजेत.

( २ ) १२० व्या ओवीपासून क्रमश दहावा दशक सुरु झाला.

( ३ ) निर्गुण ज्ञान सगुण भजन । सर्वा भूतीं आत्मदर्शन ।
काया वाचा आपण लीन । निराभिमान सर्वदा ॥ ७१३

( ४ ) साधु सदा जिवंत । त्यासी नाहीं जन्ममृत्य ।
समाधी असता नसतां युक्त । आहेत स्वस्त निजस्थानीं ॥ ७४७

( ५ ) आठवा समास आला आणि आतां
माझे उपासनेचा वडिवार ॥

असें श्रीसमर्थांचें वचन आहे त्यांतील ' माझे ' चा विस्तार करतांना तरी जयराम श्रीसमर्थांची आठवण काढतात किंवा नाहीं, हें जाणण्याविषयीं माझें मन उतावीळ झालें । पण

रामउपासना वडीवार । ज्ञान सागणें साचार ।
सत्य वाचा निरतर । हा निर्धार उपासनेचा ॥ ८१५

असें सांगून श्रीसमर्थांना डावलून जयराम पुढें सरकले आहेत । माझी निराशा झाली.

( ६ ) मायेला जयराम विसरज्ञान शब्दानें संबोधतात.

**अध्याय १४ – ओ. स १०१२, पत्रें ७४**

**रचनाकाळ व स्थळ –** " शक १७०१ विकारी संवत्छर श्रावण शु॥ ९ मृगुवार दोन प्रहर पुण्यास "

( १ ) हा अध्याय म्हणजे आपला दशक अकरावा त्यांत समासामागें समास, ओवीमागें ओवी दासबोधांतील आहे, पण तसा उल्लेख मात्र नाहीं.

( २ ) मधून मधून समासांत " श्रीगुरुनाथ दीनदयाळ " असें स्मरण करितात.

( ३ ) अकराव्या दशकाच्या पहिल्या समासातील ३४ व ३५ या दोन ओव्यांत जे चत्वार जीव सांगितले आहेत, त्या ऐवजीं जयरामाच्या ओव्या अशा .

जाणे जीव तो ज्ञान । नेणे जीव तो अज्ञान ।
जाणणें नेणणें पापपुण्य । आहे जाण भासासी ॥ २७९
येक जीव तो ब्रह्मांश । जेथें पिंडब्रह्मांडनिरास ।
सद्गुरुकृपा पाहिजे यास । तैंच फांस उगवतो ॥ २८०

( ४ ) सांप्रदायिक लक्षणांचा जो अकराव्या दशकाचा पांचवा समास, त्याच्या ओव्या अवघ्या २७ आहेत, त्या २७ ओव्यांचा विस्तार जयरामांनीं ५१६ ते ६३३ म्हणजे ११८ ओव्यांत केला आहे. या संपूर्ण ११८ ओव्या वाचकांस सादर कराव्या अशी मला इच्छा होते, पण विस्ताराच्या भीतीनें येथें हात आंखडतो, केव्हां तरी अन्य प्रसंगीं सैल सोडूं.

**अध्याय १५ – ओ. सं. १२४०; पत्रें ९८**

**रचनाकालस्थळ–**" श्रावण वद्ये पंचमि जयरामेन पुण्यास लीखीते ॥ "

या अध्यायांत जयरामांनीं १२, १३ आणि १४ असे तीन दशक संपविले आहेत.

*ओवी ४९ ते ४७६ बारावा दशक*
„ ४७७ ते ७७४ तेरावा दशक
„ ७७५ पासून चौदावा दशक

**अध्याय १६ – ओ. सं. ७०१; पत्रें ५६**

**रचनाकाळ–**" भाद्रपद शुद्ध प्रतिपदा मंदवार दोन प्रहर जयरामेन लीखीते ॥ "

( १ ) या अध्यायांत आरंभींच्या २९२ ओव्यांत व नंतर हि मधून मधून दासबोधाच्या बाहेरचे अवांतर विषय आले आहेत. २९३ ओवीपासून १५ वा दशक सुरू होतो.

( २ ) ओवी ५८२ पासून पंचकोशाचें विवरण आहे.

( ३ ) पीतापासून कृष्ण जालें ॥ इत्यादि १५ × ६ या कूटात्मक ओव्यांचा अर्थ जयराम करतात, तो असा :

*कैवल्य पीत निज ज्ञान । तेथुनी कृष्ण महाकारण ।*
तेथुनी जालें अज्ञान । श्याम वर्ण बोलिजे ॥ ६३३
स्थूळसूक्ष्म श्वेतासी । कृष्ण मिश्रित जालें त्यासी ।
विचार करितां ऐसीयासी । निजमुक्तीसी लाहिजे ॥ ६३४

( ४ ) दशक १५ × ६ अखेरपर्यंत च हा अध्याय संपविला आहे.

**अध्याय १७ – ओ. सं. १००४; पत्रें ७४**

**रचनाकाळ –** " भाद्रपद शुध्य द्वादसी सौम्येवार जयरामेन लीखीते ॥"

( १ ) ओवी २८ ते ८९ धर्मस्थळीचें वर्णन करून श्रीरामाची कृपा भाकली आहे.

( २ ) पुढें ३८९ व्या ओवीपर्यंत पंधराव्या दशकाचे उरलेले चार समास संपविले आहेत.

३९० व्या ओवीपासून दशक १६ × १ सुरू
५३४ ,, ,, ,, १६ × २ ,,
५६० ,, ,, ,, १६ × ३ ,,
६०० ,, ,, ,, १६ × ४ ,,
६४४ ,, ,, ,, १६ × ५ ,,
७०५ ,, ,, ,, १६ × ६ ,,
७४६ ,, ,, ,, १६ × ७ ,,
८१० ,, ,, ,, १६ × ८ ,,
८६६ ,, ,, ,, १६ × ९ ,,
९३१ ,, ,, ,, १६ × १० ,,

अध्याय १८ – ओ. सं. ७८०, पत्रें ६०

रचनाकाळ – " भाद्रपद वद्य सप्तमि मंदवार प्रहर रात्रीस जयरामेन लीहीते ॥ "

( १ ) हा अध्याय म्हणजे आपला १७ वा दशक.

( २ ) १७ × ३ × ७ यांतील ' नाजुक वारवार ' या ऐवजीं जयरामांनीं ' राजकारण ' शब्द योजिला आहे– ओवी २४२ वी.

( ३ ) १७ × ३ × १८ या ओवीचा विचार करतांना जयरामांची अवस्था कशी झाली होती ती रामासात मोडी लिपींत लिहिलेल्या उद्गारावरून प्रत्ययास येते. ते उद्गार : " या सद्गुरुचे पाय उतराई होऊ महाराज अवस्था ग॥ या॥ ५ गुरवार सकाळी "

( ४ ) त्या ओवीचा जयरामांनीं बराच विस्तार केला आहे, पैकीं पहिल्या ६ च ओव्या उद्धृत करतों :

यायु आकाश गुणमाया । प्रकृतिपुरुष मूळमाया ।
सूक्ष्मरूपें प्रचीत यावया । कठीण अन्वया हें आहे ॥ २५९
यासी पाहिजे योगसाधन । राजयोगाचें पद्मासन ।
खेचरी मुद्रा ॐ कार दर्शन । हंसगमन मनासी ॥ २६०
मन असावें सावधान । वृत्तिरूप न करूनी ध्यान ।
सर्व आवरून चेतन । निवृत्ति संधान हंसाचें ॥ २६१

तेथें पंचभूतें दिसती । मूळ रंग प्रगटती ।
अद्भुत तेज प्रकाशदीप्ती । नाद होतीं हळाचे ॥ २६२
वायोआकाशदर्शन । योगी घडे सावधान ।
प्रत्यक्ष आत्मा संवितघन । सध्य दर्शन तयाचें ॥ २६३
तो आत्मा हृदयस्थ । सर्वानंद मूळप्रांत ।
निर्गुण निर्विकार प्रशस्त । गगन समास त्यामाजी ॥ २६४

(५) ५९६ व्या ओवीच्या मागें समासांत मोडी लिपींत "अहा रे सद्गुरु मौज जाली भा वा ७ मंदवार सकाळी पितृतीथ"

(६) १७ × ६ × २० तील शिव्या सुद्धां जयरामांनीं उद्धृत केल्या आहेत. ओवी ४८६

**अध्याय १९** – ओ स. ११३१, पत्रें ८८

**रचनाकाळ** – "जयरामेन लीखीते । आश्विन शु॥ द्वितीया इदुवासर दोन प्रहरी ॥"

(१) या अध्यायांत १८ वा आणि १९ वा असे दोन्ही दशक घेतले आहेत.

(२) पहिल्या ७० ओव्यांत पढरीच्या विठोबाला नमन आहे

(३) १८५–८६ ओव्यांत ज्ञानदेवांचा उल्लेख आला आहे.

(४) ४१९ व्या ओवीपासून द. १८ × ६ सुरू होतो. अफझुलखानाच्या वधप्रसंगाचा हा समास. मला फार आशा होती. पूर्ण निराशा झाली. या समासाचा प्रसंग साधून तरी जयरामानीं सारा प्रसग वर्णन करून आपली कृतज्ञता व्यक्त करावयास पाहिजे होती।

(५) अथपासून इतिपर्यंत क्रमश: सवध दासबोध ग्रन्थ ओतला असून हि

सद्गुरूनें शिकविलें ज्ञान । तें चि बोलिलें ययामतीनें ॥ ११३१

असें च जयराम म्हणत आहेत

**अध्याय २०** – ओवीसख्या १०६७, पत्रें ९०

**रचनाकाळ व स्थळ** – "आश्विन शु ४ गुरुवार श्रीसज्जीघ जयरामेन लीखीते ॥"

सर्व अध्यायाच्या चारी कडाना जरी कसर लागलेली होती, तरी सुदैवानें कोठलीं हि अक्षरें गेलेलीं नव्हती, पण या अध्यायाचीं शेवटचीं नऊ दहा पत्रें मात्र तितकीं निभावलीं नाहींत.

(१) दासबोधांतील पहिल्या दशकांत गणेश, वेदमाता, सद्गुरु आणि सतसज्जन यांचें जें स्तवन आहे, त्याला अनुसरून या अध्यायांत आरंभीं

त्या चौघांचें स्तवन आहे, नंतर ग्रन्थकाराचे कुलस्वामी आणि कुलदैवत यांना नमन असून २१५ व्या ओवीपासून २० व्या दशकाला आरंभ होऊन ८०० व्या ओवीपाशीं तो समाप्त झाला.

यैसीं हीं विवेकाचीं कामें । उगें चि'भ्रमों नये भ्रमें ।
सारासार विचार संभ्रमें । कृपा सुगम सद्गुरुच्या ॥ ७९९
सद्गुरुकृपें जालें ज्ञान । म्हणोनी विशिष्ट गुरुभजन ।
अध्यात्म जालें येथून । आत्मा आपण निर्विकारी ॥ ८००

येथें समासांत मोडींत " श्रीसद्गुरुमंगलें जालीं कृतकल्याण जालें त्राहे मां त्राहे मां जगद्‌गुरु मयोरेश्वर आश्विन शु॥ ७ शनिवार दोन प्रहर "

( २ ) नंतर मग पहिल्या अध्यायापासून विसाव्या अध्यायापर्यंत जे विषय आले आहेत त्यांचा उल्लेख ८०१ ते ८८३ पर्यंतच्या ओव्यांत करण्यांत आला आहे. श्रीमत् दासबोधांत क्रमशः कोणते विषय आले आहेत, असें कोणी विचारल्यास त्यास या च ८०१ ते ८८३ ओव्या सादर कराव्या, म्हणजे झालें! पण यांत दासबोधाचा कोठें हि उल्लेख मात्र नाहीं ! !

( ३ ) नंतर षोडशयांत ग्रन्थाची फलश्रुति देऊन ग्रन्थकारांनीं आपली गुरुपरंपरा सांगितली आहे, ती अशी : आदिनाथ – आदिशक्ति – मच्छेंद्रनाथ – गोरखनाथ – गैनीनाथ – निवृत्तिनाथ – **श्रीज्ञानेश्वर** – सदाशिवनाथ – गणेशनाथ – उद्धवनाथ – केशवनाथ – बाळनाथ – दीनानाथ – **मयोरेश्वर** – **जयराम** ग्रन्थकार

( ४ ) नंतर जयरामांनीं आपलें स्वतःचें षोडशयांत चरित्र सांगितलें आहे. त्याचें तात्पर्य इतकें च, वैराग्य प्राप्त झालें, श्रीनाथभागवत आणि श्रीज्ञानेश्वरी यांचा छंद घेतला, समाधान होईना, लहानपणीं च वडिलांनीं श्रीद्वारकारामस्वामी-कडून **श्री राम जयराम जयजयराम** हा मंत्र देवविला होता, तो जपत होतों, वार्षिक पंढरीची यात्रा करावी, ज्ञानाविषयीं जीव तळमळूं लागला, पंढरीनाथाच्या चरणीं माथा ठेवला, देहभान गेलें, दीर्घस्वरें धावा घेतला, सद्‌गुरु तेजरूपें प्रगट झाले, **आळंदीस कार्य होईल** असे शब्द कानीं पडले, आळंदीस गेलों, पंढरीस जें रूप पाहिलें होतें तें च आळंदीस प्रत्यक्ष प्रगट झालें, तच्चरणीं कायावाचामन हीं अर्पण केलीं.

शरण जाउनी स्वामीसीं । अनुग्रह घेतला स्वानंदेसी ।
सांगोनि तारकमंत्रासी । देहचतुष्टयासी उपदेशिलें ॥ ९७१
सांगोन राजयोगाचें साधन । विहंगममार्गाचें अभ्यासन ।

माहावाक्यतत्त्वमसिज्ञान । पंचीकर्ण सांगितलें ॥ ९७२
कर्मउपासनाभक्तिज्ञान । सांगोनियां सर्व ज्ञान ।
समाधीचें समाधान । केलें संपूर्ण कृपेनें ॥ ९७३

( ५ ) नंतर पुन्हां जयरामांनीं प्रेमभरें सद्गुरुस्तवन आणि ग्रन्थगौरव करीत करीत १७०१ आश्विन व. ४ स आळंदीस श्रीगुरुच्या सांनिध्यांत ग्रन्थ संपूर्ण केला.

असा हा, मी आरंभीं म्हटल्याप्रमाणें, अपूर्व व प्रचंड ग्रन्थ आहे, ही गोष्ट वाचकांना हि पटेल. त्यांत सबंध दासबोध आला, तितका च त्याचा जयरामांनीं केलेला विस्तार आला व जवळजवळ तितका च अवांतर भाग आला. दासबोध समजण्याला याची फार मदत होणार आहे. तो छापला जाणें मला आवश्यक वाटतें, पण त्याचा प्रचंडपणा च त्याच्या प्रकाशनाच्या आड येईल, अशी मला भीति वाटते. ग्रन्थ तत्त्वज्ञानाचा आणि महत्त्वाचा आहे. त्याच्या प्रकाशनाचें कार्य कोणी अंगिकारल्यास श्रीसमर्थवाग्देवतामंदिर त्यास परवानगी देईल व संपादनाच्या कामीं सत्कार्योत्तेजक सभा साहाय्य करील, याविषयीं मला शंका नाहीं. तोंपर्यंत संदर्भ ग्रन्थ म्हणून तो मंदिरांत कोणास हि पाहतां येईल.

असें दिसतें, शके १७०० च्या सुमारास पुण्यांस हे जयराम व आळंदीस त्यांचे गुरु मयोरेश्वर असे दोघे परमार्थांत अधिकारी पुरुष होऊन गेले. त्या भागांत संशोधन केल्यास त्यांच्याविषयीं जास्त माहिती मिळणें संभवनीय आहे.

आपण श्रीमत् दासबोधाचे सर्वस्वीं ऋणी आहोंत, ही गोष्ट जयरामांनीं कां मागें ठेवली, तें मला कळत नाहीं. एवढी एक च गोष्ट मला खेदाची आणि आश्चर्याची वाटली. ती मी आज १६२ वर्षांनीं व्यक्त करीत आहे, याबद्दल जयराम आणि मयोरेश्वर यांची क्षमा मागून हें टांचण मी श्रीसमर्थचरणीं प्रेमभरें अर्पण करितों.

श्रीसमर्थवाग्देवतामंदिर, धुळें
१८६३ ज्येष्ठ शुद्ध १ सोमवार



( १० )

॥ श्री ॥

खान्हदेशांतील धुळें येथील श्रीसमर्थवाग्देवतेच्या परम पूज्य चरणीं दोन पाकळ्या अर्पण करीत आहे.

श्रीसमर्थसेवक दा. के. ओक

( १ )

# बैतुल जवळील श्रीसमर्थांच्या तपश्चर्येचें स्थान

( लेखक — प्रिन्सिपाल दामोदर केशव ओक, बी. ए., नागपुर )

ह्या पवित्र स्थानाचा उल्लेख श्री. रा. त्रिंबक रामकृष्ण गद्रे, वकील, अकोला, ह्या समर्थभक्तांनीं 'श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पिलेल्या' तिसऱ्या सुमनहारांतील 'श्रीसमर्थांचा सातपुड्यांतील संचार' ह्या लेखांत केला आहे. आमच्या सुदैवानें आम्हाला दोन महिन्यापूर्वी कांहीं कामासाठीं बैतुलास जावें लागलें व तेथें १५।२० दिवस राहाण्याचा योगहि आला. ह्या अवधींत आम्ही तिकडील कांहीं स्थळें पाहिलीं व समर्थांच्या तपश्चर्येच्या स्थळाचें दर्शन घेऊन आपणास पावन करून घेतलें.

हें ठिकाण बैतुल रेल्वेस्टेशनाच्या दक्षिणेस १–१॥ मैल अंतरावर आहे. तेथें जाण्यास चांगली सडक नसून शेतें तुडवीत रस्ता काढावा लागतो. तिकडे जाताना प्रथम माचना नदी लागते. नदीपलीकडे शिंगणवाडी हा गांव आहे. ह्या गांवचा नाला उतरून पलीकडे गेलें असतां नाल्याच्या काठींच, एका साधारण उंचवट्याच्या जागीं, बढामा नांवाच्या गांवाच्या हद्दींत हें स्थान आहे.

येथें जमिनींत एक चुनेगची घुमटी आहे. हेंच तें समर्थांचें तपश्चर्येचें स्थान होय. ह्या घुमटींत ज्यास्तींत ज्यास्त ८।१० माणसें बसतील इतकी जागा आहे. ह्या घुमटींतून बाहेर न पडतां परस्पर दुसऱ्या ठिकाणीं निघून जाण्यासाठीं भुयार आहे,

असें लोकांनीं आम्हास सांगितलें होतें. परंतु आम्ही अगदीं बारकाईनें तपासणी करून पाहिली परंतु तेथें भुयार असल्याचें आम्हांस कांहीं चिन्ह दिसलें नाहीं. ( ह्या कामासाठीं आम्ही बरोबर कंदील घेऊन गेलों होतों ). घुमटींत उतरण्यास १२।१३ पायऱ्या आहेत पण त्यांपैकीं कांहीं खचलेल्या आहेत, ह्यामुळें आंत मोठ्या सावधगिरीनें उतरावें लागतें.

ह्या घुमटीवर बराच मोठा सभामंडप होता, पण तो पडल्यास ३०।४० वर्षें झालीं. सभामंडप नसल्यामुळें घुमटीवर दरवर्षी पावसाचा मारा होतो. यामुळे ती लवकरच खचून जाईल, अशी भीति वाटते.

ह्या घुमटीजवळच एक समाधी आहे. ती ५०।६० वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या कोणा रामदासीबुवाची आहे, असें सांगतात. समाधीवर महादेवाच्या लिंगाची स्थापना केलेली आहे. येथें दरसाल वसंतपंचमीला यात्रा भरते.

अगदीं अलीकडे म्हणजे २५।३० वर्षांपूर्वी ह्या बाजूस दाट जंगल होतें. माचना नदीच्या व शिंगणवाडीच्या नाऱ्याच्या कांठावरून चढाउतरावयाचें म्हणजे बरेंच जिकीरीचें काम आहे. अगदीं एका बाजूस जंगलांत व जाण्यायेण्यास फार अडचणीच्या अशा निसर्गरमणीय स्थळीं समर्थांनीं तपश्चर्येसाठीं जागा शोधून काढणें साहजिक आहे. सध्यां तेथें समर्थकालीन खाणाखुणा आढळत नाहींत, पण समर्थांनीं ज्या काळीं सातपुड्यांत संचार केला त्यास आतां २५०।२७५ वर्षांचा काळ लोटला आहे ( समर्थांचें निर्याण शके १६०३ ). तेव्हां इतक्या वर्षांत तेथील परिस्थितींत जो पालट झालेला आपणास दिसतो तो दिसणें साहजिकच आहे. तथापि ह्या स्थळाच्या आसपास उत्खनन केल्यास समर्थकालीन अवशेष सांपडणार नाहींत असें नाहीं.

*शिंगणवाडी ह्या नांवाचा एक गांव सातारा जिल्ह्यांत आहे. त्या गांवची टेकडी चांफळपासून अर्ध्या मैलावर आहे. त्या डोंगराच्या गुहेंत समर्थ स्नान करण्यास जात असत.* शके १५७१ सालीं शिंगणवाडी येथेंच समर्थांचा शिवाजी महाराजांस अनुग्रह झाला. समर्थांनीं स्थापिलेल्या अकरा मारुतींतील एक ह्याच गांवीं स्थापिलेला आहे. अशा प्रकारें समर्थ व शिवाजी राजे यांच्या चरित्रांत शिंगणवाडीचें महत्व विशेष आहे. त्या शिंगणवाडीची प्रतिकृति समर्थांच्या तपोभूमीच्या समीप उत्पन्न करावी ह्या हेतूनें समर्थांच्या कोणा आस्थेवाईक व

' समर्थ ' ( अधिकारी ) शिष्यानें ( बैतुळजवळच्या ) शिगणवाडीचें मूळचें नांव बदलून समर्थांच्या वास्तव्याचें निदर्शक असें हें नवीन नांव दिलें असावें.

अद्यापहि हें स्थान समर्थांचें तपोवन म्हणून लोकांत प्रसिद्ध आहे. रा. गद्रे यानीं आपल्या लेखांत ह्या पवित्र स्थानाचें छायाचित्र प्रसिद्ध होणें अवश्य आहे, असें म्हटलें आहे. परंतु छायाचित्र घेण्यासारखें तेथें सध्यां कांहीं विशेष शिल्लक नाहीं.

बैतूल पासून चार पांच मैलांवर असलेल्या खेडला नांवाच्या गांवीं मुकुंदराजांच्या समाधीच्या दर्शनास जातांना सुमारें ३-३॥ मैलांवर सोमवारीपेठ नांवाच्या खेड्यांत डोंगरावर एक महावीरजीची ( मारुतीची ) मूर्ति दिसते. तिची स्थापना समर्थांनीं केली, असें तिकडील लोक सांगतात. यावरून त्यांनीं सातपुड्यांत बराच संचार केला असावा व त्यांचें वास्तव्य हि त्या प्रदेशांत बरेंच झालें असावें, असें रा. गद्रे यांचें अनुमान आहे तें चुकीचें नाहीं, असें आम्हासहि वाटतें.

धनतोली, नागपुर
वैशाख वद्य ११ शके १८६३
तारीख २१ मे १९४१



॥ श्री ॥

( २ )

# रामदास आणि मुक्तेश्वर

( लेखक – प्रिन्सिपाल दामोदर केशव ओक, बी. ए., नागपुर )

रामदास आणि मुक्तेश्वर हे दोन मोठे प्रभावी व प्रतिभाशाली थोर पुरुष शिवकालात होऊन गेले, हें प्रसिद्धच आहे. ते अगदीं समकालीन व समवयस्क होते. पहिल्याचा जन्म शके १५३० मध्यें व दुसऱ्याचा शके १५३१ मध्यें झाला. तसेंच ते एकनाथ महाराजांचे अगदीं जवळचे नातलग होते. एकनाथ हे रामदासाचे मावसे व मुक्तेश्वराचे मातामह असें त्यांचें नातें असल्यामुळे त्यांचा घरोबा विशेष असणें व परस्परांमध्यें स्नेहभाव असणे साहजिक आहे. या स्नेहसंबंधाचा परिणाम त्यांच्या ग्रंथांचें सूक्ष्म निरीक्षण करणाऱ्यांस आढळून येण्यासारखा आहे. परंतु त्यांच्या ग्रंथांचें तौलनिक दृष्ट्या आलोडन करणें आमच्या आटोक्याबाहेरचें आहे, म्हणून प्रस्तुत स्थळीं रामदासकृत दासबोधांतील मूर्खांचीं व पढतमूर्खांचीं लक्षणें आणि मुक्तेश्वरकृत उद्योगपर्वांतील मूर्खांचीं लक्षणें यांतील साम्य दर्शविणारीं कांहीं स्थळें पुढें देतों:—

१ ( रा ) बहुत जागते जन । तयांमध्यें करी शयन ॥ २-१-१५

( मु ) जागतयापुढें निजणें । कीं निद्रिस्थापुढें बैसणें ॥ ४१

२ ( रा ) जन्मला जयाचे उदरीं । तयासी जो विरोध करी ।

सखी मानिली अंतुरी । तो येक मूर्ख ॥ २-१-८

( १ ) मुक्तेश्वरकृत विराटपर्व ( आवृत्ति दुसरी ) – उपोद्घात, पृष्ठ २

( २ ) दशक दुसरा, समास पहिला व दहावा.

( ३ ) मुक्तेश्वरकृत स्फुटकाव्यें, पृष्ठें १–१३

( मु ) स्त्रियेचें वचन घेऊनि कानीं । दुऱ्हावी पिता बंधु जननी ।
वेगळा राहे सुहृदांतुनी । तो येक मूर्ख जाणावा ॥ ६५

३ ( रा ) दोघे बोलत असती जेथें । तिसरा जाऊन बैसे तेथें ॥ २-१-६३

( मु ) एकांत करितां दोघे जण । समीप जाऊनि लावी कान ॥ ५५

४ ( रा ) संगेंवीण विदेश करी । वोळखीवीण संग धरी ॥ २-१-२३

( मु ) अस्तमानीं चढे घाट । ओस पंथीं चाले पहाटे ॥ ४३

५ ( रा ) नीच यातींसीं सांगात । परांगनेसीं येकांत ॥ २-१-२९

( मु ) खाटीक तस्कर मत्स्यविक्रेता । परांगनेसीं मैत्री कर्ता ॥ ८५

६ ( रा ) समर्थावरी अहंता । अंतरीं मानी समता ।
सामर्थ्येंवीण करी सत्ता । तो येक मूर्ख ॥ २-१-११

( मु ) समर्थे करितां विनोद । आपण परतोनि दे शब्द ।
बळवंतासी चालवी द्वंद्व । तो येक मूर्ख जाणावा ॥ १९

७ ( रा ) भरोन वैभवाचे भरीं । सद्गुरूची उपेक्षा करी ।
गुरुपरंपरा चोरी । तो येक पढतमूर्ख ॥ २-१०-३४

( मु ) भाग्यकाळीं मित्रास माजे । उपदेश घेऊनि गुरूसि लाजे॥ ७४

याखेरीज समर्थकृत पदपदांतरें या पुस्तकांतील पृष्ठ ६ वरील पद २३ वें ' कंठीं गरळ ' हें मुक्तेश्वरकृत विराटपर्वाच्या शेवटीं दिलेल्या पदांतील ' पवित्र शीतल जीवनी ' या पदाशीं ताडून पाहिल्यास त्या दोहोंत कांहीं साम्य आढळून येईल.

( २ ) हें साम्य आढळून येण्याचें कारण आम्हाला असें असावें असें वाटतें कीं, या दोघांच्या वारंवार भेटीगांठी होत असाव्या. आपण आतां उद्योगपर्व रचावयास सुरुवात करणार, त्यांतील मूर्खलक्षणांच्या मूळ संस्कृत श्लोकांवर तत्कालीन परिस्थितीस अनुसरून विस्तृत भाष्य करणार, त्यांत आपण अमुक प्रकारच्या लोकांस गोंवणार अशा आशयाचें मुक्तेश्वराचें रामदासांशीं संभाषण झालें असावें. तेव्हां रामदासांनाहि वाटलें असावें कीं, आपण देखील आपल्या दासबोधांत या विषयाचें विवरण करावें व त्याप्रमाणें त्यांनीं दशक २ समास २ यांत ७४ ओव्या रचून त्यांत मूर्खांचीं लक्षणें वर्णिलीं. पण तीं पाहून

मुक्तेश्वरानें 'एकशत यारोत्तरें ओव्या लिहिल्या' असाव्या. ह्या ओव्या रामदासांच्या पाहाण्यांत आल्यावर त्यांनीं १० व्या समासांत पढतमूर्खाचीं लक्षणें ४१ ओव्यांत देऊन आपल्या ओव्यांची संख्या ११५ करुन मुक्तेश्वरावर मात केली असावी.

( ३ ) मुक्तेश्वराचें बालपण व तारुण्य जरी पैठणांत गेलें तरी प्रौढ वयांत तो दत्तोपासक होऊन नरसोबाच्या वाडीजवळ तेरवाड येथें ( कुरुंदवाड संस्थान ) जाऊन राहिला होता. चांफळ, परळी इत्यादि ठिकाणीं राहाणाऱ्या व सर्व आनंदवनभुवनांत संचार करणाऱ्या समर्थांना मुक्तेश्वरास जाऊन भेटणें किंवा मुक्तेश्वरानें एखाद्या सोयीच्या ठिकाणीं त्यांस भेटणें हें कांहीं अशक्य नव्हतें. त्यांचा नात्याचा संबंध तर होताच पण 'महा-राष्ट्र' ही आपल्या जन्मभूमीची पदवी सार्थ व्हावी ह्या उदात्त हेतूनें निरनिराळ्या प्रकारें प्रयत्न करणाऱ्या दोन विभूति वारंवार भेटत असाव्या आणि मोरोपंत आपली प्रत्येक काव्यकृति विठोबादादा चतुर्मासे ह्या आपल्या गुणग्राहक सुहृदाच्या अवलोकनार्थ पाठवीत असत, तसाच कांहींसा ह्या दोघांचा प्रघात असावा, अशी आमची कल्पना आहे.

( ४ ) मुक्तेश्वर पूर्व महाराष्ट्रांतील आपलें निवासस्थान ( पैठण ) सोडून पश्चिम महाराष्ट्रांत ( तेरवाड येथें ) येऊन कां राहिला, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. हें गूढ उकलणें सोपें नाहीं. परंतु आम्हास असें वाटतें कीं, मुक्तेश्वरास कांहीं राजकीय कारणामुळें तिकडे वास्तव्य करणें अशक्य झालें असावें आणि म्हणून त्या प्रांतांतील कामगिरी पार पाडण्यासाठीं समर्थपंचायतनांतील केशवस्वामी ह्यांनीं भागानगरास ( दक्षिण हैद्राबाद येथें ) संत-सुभेदार म्हणून ठाणें दिलें असावें व त्यांचा तेथें नीट जम बसल्यावर मुक्तेश्वर तेथून निघून नरसोबाच्या वाडीस, अर्थात् पूर्वीपेक्षां थोड्या सौम्य वातावरणांत, येऊन राहिला असावा. एका अर्थी मुक्तेश्वरानें ही मुत्सद्देगिरीची माघार ( strategic retreat ) घेतली असावी, असें वाटतें.

( ५ ) रामदासांनीं दासबोध रचनेस प्रारंभ केव्हां केला, हें नक्की कळत नाहीं. तथापि शके १५८१ मध्यें सहावा दशक चालू होता, असें त्या दशकांतील चवथ्या समासाच्या सातव्या ओवीवरुन दिसतें. अर्थात् दुसरा दशक ह्याच्यापूर्वी वर्ष- सहा महिने तरी म्हणजे स्थूलमानानें शके १५८० मध्यें लिहून झाला असला पाहिजे, हें उघड आहे.

---

( १ ) पांगारकरकृत मोरोपंतांचें चरित्र, पृष्ठ १३४

( २ ) मुक्तेश्वरकृत महाभारताचीं उपलब्ध नसलेलीं पर्वें बुडविण्यांत आलीं, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. ( मुक्तेश्वरकृत विराटपर्वास जोडलेल्या उपोद्घातांतील 'मुक्तेश्वरानें अठरा पर्वें रचिलीं होतीं काय ?' हा भाग पहावा. )

मुक्तेश्वरानें आपलें महाभारतरचनेचें काम केव्हां सुरू केलें तें समजावयास कांहीं साधन नाहीं. पण त्यानें आपलें उद्योगपर्व – कारण मूर्खांचीं लक्षणें हा भाग त्या पर्वांतील आहे – शके १५८० मध्यें किंवा त्या सुमारास रचिलें असावें, असें गृहीत धरावयास कांहीं हरकत नाहीं.

( ६ ) मुक्तेश्वराचा जन्मशक उपलब्ध आहे, पण मृत्युशक उपलब्ध नाहीं. देवदासानें आपली 'संतमालिका' शके १६०८ मध्यें रचिली. तींत मुक्तेश्वरासंबंधीं त्यानें—

मुक्तेश्वरा मुक्तदशा । दिधली तुवां जगदीशा ।
पुरवून त्याची आशा । भारथटीका वदविली ॥ ८८

असे उद्गार काढिले आहेत. यावरून शके १६०८ पूर्वीं त्याचें महाभारत पूर्ण झालें होतें, हें निःसंदिग्धपणें सिद्ध होतें.

मुक्तेश्वरानें उद्योगपर्व शके १५८० मध्यें रचिलें. त्यानंतर त्यानें पुढील पर्वें रचिलीं. त्यांतील भीष्मपर्वांतर्गत भगवद्गीता, सौप्तिकपर्व व शांतिपर्वांतील शुकरंभा-संवाद हे भाग प्रसिद्ध आहेत. त्याच्यापुढील कोणतेंहि पर्व किंवा त्याचा भाग उपलब्ध नाहीं. पण उद्योगपर्वापुढील रचना करण्यास शके १५८० नंतर कांहीं वर्षें लागलींच असतील, अर्थात् तीं किती हें अंदाजानेंच ठरविलें पाहिजे.

देवदासाच्या 'जगदीशा ! तुवां मुक्तदशा दिधली' ह्या उद्गारांवरून मुक्तेश्वर शके १६०८ पूर्वीं फारच थोडे दिवस, वर्ष दोन वर्षांच्या आंतच, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त झाला असावा. त्यानें शके १६०८ पूर्वीं कित्येक वर्षें स्वर्गलोकीं गमन केलें असतें, तर देवदासानें असे उद्गार न काढतां मुक्तेश्वराचें वर्णन निराळ्याच पद्धतीनें केलें असतें. सारांश, मुक्तेश्वराचें देहावसान, रामदास शके १६०३ मध्यें रामरूपीं विलीन झाल्यानंतर, मागाहून १।२ वर्षांनीं झालें असावें, असें समजावयास हरकत नाहीं.

( ७ ) आतां आणखी एका मुद्यासंबंधीं थोडा ऊहापोह करणें इष्ट वाटतें. ह्या दोघांच्या दृष्टीसमोर एकनाथांचें विविध, विशाल आणि स्फूर्तिदायक ग्रंथकर्तृत्व होतें. तथापि ह्या दोघांपैकीं कोणाकडून कोणास स्फूर्ति प्राप्त होत असे कीं काय, किंवा कोण कोणाचा मार्गदर्शक होता, हाच तो मुद्दा होय. ह्या बाबतींत आमची

---

( १ ) भारत-इतिहास-संशोधक मंडळाचें त्रैमासिक, वर्ष २१ अंक २ मधील 'कविवर्य मुक्तेश्वराची पुण्यतिथी' हा आमचा लेख पहावा.

( २ ) हीं सर्व प्रकरणें मुक्तेश्वरकृत स्फुटकाव्यें ( निर्णयसागर छापखाना ) ह्या पुस्तकांत छापलेलीं आहेत.

मुक्तेश्वरानें ' एकशत यारोत्तरें ओव्या लिहिल्या ' असाव्या. ह्या ओव्या रामदासांच्या पाहाण्यांत आल्यावर त्यांनीं १० व्या समासांत पढतमूर्खाचीं लक्षणें ४१ ओव्यांत देऊन आपल्या ओव्यांची संख्या ११५ करून मुक्तेश्वरावर मात केली असावी.

( ३ ) मुक्तेश्वराचें बालपण व तारुण्य जरी पैठणांत गेलें तरी प्रौढ वयांत तो दत्तोपासक होऊन नरसोबाच्या वाडीजवळ तेरवाड येथें ( कुरुंदवाड संस्थान ) जाऊन राहिला होता. चाफळ, परळी इत्यादि ठिकाणीं राहाणाऱ्या व सर्व आनंदवनभुवनांत संचार करणाऱ्या समर्थांना मुक्तेश्वरास जाऊन भेटणें किंवा मुक्तेश्वरानें एखाद्या सोयीच्या ठिकाणीं त्यांस भेटणें हें कांहीं अशक्य नव्हतें. त्यांचा नात्याचा संबंध तर होताच पण ' महा-राष्ट्र ' ही आपल्या जन्मभूमीची पदवी सार्थ व्हावी ह्या उदात्त हेतूनें निरनिराळ्या प्रकारें प्रयत्न करणाऱ्या दोन विभूति वारंवार भेटत असाव्या आणि मोरोपंत आपली प्रत्येक काव्यकृति विठोबादादा चतुर्मासे ह्या आपल्या गुणग्राहक सुहृदाच्या अवलोकनार्थ पाठवीत असत, तसाच कांहींसा ह्या दोघांचा प्रघात असावा, अशी आमची कल्पना आहे.

( ४ ) मुक्तेश्वर पूर्व महाराष्ट्रांतील आपलें निवासस्थान ( पैठण ) सोडून पश्चिम महाराष्ट्रांत ( तेरवाड येथें ) येऊन कां राहिला, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. हें गूढ उकलणें सोपें नाहीं. परंतु आम्हास असें वाटतें कीं, मुक्तेश्वरास कांहीं राजकीय कारणामुळें तिकडे वास्तव्य करणें अशक्य झालें असावें आणि म्हणून त्या प्रांतांतील कामगिरी पार पाडण्यासाठीं समर्थपंचायतनांतील केशवस्वामी ह्यांनीं भागानगरास ( दक्षिण हैद्राबाद येथें ) संत-सुभेदार म्हणून ठाणें दिलें असावें व त्यांचा तेथें नीट जम बसल्यावर मुक्तेश्वर तेथून निघून नरसोबाच्या वाडीस, अर्थात् पूर्वीपेक्षां थोड्या सौम्य वातावरणांत, येऊन राहिला असावा. एका अर्थी मुक्तेश्वरानें ही मुत्सद्देगिरीची माघार ( strategic retreat ) घेतली असावी, असें वाटतें.

( ५ ) रामदासांनीं दासबोध रचनेस प्रारंभ केव्हां केला, हें नक्की कळत नाहीं. तथापि शके १५८१ मध्यें सहावा दशक चालू होता, असें त्या दशकांतील चवथ्या समासाच्या सातव्या ओवीवरून दिसतें. अर्थात् दुसरा दशक त्याच्यापूर्वी वर्ष-सहा महिने तरी म्हणजे स्थूलमानानें शके १५८० मध्यें लिहून झाला असला पाहिजे, हें उघड आहे.

---

( १ ) पांगारकरकृत मोरोपंतांचें चरित्र, पृष्ठ ११४

( २ ) मुक्तेश्वरकृत महाभारताचीं उपलब्ध नसलेलीं पर्वे बुडविण्यांत आलीं, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. ( मुक्तेश्वरकृत विराटपर्वास जोडलेल्या उपोद्घातांतील ' मुक्तेश्वरानें अठरा पर्वे रचिलीं होतीं काय ? ' हा भाग पहावा. )

( १२ )

# समर्थांचा विक्रम

(लेखक-रा. धों. के. जोगळेकर, बी. ए., एलूएल्. बी., चाळिसगांव)

ऐसें कोठें नाहीं हो वर्तले । पूर्वी अवतारादिकासी न जालें ।
*मायामोहनीनें ब्रह्मादिका भुलविलें । नाना पुराणें आम्ही ऐकिलीं ॥*
स. प्र. २-४१

समर्थदेवें ख्याति केली । सांगायासी ऐकायासी गोष्टी झाली । ४२

श्रीसमर्थ रामदास स्वामींचें चरित्र अद्भुतरम्य, स्फूर्तिदायक, रोमांचकारी घटनांना व प्रतापांनीं भरलेलें आहे. श्रीसमर्थांचे अनेक शिष्य प्रशिष्य होऊन गेले त्यापैकीं बहुतींनीं श्रीसमर्थांचें चरित्र लिहिल्याचा उल्लेख हनुमंत स्वामींच्या बखरेंत आहे. परंतु त्यापैकीं फारच थोडीं–तीनच चरित्रें उपलब्ध असल्यामुळें पुरेशी *माहिती न मिळाल्यामुळें* असमाधान होतें. समर्थचरित्राची संपूर्ण सामग्री उपलब्ध नसल्यामुळें अर्वाचीन कालात काहीं चरित्रें श्रमपूर्वक व श्रद्धापूर्वक लिहिलीं गेलीं असलीं तरी पूर्ण समाधान न झाल्यामुळें मनाला हुरहूर वाटते. श्रीसमर्थभक्त श्री. नानासाहेब देव यांचे रसाळ, शोधक व दिव्य लेखणींतून श्रद्धाभक्तिप्रेमानें व महाप्रयत्नानें संपूर्ण चरित्र लिहिलें जात आहे. तें श्रीसमर्थकृपेनें लवकरच पूर्ण व प्रसिद्ध होवो. त्यापूर्वी श्री समर्थांनीं बालवयात केलेल्या रोमांचकारी व दिव्य विक्रमाचे वर्णन व विवेचन करण्याचें योजलें आहे.

या जगामध्यें अनेक तऱ्हेचे विक्रम अनेक विभूतींनीं केलेले आहेत व करीत *आहेत. कोणी खेळण्यात, कोणी पोहण्यांत, कोणी पळण्यांत, कोणी पोळया खाण्यात,* कोणी राजकारणात, कोणी युद्धात, कोणी योगसाधनांत तर कोणी अध्यात्मशानांत अनेक विक्रम केलेले आहेत व यापुढें करतीलहि. परंतु श्रीसमर्थांनीं केलेला विक्रम ' न भूतो न भविष्यति ' असा आहे. तसा पूर्वी ' अवतारादिकांनींहि केला नाहा ' *व पुढें कोणी करील असें वाटतहि नाहीं. लग्नाच्या वाटाघाटी* झाल्यानंतर, लग्नाची सर्व तयारी होऊन बोहल्यावर वधूवरास चढविल्यानंतर, अंतरपाट धरून विवाहार्थ मंगलाष्टकें विप्र म्हणू लागल्यानंतर ' सावधान ' हा शब्द ऐकून सावधान राहून

निरीक्षणशक्ति असावी तितकी सूक्ष्म नसल्यामुळें व ह्या दोन महाकवींच्या काव्यांचा आमचा व्यासंगहि विशेष नसल्यामुळें आम्ही कोल्हापुर येथील प्राध्यापक रा. पंगु यांच्या पुस्तकांतील एक उतारा पुढें देतों:—

" आपल्या श्लोकबद्ध रामायणावरून अनेक वृत्तात्मक रचनेचा व आपल्या स्फुट प्रकरणांवरून ललित पद्यरचनेचा त्यानें ( मुक्तेश्वरानें ) जसा नवीन मार्ग आंखून दिला, तसाच आपल्या रामायणानें व मूर्खांच्या लक्षणांनीं रामदासासारख्या कवींनाही तो ( मुक्तेश्वर ) ऋणी करूं शकला. "

कोण कोणाचा ऋणी आहे, ह्या बाबतींत आम्ही आपलें मत प्रदर्शित करणें म्हणजे लहान तोंडीं मोठा घांस घेण्यासारखें आहे, म्हणून तें धाडस न करितां आम्ही आपल्या लेखणीस येथेंच विश्रांति देतों.

आम्ही वर ज्या तर्कांच्या उतरंडी रचल्या आहेत त्या खऱ्या किंवा खोट्या ठरणें हें भावी संशोधकांच्या चिकाटीवर अवलंबून आहे. वरील सर्व प्रश्नांवर संशोधकांकडून कांहींतरी नवीन प्रकाश पडेल, अशी आम्ही आशा करितों.

धनतोली, नागपुर
ज्येष्ठ शु० १ शके १८६३
तारीख २७ - ५ - ४१



( १ ) शिवकालीन महाकवि सामराज, पृष्ठ ११

या विधानाला पुष्टी मिळत नाहीं. शके १५४२ मध्येंच श्रीसमर्थ टाकळीस तपश्चर्येकरितां लग्नमंडपांतून निघून गेले ह्याबद्दल समर्थशिष्यांनीं लिहिलेल्या चरित्रग्रंथांमध्यें एकवाक्यता आहे. याकेनिशी टिपण हेंच सांगतें. सूर्याजीपंतांनीं श्रेष्ठांना अनुग्रह शके १५३७ मध्यें केला. त्यावेळीं सूर्याजीपंताजवळ समर्थांनी अनुग्रह करण्याची गोष्ट काढली नाहीं. त्यावेळीं समर्थ अवघे सात वर्षांचे होते. त्यावेळीं त्यांनीं भरलेली नदी पोहून जाण्याचा पराक्रमहि केला नाहीं. शके १५३८ श्रावण शु॥ अष्टमीस जांब येथील मारुतीच्या देवळांतच समर्थांस मारुतीच्या प्रसादानें रामदर्शन झालें व अनुग्रहहि झाला. त्यावेळीं सूर्याजीपंत हयात नव्हते.

पुढें पिता शांत होवोनियां जात । ज्येष्ठ बंधु करित प्रपंचासी ॥
माडीवरी अनुग्रह देती तेथें । हेहि अवचिते गेले होते ॥
ज्येष्ठ बंधु तया न देतीच येथें । म्हणती आतां जाऊं देवापासी ॥
मारुतीच्या देवाल्यांत जातां रामें । भेटोनियां प्रेमें कृपा केली ॥

असें भीमस्वामींच्या अभंगात्मक चरित्रांत आढळतें. समर्थहि स्वतःच्या एका पदांत

रामदासें पर्णुनि तिजला लग्नि टाकुनि दिलें ।

असें म्हणतात.

पहा धैर्य हें केवढें घट्ट । लग्नसोहळा तो वाटला वाईट ।
झुगारूनि हातें अंतरपाट । टाकूनि नवरी .... ॥ दा. बा. ६ × १४

तेव्हा या सर्व पुराव्यावरून शके १५४२ चे पूर्वी श्रीसमर्थ घराबाहेर पडलेले नाहींत. तसेंच सूर्याजीपंतांनी अनुग्रह केला नाहीं म्हणून समर्थ घराबाहेर पडलेले नसून लग्नमंडपातूनच घराबाहेर पडलेले आहेत असें सिद्ध होतें.

श्रीसमर्थांच्या शिष्यांच्या विश्वसनीय उपलब्ध चरित्रग्रंथांत या समर्थांच्या विक्रमाची साद्यंत सविस्तर माहिती दिलेली नाहीं. गिरधरस्वामींनीं 'समर्थप्रतापा' मध्यें शिरोभागीं उद्धृत केलेल्या ओव्यांत या विक्रमाची महती गाइली आहे. तरी

आतां ग्रन्थविस्तार ग्रंथीं करणें ।
तरी समर्थासी येथें नाहीं राहणें । २-३८

असें लिहून हकीकत दिलेली नाहीं.

कांहीं सांप्रदायिक चरित्र ग्रंथांत याची भरपूर माहिती सांपडते. समर्थ फार हुषार व कुशाग्रबुद्धीचे होते, परंतु स्वभावानें हूड व खोडकर होते.

व एकाग्रचित्त करून पूर्ण सावधानता दर्शविण्याचा, या आज्ञापालनाचा, या लग्नाची बेडी झुगारून देण्याचा या मायामोहनीस लाथाडून देण्याचा या वैराग्य-दर्शनाचा विक्रम श्रीसमर्थांनीं केवळ बाराव्या वर्षी केलेला आहे.

श्रीसमर्थ लग्नमंडपातून ' पळून गेले ' ' श्रीसमर्थांचें पलायन ' अशा तऱ्हेची या विक्रमाचें बावतींत भाषा वापरली जाते, शब्दयोजना केली जाते. ती श्रवणकटु आहे व असह्यहि आहे. श्रीसमर्थ लग्नमंडपांतून पळून गेले नाहींत असें नाहीं. परंतु ती शब्द योजना अयोग्य व अशुद्ध आहे. कडेकोट बंदोबस्त असतांना श्री शिवाजी महाराज औरंगजेबाच्या हातावर तुरी देऊन आग्र्याचे किल्ल्यांतून निसटून गेले. या त्यांच्या कृत्यास ते पळाले अगर त्यांनी पलायन केलें असें आपण म्हणत नाहीं. आग्र्याहून सुटका झाली असें आपण म्हणतों व तो श्री शिवाजी महाराजांनीं अभूतपूर्व विक्रमच केला. नौकेवर कडेकोट बंदोबस्त व कडकडीत पहारा असतांना स्वातंत्र्यवीर तात्याराव सावरकर यांनीं बंदिवासांतून मुक्त होण्याकरितां स्नानगृहाच्या लहानशा छिद्रांतून युक्तीनें समुद्रांत उडी घेऊन फ्रान्समधील मार्सेलिसचा किनारा गांठण्याचें प्रचंड धाडस केलें. या त्यांच्या कृत्यास ते पळाले अगर त्यांनीं पलायन केलें असें आपण म्हणत नाहीं. तर तो स्वातंत्र्यवीर तात्याराव यांनीं अभूतपूर्व विक्रमच केला व त्यास आपण ' स्वातंत्र्यवीरांचा मार्सेलिसचा विक्रम ' असें म्हणतों. तर मग श्री समर्थांनीं लग्नमंडपांतून पलायन केलें अगर ते पळून गेले असें म्हणणें अयोग्य व गर्हणीय होत नाहीं काय ? तो कांहीं एखाद्या युद्धांतील पलायना-सारखा हीन दर्जाचा पराक्रम नव्हे. पलायनामध्यें पळपुटेपणाची, अपयशाची छटा नेहमीं दृग्गोचर होते. तसा प्रकार समर्थांच्या विक्रमांत नाहीं. तेव्हां सर्व दृष्टींनीं विचार करितां व श्रीसमर्थांनीं केलेल्या कृत्याकडे व त्याच्या परिणामाकडे पहातां त्यास ' समर्थांचा विक्रम ' असेंच म्हणावयास हवे. मग तो सावधानतेचा विक्रम म्हणा, आज्ञापालनाचा विक्रम म्हणा, लग्नाची बेडी झुगारून देण्याचा विक्रम म्हणा, मायामोहनीस लाथाडण्याचा विक्रम म्हणा अगर वैराग्यदर्शनाचा विक्रम म्हणा. आणि तो विक्रम तर खराच, कारण तो बारा वर्षांच्या नारायणानें विचारपूर्वक केलेला आहे!

श्रीसमर्थरामदासस्वामींनीं हा विक्रम केला किंवा नाहीं अशी शंका ' रामदास जन्मकथा ' कारांनीं दिलेल्या माहितीवरून येण्याचा संभव आहे. सूर्याजीपंतांनीं श्रेष्ठांना – समर्थांच्या वडील बन्धूंना – अनुग्रह केला त्या वेळीं समर्थांनींहि आपणांस अनुग्रह करावा असा हट्ट धरला. परंतु सूर्याजीपंतांनीं अनुग्रह न केल्यामुळें समर्थ रुसून घराबाहेर पडले व नदींत पोहून पैलतीर गांठून टाकळीस तपश्चर्येकरितां निघून गेले अशी हकीकत ' रामदास जन्मकथा ' कारांनीं दिलेली आहे परंतु ही हकीकत खरी नाहीं. कारण ' रामदास जन्मकथे ' शिवाय इतर कोठेंहि

" लग्नाची गोष्ट काढली की, तूं रागावतोस, रुसतोस, हें बरें नाहीं. असें करूं नकोस – अंतःपाट धरीपर्यंत तूं नाहीं म्हणू नकोस, तुला माझी शपथ आहे."

" ठीक आहे. आज्ञा प्रमाण. " असें समर्थांनीं विचारपूर्वक उत्तर दिलें.

आईला आनंद झाला. तिला वाटलें, बरी युक्ती लढविली. त्यांना श्रेष्ठांनीं विचारतांच

तंव जननी तया बोलली । जे म्या नारोबाची भाक घेतली ।
अंतरपाट धरीतों बोहलीं । तुमच्या बोलीं अनुसरेन ऐसी ॥
यालागीं धरलिया अंतरपाट । नारोबा सांपडेल स्पष्ट ॥
टाळी वाजवू कडकडाट । वाजंत्री धडधडाट लग्नमंडपी ॥

श्रीरामकथासारामृत प्रसंग ६–३४, ३५

श्रेष्ठांना तें पटलें नाहीं. तथापि मातेचा आग्रहच पडला तेव्हां त्यांचा निरुपायच झाला. आसनगांवला त्यांचे मामा भानाजीपंत बोधलापूरकर रहात होते त्यांचेकडे श्रेष्ठ गेले. त्यांना सर्व वृत्तान्त सांगितला. त्यांनीं आपली मुलगी श्रीसमर्थांस देण्याचें कबूल केलें व शेवटीं लग्न ठरलें. फाल्गुन शु० ८ तिथि निश्चित झाली. लग्न सात घटिकेचें होतें.

याप्रमाणें लग्न निश्चित झाल्याची हकीकत आहे. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें समर्थांना विचारून कोणचीहि तयारी केलेली नव्हती. वडील मंडळीच लग्नाची सर्व तयारी करीत त्याप्रमाणें श्रेष्ठांनीं सर्व तयारी केली.

येथासांग सर्व अनकूळ जाहालें ।
वराड निघालें समारंभे ॥ ११
मुहूर्त पाहूनि हळदी लागल्या ।
देवकांच्या झाल्या प्रतिष्ठाहि ॥ १२

भीमस्वामी-समर्थचरित्र

लग्नमंडपासी समारंभें नेलें । विप्र येक बोले सावधान ॥

अभंगचरित्र ४४९

लग्नाची घटिका समीप उरली ।
मंगळाष्टकें जाली सावधान ॥ १३

याप्रमाणें लग्नाची सर्व तयारी होऊन बोहल्यावर वधूवर उभे होते व त्यांच्यामध्यें अंतरपाट ब्रह्मनिष्ठ ब्राह्मणांनीं धरलेला होता. विप्र सावधान सावधान म्हणत होते. सावधान शब्द ऐकतांच श्रीसमर्थ सावध झाले.

घरीं राहे त्याला अंधारीं दडतो । नातरी रात्रीं तरुतळींच जातो ।
कीं झाडावर बैंधून उड्या घेतो । नीळनळअंगदासारखे ॥ ९२
भरल्या विहिरींत टाकतो उडी । बोल ऐकेना नाथिडो घडाघडी ।
सोये धरीना ॥ ९३ असें दासविश्रामांत वर्णन केलें आहे.

वृक्षसरोवरांत उड्या घेणें, रानावनांत हिंडणें त्यांना फार आवडे. परंतु त्यांच्या लग्नाची गोष्ट कोणी काढतांच ते फार चिडत, रागावत. दगडहि मारीत. एकदां एका मित्रानें त्यांची या बाबतींत थट्टा केली असतां ते नदीच्या काठावरील वडाच्या झाडावर जाऊन बसले. लोक त्यांना घरीं बोलावण्यास आले तर त्यांनीं खालीं नदीमध्यें उडी घेतली. नदींत कांहीं मित्रांनीं उड्या मारल्या. शोध केला. सांपडेनात. त्यांच्या घरीं ही वार्ता गेली त्याबरोबर श्रेष्ठ तेथें धावून आले व "नारायणा, बाहेर ये" असें म्हणाले. तात्काळ समर्थ नदींतून बाहेर आले ! पाण्यांत किती वेळ होते कोण जाणे ! या वेळीं समर्थांनीं नदींत उडी घेतल्यावर पाण्यांतील लपलेला दगड कपाळाला लागून कपाळाच्या मध्यभागीं टेंगूळ आलें व तें तसें शेवटपर्यंत कायम राहिलें. लग्नाची गोष्ट काढली असतां असें अकांडतांडव श्रीसमर्थ करीत याबद्दल समर्थांची मातोश्री राणूबाई यांस फार वाईट वाटलें व नेहमीं वाटत असे.

दोनच मुलगे असल्यामुळें दुसऱ्या मुलाचें लग्न होऊन वंशवृद्धि व्हावी, लग्न केल्यास श्रीसमर्थांचा द्वाडपणा जाईल व त्यांची अस्थिरता कमी होईल अशा समजुतीनें राणूबाईनीं श्रेष्ठांजवळ त्यांचें लग्न ठरविण्याबद्दल गोष्ट काढली. श्रेष्ठांना समर्थ लग्न करणार नाहींत व तें करण्याचा प्रयत्न केल्यास समर्थ हातचे जातील असें वाटे व त्याप्रमाणें त्यांनीं मातेस स्पष्टपणें सांगितलें. त्यानंतर एके दिवशीं राणूबाईनीं भावभक्त्या अंतःकरणानें व भोळ्या भावनेनें एक युक्ति योजली.

करोनि प्रयत्न नानापरी । गोऊन टाकितां राहील घरीं ।
वर्तेल सावधपणें संसारीं । मानली युक्ती यथार्थ ॥

दासविश्रामधाम स. ५-५१

समर्थांस बोलावून त्या म्हणाल्या—

"नारोबा, मी सांगेन ती गोष्ट तूं ऐकशील काय ?"

"कोणची ?"

"न मातुः परदैवतम्" असें आहे ना ? मग मी सांगेन ती."

"अस्सं – आज्ञाकरा – सांगाल तें ऐकेन."

" लग्नाची गोष्ट काढली की, तूं रागावतोस, रुसतोस, हें बरें नाही. असें करूं नकोस – अंतःपाट धरीपर्यंत तूं नाहीं म्हणू नकोस, तुला माझी शपथ आहे."

" ठीक आहे. आज्ञा प्रमाण. " असें समर्थांनीं विचारपूर्वक उत्तर दिलें.

आईला आनंद झाला. तिला वाटलें, बरी युक्ती लढविली. त्यांना श्रेष्ठांनीं विचारतांच

तंव जननी तया बोलली । जे म्या नारोबाची भाक घेतली ।
अंतरपाट धरीतों बोह्लीं । तुमच्या बोलीं अनुसरेन ऐसी ॥
यालागीं धरलिया अंतरपाट । नारोबा सांपडेल स्पष्ट ॥
टाळी वाजवू कडकडाट । वाजंत्री धडधडाट लग्नमंडपी ॥

श्रीरामकथासारामृत प्रसंग ६–३४, ३५

श्रेष्ठांना तें पटलें नाहीं. तथापि मातेचा आग्रहच पडला तेव्हां त्यांचा निरुपायच झाला. आसनगांवला त्यांचे मामा भानाजीपंत बोधलापूरकर रहात होते त्यांचेकडे श्रेष्ठ गेले. त्यांना सर्व वृत्तान्त सांगितला. त्यांनीं आपली मुलगी श्रीसमर्थांस देण्याचें कबूल केलें व शेवटीं लग्न ठरलें. फाल्गुन शु० ८ तिथि निश्चित झाली. लग्न सात घटिकेचें होतें.

याप्रमाणें लग्न निश्चित झाल्याची हकीकत आहे. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें समर्थांना विचारून कोणचीहि तयारी केलेली नव्हती. वडील मंडळीच लग्नाची सर्व तयारी करीत त्याप्रमाणें श्रेष्ठांनीं सर्व तयारी केली.

येथासांग सर्व अनकूळ जाहालें ।
वराड निघालें समारंभे ॥ ११
मुहूर्त पाहूनि हळदी लागल्या ।
देवकांच्या झाल्या प्रतिष्ठाहि ॥ १२

भीमस्वामी-समर्थचरित्र

लग्नमंडपासी समारंभें नेले । विप्र येक बोले सावधान ॥

अभंगचरित्र ४४९

लग्नाची घटिका समीप उरली ।
मंगळाष्टकें जाली सावधान ॥ १३

याप्रमाणें लग्नाची सर्व तयारी होऊन बोहल्यावर वधूवर उभे होते व त्यांच्यामध्ये अंतरपाट सद्धनिष्ठ ब्राह्मणांनीं धरलेला होता. विप्र सावधान सावधान म्हणत होते. सावधान शब्द ऐकतांच श्रीसमर्थ सावध झाले.

सावधान अंतरपाटी ऐकतां परिपूर्ण ।
ॐ पुण्या अनिवर्चनीं समर्थ निघाले ॥ स. प्र. २-३९

सावधान सावधान ह्मणताती ।
कोणा सांगताती मजवीणें ॥ १४ भीमस्वामी चरित्र

सर्वही मिळोनी मज गोविताती ।
परी सांगताती सावधान ॥ १८

बहु दाटी जाली संधी ते पाहिली ।
चुकांडी खादली आकस्मात ॥ २०

नेसले धोतर उत्तरी दुसरी ।
पडिले बाहेरी येकायेकीं ॥ २१ भीमस्वामी

याप्रमाणें समर्थ लग्नमंडपांतून एकाएकीं निघून गेले. लग्नाचा क्षण प्रत्येक व्यक्तीच्या आयुष्यांत फारच महत्वाचा व क्रान्तीचा असतो. समर्थांचें वय ह्या वेळीं केवळ बारा वर्षांचेंच होतें. अशा वेळीं कोणत्याहि प्रकारें न डगमगतां समर्थांनीं निश्चयपूर्वक सावधानता दर्शवून अशा लग्नसमारंभांतून व लग्नमंडपांतून निघून जाण्याचा ' न भूतो न भविष्यति ' असा प्रताप – रोमांचकारी व अद्‌भुतरम्य विक्रम केला.

समर्थ लग्न ठरल्यापासूनच सावध होते किंवा लग्नाचे वेळीं मंगलाष्टकें म्हणतांना विप्रांचे ' सावधान ' हे शब्द वारंवार ऐकून एकाएकीं त्या वेळीं सावध झाले असा एक प्रश्न उपस्थित होतो. लग्न ठरण्यापूर्वी राणूबाईनीं त्यांना शपथ घालून अंतरपाट धरीपर्यंत लग्नास उभा रहाण्याबद्दलची आज्ञा केली व ती समर्थांनीं मान्य केली वगैरे हकीकत जर खरी असेल तर राणूबाईस वचन दिल्यापासूनच या बाबतींत समर्थ पूर्ण सावध होते व त्या वेळेपासूनच त्यांनीं लग्नांतून निघून जाण्याचा दृढनिश्चय केला असला पाहिजे असें सिद्ध होतें. सदरची हकीकत खरी आहे किंवा नाहीं याबद्दलहि निश्चयपूर्वक निर्णय आज देतां येत नाहीं. याचें मुख्य कारण श्रीसमर्थशिष्यांनीं लिहिलेलीं सर्व चरित्रें आज उपलब्ध नाहींत. परंतु विप्रांचे ' सावधान ' शब्द ऐकून समर्थ सावध झाले असेंहि म्हणावयास जागा आहे. गिरिधरस्वामींनीं

समर्थांची प्रेमअवस्था परम श्रेष्ठांसी लागली ।
लग्नविचारणा न पुसतां मांडिली । समर्थेंहि मौन मुद्रा धरली ।
कां जें मनींचें करणें आहे ह्मणोनियां ॥ स. प्र. २-३७

समर्थलग्नआहुती जाली संपूर्ण । देवदेवकघटिका भरली नसतां पूर्ण ।
सावधान अंत्रपाटी ऐकतां परिपूर्ण ।
ॐ पुण्या अनिवर्चनी समर्थ निघाले ॥ स. प्र. ३९

समर्थप्रतापांत या दोन ओव्या दिल्या आहेत. पहिली ओळ सांप्रदायिक चरित्रांत दिलेल्या हकीकतीशीं विसंगत वाटते. परंतु या दोन्ही ओव्यांचा अर्थ दोन्ही सिद्धांतांस ओढाताण करून लागू करितां येईल असा आहे. सावधान शब्द ऐकण्यापूर्वीच मनांत निश्चय करून समर्थ सावध होते असा अर्थहि निघतो व सावधान शब्द ऐकून समर्थ सावध होऊन लग्नमंडपांतून निघून गेले असाहि अर्थ होतो. समर्थांच्या अभंगात्मक चरित्रामध्यें

लग्नमंडपासी समारंभें नेलें । विप्र येक बोले सावधान ॥ ४×९
ऐकतांचि शब्द जाले सावधान । केलें पलायन अकस्मात ॥ ४×१०

असें शिरगांवकर मठाधिपति भीमस्वामींनीं म्हटलें आहे. त्यामुळें विप्रांचा 'सावधान' शब्द ऐकून समर्थ सावध झाले असा अर्थ निघतो. हा अर्थ अगदीं स्पष्ट निघत नसला, तरी तंजावरमठाधिपति भीमस्वामी म्हणतात.

सावधान सावधान ह्मणताती । कोणा सांगताती मजवीणें ॥ १४
मोळिवे पाईं प्रत्यक्ष पडती । ह्मणोनि म्हणती सावधान ॥ १५
संसारांत दुख कांहीं नाहीं सुख । गोड मानी मूर्ख सावधान ॥ १६
दिवसारात्रीं होते देखत देखतां । प्रत्यक्ष ह्मणतां सावधान ॥ १७
सर्वहि मिळोनी मज गोविताती । परी सांगताती सावधान ॥ १८
ऐसा हा विचार अंतरीं पाहिला । प्रत्यक्ष मजला सांगताती ॥ १९
घट्ट दाटी जाली संधी ते पाहिली । चुकांडी खादली आकस्मात ॥ २०

यावरून समर्थांनीं सावधान शब्द ऐकल्यावर त्यांचें विचारचक्र सुरू झालें व शेवटीं मायापाशांतून व भवसागरांतून मुक्त होण्यास हीच एक संधि आहे असा विचार घेऊन समर्थांनीं झुकांडी दिली असें दिसतें. परंतु हेच भीमस्वामी पुढें कडव्यांत म्हणतात.

....ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण । वरा वदती अनुसंधान ।
अंत्रपटीं असो नयन । मंगलाष्टकें निवेदन ।
करितां ह्मणती सावधान । तेव्हां स्वामी अंतःकर्ण ।
उठे जावे येथून । सारासार विचारून ।
तेचि संधि साधून । फडकले तेथून ।

पां. मु. ११

दासविश्रामधामांतहि अशीच माहिती आहे. सावधान शब्द ऐकू येतांच विप्रास त्यांनीं त्याबद्दल विचारलें, तेव्हा

> अरे सरलें कीं ब्रह्मचर्यव्रत । आता प्रपंचीं होतोसी गृहस्थ ।
> होऊनि सावध शास्त्रसर्वमतें । चालोनि भला म्हणवावें ॥ ५-७९

असे विप्रानीं सांगितलें व यद्यपि त्याची खात्री झाली काहींनीं सावध याचा अर्थ सांगितल्यावर

> आता राहिलें तें घेणें उड्या । पाईं जुडल्या कीं प्रपंचबेड्या ।
> ऐकोनि बोलिले भला रे गड्या । पाहे सावध जालों की ॥ ८१
> जमनीक पडदा उडऊनि हातें । पळता धरोनि सधान पथें ॥

असे शेवटीं सावध होऊन समर्थ लग्नमंडपातून निघून गेले हीच सुवर्णसंधि आहे असा विचार अंतःकरणांत येऊन जगदुद्धार करावयाचा असेल तर मायामोहनीस झुगारून दिलं पाहिजे, त्याची बेडी अडकविता कामा नये असा विचार करून व समर्थ सावध होऊन फडकले असें निःसंशय दिसून येतें

लग्नापूर्वीपासूनच समर्थ सावध असोत अगर त्यांतच ब्रह्मनिष्ठ ब्राह्मणानें "सावधान" शब्द ऐकून सावध झाले असोत – कोणतेंहि एक खरें असो – समर्थांनीं केलेल्या विक्रमाचा दिव्यपणा त्यामुळें कमी होत नाहीं. समर्थांनीं तपश्चर्येसाठीं, देवाच्या साक्षात्वासाठीं व जगदुद्धारासाठीं कोणाचीहि भीडभाड न ठेवता अगदीं अल्प वयात लग्नसमारंभासारख्या आयुष्यांत क्रान्ति घडवून आणणाऱ्या उत्सवसमारंभसमयीं लग्नमंडपातून निघून – फडकून जाण्याचा केवढा प्रचंड विक्रम केला. जगातील कोणत्याहि साधुसंताची अगर अवतारी पुरुषाचीं चरित्रें पाहिलीं तर असा विक्रम केल्याचें एकहि उदाहरण आढळून येणार नाहीं. लग्न झाल्यानंतर व संसार एकनिष्ठपणें केल्यानंतर केवळ ज्ञानप्राप्तीकरितां व आत्मोद्धाराकरिता पत्नीत्याग केल्याचीं उदाहरणं गौतमबुद्ध व तुळशीदास यांचीं आहेत परंतु बाराव्या वर्षीं विचारपूर्वक संसारसुखावर लाथ मारून व आप्तेष्टांस सोडून देऊन तप साधनाकरिता लग्नमंडपातून फडकून जाण्याचा, सावधानतेचा, आज्ञापालनाचा, लग्नाची बेडी झुगारून देण्याचा, मायामोहनीस लाथाडण्याचा अगर 'वैराग्यदर्शनाचा विक्रम श्रीसमर्थांनीं केला तो 'न भूतो न भविष्यति' एकमेवाद्वितीयम् असा आहे यांत शंकाच नाहीं. असा दिव्य व रोमांचकारी विक्रम समर्थांनीं केला म्हणूनच त्यांचेकडून धर्मस्थापना झाली व जगदोद्धारहि झाला.

( १३ )

श्रीरामसमर्थ

## उत्तम पुरुष निरूपणाचा [ १८ × ६ ] समास

# अफझुलखानाचे वधापूर्वींचा कीं नंतरचा ?

( लेखक - रा. अनंतदास रामदासी, गिरड )

मोठ्या महत्त्वाचा मुद्दा आहे असें नाहीं, तथापि त्याविषयीं दुमत प्रगट झालेलें दिसलें; म्हणून थोडीशी चर्चा करण्याचें योजिलें आहे. या समासाचा व शिवछत्रपतींचा काहीं संबंधच नाहीं असें प्रतिपादण्यापर्यंत काहीं जणांची मजल गेली होती, पण " वरें ईश्वर आहे साभिमानी । विशेष तुळजाभोवानी । परंतु विचार पाहोनी । कार्य करणें ॥ ९ ॥ " या ओवींतील दुसऱ्या चरणावरून हा समास शिवरायासंबंधींच असल्याचें स्पष्ट होत असल्यानें हें प्रतिपादन लटकें पडलें. आता काहीं समर्थभक्तांचें म्हणणें असें आहे कीं, हा समास अफझुलखानाचे वधापूर्वीं झाला असावा. कारणें :

( १ ) एक दंतकथा—अफझुलखानाचे भेटीला जाण्यास शिवाजी महाराज निघाले त्या वेळीं समर्थदर्शनाची त्यांना इच्छा झाली. इतक्यात कल्याणस्वामी हें पत्र ( १८×६ ) घेऊन आले.

( २ ) तुंड हेंकाड कठोरवचनी । अखंड तोले साभिमानी । न्याय नीति अंतःकर्णीं । घेणार नाहीं ॥ ३ ॥ तऱ्हे सीघ्रकोपी सदा । कदापि न धरी मर्यादा । राजकारण संवादा । मिळों चि नेणे ॥ ४ ॥ ऐसे लोंद बेइमानी । कदापि सत्य नाहीं वचनीं । पापी अपस्मार जनीं । राक्षेस जाणावें ॥ या ओव्या यवनवर्णनाच्या आहेत व त्यावरून खानाचे बाबतींत कसें वागावयाचें याचा इशारा दिला गेला.

( ३ ) बहुतांचे करितां हट । तेथें येऊन पडिले तट । कोणीयेकाचा सेवट । जाला पाहिजे ॥ ८ ॥ या ओवींतील 'कोणीयेकाचा' म्हणजे या पादशाहीचा किंवा या दुष्टाचा – अफझुलखानाचा.

( ४ ) सूक्ष्मदर्शी समर्थ, शिवाजी राजे इतकी मोठी कामगिरी करून भेटीला आले असता त्यांच्या गौरवार्थ एकहि शब्द या पत्रांत उच्चारीत नाहींत व उलट ' असें करा, तसें संभाळा ' वगैरे सूचनाच देत आहेत, हें समर्थचरित्राशीं मुळींच जुळत नाहीं.

'समर्थ' मासिकाच्या १९३९ मेच्या अंकांत अहमदाबादचे श्रीसमर्थभक्त अनंतराव वणीकर यांनीं 'श्रीसमर्थ व राजकारण' हा लेख प्रसिद्ध केला असून त्याचा सारांश वरीलप्रमाणें आहे. याशिवाय उपर्युक्त समासांतील कित्येक वचनांचा अर्थ त्यांनीं वेगळ्या प्रकारें केला आहे. त्याचा थोडासा विचार पुढें या लेखांत येईलच. समक्ष भेटींतहि एक दोघां मित्रांनीं श्री. वणीकरांप्रमाणेंच शंका प्रदर्शित केली. म्हणून त्या विषयाबाबतचें माझें म्हणणें या लेखांत थोडक्यांत देत आहे.

( १ ) श्री. वणीकरांनीं जी दंतकथा दिली आहे, ती अद्यापि माझे ऐकण्यांत आली नाहीं, तथापि तिचा उगम श्रीहनुमानस्वामीकृत बखरींतील पुढील दोन गोष्टींत दिसतो. त्या गोष्टी येणेंप्रमाणेः—

( रा ) अफझुलखानाचा तळ श. १५८१ चे पावसाळ्याचे सुमारास वाईस आला. त्या सुमारास श्रीसमर्थांचे आज्ञेशिवाय कांहीं एक करणें नाहीं असा निग्रह करून शिवराय स्वस्थ बसले. पदरचे मंडळींनीं पुष्कळ समजूत घातली, पण शिवराय कोणाचें ऐकेनात. तिसरे दिवशीं राजांना समर्थदर्शन होऊन समर्थांनीं आज्ञा केली कीं, " आम्ही अरण्यवासी, आमची भेट तुमचे इच्छेप्रमाणें नित्य होणें कठिण. तथापि तुमचे भावार्थाप्रमाणे आम्ही तुमचे सन्निध नित्य आहोंतच. श्रीच्या प्रेरणेनुसार कार्य करीत जाणें. विशेष कठिण प्रसंग वाटला तर तुम्ही शुचिर्भूत होऊन दोन विश्वासू माणसांसह एकान्तीं बसावें. त्या वेळीं तुमचे ठायीं देवीचा संचार होईल; तेव्हां एकानें प्रश्न विचारावें व त्यांचीं उत्तरें मिळतील तीं दुसऱ्यानें लिहून घेऊन त्याप्रमाणें कार्यभाग करीत जावा. अतःपर असा हटनिग्रह करूं नये. "

( म ) शके १५७१ वैशाख शु॥ ४ मंदवारी रात्रीं शिवराजांना स्वप्नांत श्रीसमर्थदर्शन होऊन श्रीफल प्रसाद मिळाला. त्याचे अगोदर श्रीसमर्थ रामदासस्वामीकडून अनुग्रह मिळावा अशी उत्कट इच्छा त्यांचे मनांत उत्पन्न झाली होतीच. दुसरे दिवशीं चाफळला जाण्यास निघाले. वैशाख शुद्ध ८ रोजीं राजांचा मुक्काम माहुलीस होता तेथें त्यास श्रीसमर्थांकडील पत्र कल्याणांनीं आणून दिलें. तें " निश्चयाचा महामेरु " हें अनुग्रहापूर्वीचें पत्र, आणि अनुग्रहानंतर राजधर्म व श्रीदासबोधांतील लघुबोध ( १३ × ६ ) अशीं तीन प्रकरणें या अनुग्रहप्रसंगीं शिवरायासाठीं निर्माण झालीं.

( २ ) या दोन प्रसंगांची सुप्रसिद्ध वरील दंतकथेंत झालेली दिसते. अफजुलखानाचे प्रसंगीं श्रीसमर्थांची आज्ञा कार्याविषयीं मिळावी म्हणून शिवरायांनीं हट्ट केला होता; पण श्रींचे अंत प्रेरणेप्रमाणें आणि संचारांतून देवीची आज्ञा मिळेल त्याप्रमाणें कार्य करीत जावें असें सांगून श्रीसमर्थांनीं राजांची समजूत काढली. या हट्टास उद्देशूनच

---

( १ ) बखरींतील गोष्टींचा हा सारांश स्मरणानें येथें देत आहे. तथापि बखरींत या गोष्टी आहेत हें निश्चित. — लेखक

समयासारिखा समयो येना । नेम सहसा चालेना ।
नेम धरितां राजकारणा । अंतर पडे ॥ ६ ॥
अति सर्वत्र वर्जावें । प्रसंग पाहोन चालावें ।
हटनिग्रहीं न पडावें । विवेकी पुरुषें ॥ ७ ॥
बहुतचि करितां हट । तेथें येऊन पडिले तट ।
कोणी येकाचा सेवट । जाला पाहिजे ॥ ८ ॥

हे उद्गार निघाले असले पाहिजेत. आज्ञा घेतल्याशिवाय कांहीं करावयाचें नाहीं असा हठनिग्रह तुम्ही धरला तर ( राजकारणांत संधी साधून योग्य प्रकारें डाव टाकील त्यास यश मिळण्याचा अधिक संभव असतो, ती ) यशःप्राप्तीची संधी तुम्ही असल्या निग्रहनेमानें घालवाल, गेलेली संधी पुनः मिळत नसते, असा सहाव्या ओवीचा भावार्थ आहे. गुर्वाज्ञा प्रथम घेऊन मग कोणतेंहि काम करावयाचें हा शिवरायांचा पारमार्थिक नेम आणि अशा नेमामुळें राजकारणाचा होणारा घोळंबा यांत प्रसंगीं महत्त्व द्यावयाचें तें वैयक्तिक हिताच्या पारमार्थिक नेमास न देतां सामुदायिक कल्याणकारी अशा राजकारणासच द्यावयास पाहिजे असें श्रीसमर्थांनीं या व पुढील वचनानें स्पष्ट केलें आहे.

( ३ ) सात ते बारापर्यंतच्या ओव्या दुसऱ्या एका ऐतिहासिक घटनेला अनुलक्षून आहेत असें दिसतें. अफजुलखानास मारल्यानंतर त्याची सगळी फौज बुडवावी असा मनसुबा शिवरायांचा होता. पण त्यांच्याच पक्षांतील हैबतराव सिलींबकराचा सासरा खंडोजी खोपडा हा फितूर होऊन त्यानें खानाचा कबिला व मुलगा फाजलखान यांना पळून जाण्यास साह्य केलें. ही गोष्ट शिवरायास कळतांच ते खोपड्यावर अतिशय संतापले व इतरांस जरब बसेल अशा प्रकारचें कडक शासन खोपड्यास करण्याचा विचार त्यांनीं चालविला. अर्थात् कडेलोट, हत्तीच्या पायीं देणें अथवा शिरच्छेद अशांपैकीं एखाद्या प्रकारानें देहान्ताचीच शिक्षा व्हावयाची हें ठरल्यासारखें होतें. परंतु खंडोजी खोपड्यानें आपल्या जावयामार्फत कान्होजी जेध्यास मध्यस्थी घातलें. कान्होजी जेधे म्हणजे मोठेंच प्रस्थ. मोगलशाही व आदिलशाही यांच्या विरुद्ध शहाजी–शिवाजीच्या राजकारणास सर्वतोपरी इमानपूर्वक साह्य करण्याची शपथ बेलरोटीवर हात ठेवून श. १५७१ मध्यें ज्यानें घेतली, जो आपल्या वडिलांचा स्नेही आणि घरोब्यांतला एक मातब्बर सरदार अशा कान्होजीचा शब्द मोडावा तर तो दुखावतो; न मोडावा तर फितुरीसारखा भयंकर अपराधी शासनावांचून राहिल्यास इतरांस मलतेंच उदाहरण होतें व आपला वचक नाहींसा होतो, अशा प्रकारच्या विचारांच्या कात्रींत शिवराय या वेळीं सांपडले होते. कान्होजी जेध्यानें फारच गळ घातल्यामुळें महाराजांनीं खोपड्यास जिवें मारीत नाहीं अशी भाक दिली व खंडोजीच्या अपराधाची माफी केलीसें दाखविलें.

पण मनांत त्याच्या फितुरीबद्दल राग होताच; तो.खोपड्याचे लक्षांत आला नाही. पुनः मर्जी संपादन करून घेण्याच्या इच्छेनें खोपडा पुढें पुढें करूं लागला. एक दिवस तो एकटाच जवळ आला त्या बरोबर शिवरायाचा राग उसळून त्यांनीं त्याचा उजवा हात व डावा पाय कापला व लगेच जखम तळून काढली. ही बातमी जेधे व सिलिंबकर यांना कळतांच ते शिवछत्रपतीवर रागावले. त्या वेळीं शिवरायांनीं उत्तर केलें कीं, ' त्यास जिवें मारणार नाहीं हा माझा शब्द खोटा न होऊं देतां मी अपराध्यास जरूर तें शासन केलें आहे. तथापि या खुलाशाच्या उत्तरानें जेधे व सिलींबकर यांचें समाधान होणें शक्यच नव्हतें, ते व त्यांचे पक्षपाती यांना मनांतून वैषम्य वाटलेंच. जेधे पुढें भोसल्यांच्या पक्षांशीं चिटणिसाप्रमाणें एकनिष्ठ राहिल्याचें पुढील इतिहासावरून दिसत नाहीं.

(४) हा पूर्वी घडलेला प्रसंग ध्यानीं घ्यावा आणि नंतर

अति सर्वत्र वर्जावें । प्रसंग पाहोन चाळावें ।
हटनिग्रहीं न पडावें । विवेकी पुरुषें ॥ ७ ॥
बहुत चि करितां हट । तेथें येऊन पडिले तट ।
कोणीयेकाचा सेवट । जाला पाहिजे ॥ ८ ॥
बरें ईश्वर आहे साभिमानी । विशेष तुळजाभोवानी ।
परंतु विचार पाहोनि । कार्यें करणें ॥ ९ ॥
अखंड चि सावधाना । बहुत काये करावी सूचना ।
परंतु कांहीं येक अनुमाना । आणिलें पाहिजे ॥ १० ॥
समर्थापासीं बहुत जन । राहिला पाहिजे साभिमान ।
निश्चळ करूनियां मन । लोक असती ॥ ११ ॥
म्लेंच दुर्जन उदंड । बहुतां दिसाचें माजलें बंड ।
याकारणें अखंड । सावधान असावें ॥ १२ ॥

या सहा ओव्या वाचाव्या म्हणजे हा उपदेश किती संतोतंत प्रसंगानुरूप आहे, त्यांतील प्रत्येक शब्द किती व कां महत्वाचा आहे तें यथार्थतेनें कळतें आणि हा उपदेश खोपड्याचे प्रसंगानंतरचा अर्थात् अफजुलखानाचे वधानंतरचा आहे या विषयीं शंका राहत नाहीं.

विवेकी पुरुषानें कोणताहि अतिरेक करूं नये, प्रसंग पाहून वागावें, आज्ञेशिवाय कांहीं करणार नाहीं अथवा फितुरी माणसाला शासन हें झालेंच पाहिजे अशा प्रकारचा हठनिग्रह करूं नये. हट धरला तर तट पडतील म्हणजे पक्षभेद माजतील आणि ते पक्षभेद अधिक हटानें विकोपास गेले कीं, कोणता तरी

एक पक्ष अगदीं नामशेष झाल्याशिवाय भांडण मिटत नाहीं. तुम्ही स्वधर्माचा व न्यायाचा पक्ष घेतला असल्यानें ईश्वर – विशेषतः तुळजा भवानी तुमची पाठीराखी आहे; अफझुलखानप्रसंगानें हा स्वानुभव तुम्हांस आला असला तरी कोणतेंहि कार्य विचारपूर्वक करावें. तुम्ही अखंड सावध आहांतच, तेव्हां तुम्हांस विशेष काय सांगावें ? परंतु जें सांगितलें त्याचा नीट विचार करून तुम्ही आपल्या भावी परिस्थितीचा अंदाज बांधावा. घोरपड्याच्या प्रकरणामुळें कांहीं सरदार मंडळी तुमच्यावर रुष्ट झाली आहेत. समर्थापासीं म्हणजे श्रीरामाजवळ नव्हे तर तुमच्यासारख्या सामर्थ्यवंताचे पक्षाचा अभिमान धरून पुष्कळ लोक असावयास पाहिजेत. तेथें जेथ्यासारखे आहेत तेच तुटूं लागणेचे वेतांत आले तर कसें होईल. तुमच्यासारख्या थोरांचे शब्दावर लोकांनीं पूर्णपणें भरंवसा ठेऊन रहावें असें तुमचें वर्तन असलें पाहिजे. कारण अतिशय दुष्ट अशा म्लेंच्छांचें बंड फार दिवसांचें माजलें आहे. त्यांचा बंदोबस्त करावयाचा तर अतिशयच सावधपणानें वागलें पाहिजे.

" अफझुलखानाचे वधानंतर कांहीं दिवसांनीं शिवराय श्रीसमर्थदर्शनास गेले तेव्हां श्रीदासबोधरचना चालू होती; त्यांतच शिवरायास उद्देशून उत्तम पुरुष निरूपणाचा समास समर्थांनीं घातला." या बखरींतील विधानास अनुसरून वरील स्पष्टीकरण केलें आहे. आणि दंतकथा व खानाच्या वधापूर्वीचा हा समास असला पाहिजे असें गृहीत धरून श्री. वणीकर यांनीं केलेला अर्थ पुढे दिला आहे.

" विवेकी पुरुषानें अति हट्ट करूं नये, प्रसंग पाहून चालावें. सर्व ठिकाणीं व सर्व प्रसंगीं अतिप्रसंग वर्जावे ॥ ७ ॥ बहुतच हट्ट केला कीं, तेथें अनर्थच आलाच म्हणून समजा. ( या पादशाहींचा किंवा सध्यां या तुमचा ) कोणी एकाचा शेवट झालाच पाहिजे ( असें करा ) ॥ ८ ॥ वेर, ईश्वराला तुमचा अभिमान आहेच. विशेष भवानी देवीचेंहि तुम्हांस साह्य आहेच; तत्रापि पूर्ण विचार करून कार्य करा ॥ ९ ॥ तुम्ही अखंड सावध आहांच, तेव्हां अशा तुम्हाला विशेष सूचना काय करावी ( विशेष स्पष्ट लिहितां येत नाहीं ) परंतु अनुमानानें काय तें समजा ॥ १० ॥ समर्थ श्रीरामरायाजवळ सेवेला पुष्कळ लोक आहेत, परंतु तुम्ही समर्थांचा अभिमान राखला पाहिजे. निश्चित मनानें लोक तुमचेवर विश्वसून आहेत ॥ ११ ॥ हे यवन दुर्जन फार मातले आहेत व फार दिवसांपासून बंड माजवीत आहेत. यासाठीं सर्वदा सावधान असावें ॥ १२ ॥ "

( ५ ) या दोन विशदीकरणांपैकीं कोणतें अधिक यथार्थ व प्रसंगोचित आहे त्याचा निर्णय वाचकांनीं करावा. १३ ते २१ या ओव्यांत ' ईश्वरानें अंगिकारलेला, परांतरपरीक्षक, सावध, दीर्घप्रयत्नी, प्रसंगावधानी, अद्भुत कार्यकर्ता, यश-कीर्ति-प्रतापवंत, निरुपमेय उत्तम गुणांचा आचार-विचारशील, परोपकारी, दृढपरम अखंड सावध, देवब्राह्मणांचा कैपक्षी, बहुतजनपालक,

धर्मस्थापक, ईश्वरी अवतार,' इत्यादि विशेषणात्मक वाक्यें योजून श्रीसमर्थांनीं शिवरायासारख्या पुरुषसिंहाच्या उत्तमोत्तम गुणांचा गौरवच केला नाहीं काय ? पण तीं वाक्यें किंवा वाक्यांश आज्ञार्थक मानून त्यांचा नुसताच उपदेशपर अर्थ श्री. घणीकर मानतात. या वचनांत शिवरायास उपदेश नाहीं असें नाहीं. पण तो श्री. घणीकर म्हणतात तशा प्रकारचा सद्गुणांचा उपदेश नसून शिवरायासारख्या सच्छिष्याच्या ठायीं उपजत असलेल्या उत्तमोत्तम सद्गुणांचा त्यास अभिमान होऊं नये म्हणून निरहंकर्तृत्वाचा निवेदनाचा उपदेश आहे. हे गुण म्हणजे ईश्वरी देणें होय, सकळ कर्ता तो ईश्वर अर्थात् या सद्गुणांचा अथवा ' सावधपणें महायेल ' करून, ' समयीं धारिष्ट ' धरून अफजुलखानासारखें प्रचण्ड धेंड उलथून पाडण्याचें ' अद्भुत कार्य ' तुम्हीं केलें आणि त्यायोगें तुमचा ' यशकीर्ति प्रताप — महिमा ' त्रिखंड झाला त्याचा अभिमान तुम्हांस होऊं नये. कारण, हें सर्व ' देणें ईश्वराचें ' धर्मस्थापनेचे जे नर ते ईश्वरावतारच होत. असे अवतार पूर्वी झाले, सांप्रत ( तुमच्या सारख्याच्या रूपानें ) आहेत आणि पुढेंहि होतील, पण हें सर्व ' देणें ईश्वराचें ' एवढें लक्षांत ठेवावें. सगळे वडे वडे प्रतिपक्षी हादरून जातील अशा प्रकारचा अद्भुत विजय संपादन केला असता त्याबद्दल थोडा तरी अभिमान वाटणें व त्या अभिमानामुळें किंचित् का होईना पण गैरसावधपणा उत्पन्न होणें साहजिक आहे. अशा समयीं शिवरायासारख्या पुण्यश्लोक स्वराज्यसंस्थापकाच्या पारमार्थिक मनोभूमिकेस आत्मनिवेदनाच्या उपदेशाची वेळोवेळीं किती आवश्यकता असते हें तज्ज्ञ जाणतातच. सारांश, जीं वाक्यें किंवा वाक्यांश केवळ आज्ञार्थक किंवा उपदेशात्मक आहेत अशी श्री. घणीकरांची कल्पना आहे, त्यातच शिवरायाचा ओतप्रोत गुणगौरव आहे. पण एकंदर रचना अशा चातुर्यानें व सावधपणें केली आहे कीं, त्या स्तुतीमुळें स्तुत्याच्या ठायीं मीपणाचा फुंज उत्पन्न होऊं नये.

एकंदर लेखाचा आशय असा कीं, हा उत्तम पुरुष निरुपणाचा समास अफजुलखानाचे वधानंतर श्रीसमर्थदर्शनास शिवराय गेले त्या प्रसंगीं झाला असा स्पष्ट उल्लेख हनुमंतस्वामीकृत बखरींत आहे हें बहिःप्रमाण होय. आतील वचनांवरून शिवरायानीं समर्थदर्शनासाठीं केलेला निग्रह आणि खंडोजी खोपडे प्रकरणांतील त्यांची वागणूक या दोन पूर्वप्रसंगाविषयींचा उपदेश सूचित होत असून शिवछत्रपतींच्या गुणांचा यथोचित गौरवहि जितक्या स्पष्टपणें केलेला दिसतो, तितक्याच स्पष्टपणें प्रसंगानुरूप असा आत्मनिवेदनाचा अथवा निरहंकर्तृत्वाचा उपदेशहि केला आहे, असें आढळतें. या अंतर्बाह्य प्रमाणावरून हा समास अफजुलखानाचे वधानंतरच रचला गेला आहे असें निष्पन्न होतें.

श्रीसमर्थ–प्रतापांतील " समर्थे आकारपूर्वक यवनासी मारविलें " या वचनावरून अफजुलखान प्रकरणांत समर्थांनीं बराच महत्वाचा भाग घेतला होता असें दिसतें. तथापि त्यासाठीं वरील दंतकथेचा अथवा

१८ × ६ हा समास अफजुलखानाचे वधाचे अगोदर झाला असला पाहिजे असें अनुमानण्याचें कारण नाहीं. शके १५८० चे अश्विनांत शिवछत्रपतींनीं कर्नाटकांतील आदिलशाही मुलखावर स्वारी केली. त्यांचेवर अफजुलखानास पाठविण्याचा मनसुवा कार्तिकाचे अखेरीस निश्चित होऊन मार्गशीर्षांत अफजुलखान विजापुराहून निघाला. त्यानंतर पौषात साताऱ्या येथें, माघमासीं रामघळीजवळ आणि फाल्गुनांत चाफळ येथें अशा तीन वेळां शिवसमर्थांच्या भेटी झाल्याचा स्पष्ट पुरावा वाकेनिशी टिपणांत व बखरींत मिळतो. जेथे अशा गुप्त वा प्रगट भेटी अनेक वेळां होत आहेत तेथें पत्राचें काय कारण ? आणि ' इशारतीचें बोलों नये। बोलायाचें लिहों नये। लिहायाचें सांगों नये। जवानीनें। ' अशी शिकवण शके १५७७ मध्यें देणारे समर्थ स्वतःच घालून दिलेल्या मर्यादेचें उल्लंघन करून इतकें उघडें पत्र पाठवितील हें शक्य आहे काय ?



# ( १४ )

# श्रीसमर्थांचें आचारस्वातन्त्र्य
## व
## विचारस्वातन्त्र्य *

( लेखक :– रा. गणेश गोविंद कारखानीस, बी. ए.,
गौरव कार्यदर्शी, हरिजनसेवकसंघ, विजापूर )

( १ ) श्रीसमर्थांचा अवतार कशासाठीं होता, हें निदान सुशिक्षितास तरी सांगण्याची आवश्यकता आहे, असें वाटत नाहीं. धर्माची ग्लानि घालविणें, चातुर्वर्ण्याची विसकटलेली घडी पुन: नीट करणें, होत असलेल्या वर्णसंकरास आळा घालून तो थांबविणें, श्रौतस्मार्त सनातनधर्मास उज्ज्वल करणें, अज्ञानी जनतेस आपल्या कर्तव्याची व व्यक्तित्वाची जाणीव करून देऊन तिला कार्यक्षम करणें इत्यादि कार्यें श्रीसमर्थावताराचीं प्रयोजनें होत. हें कार्य श्रीसमर्थांनीं आपल्या

---

* टीप-विजापुरचे रा. काका कारखानीस यांनीं अन्यत्र कोठें श्रीसमर्थांच्या आचारविचाराविषयीं आपले विचार प्रकट केले होते. ते दृष्टीपुढें ठेवून मंगळूरचे श्री. दुर्गाराम बाल हरिदास यांनीं ' श्रीसमर्थ आणि सनातनधर्म ' असें एक पुष्प पहिल्या सुमनहारांत गुंफिलें होतें. तें काकांच्या वाचण्यांत आल्यावर त्याला उत्तर म्हणून त्यांनीं एक निबंध लिहिला. तो निबंध व आपल्या पहिल्या निबंधाची, थोडा फार फरक करून, एक प्रत अशीं काकांनीं आमच्याकडे पाठविली. काकांचा विचार घेऊन हे त्यांचे दोन्ही निबंध आम्ही दुर्गाराम यांचेकडे पाठविले. त्यावर त्यांचेकडून उत्तर म्हणून निबंध आला आहे.

पुष्प १४ वें – हा काकांचा पहिला निबंध. तो वाचून वाचकांनीं वाटल्यास पहिल्या सुमनहारांतील दुर्गारामाचा निबंध उजळणीसाठीं वाचावा. पुष्प १५ वें – दुर्गारामाच्या त्या निबंधावर काकांचें म्हणणें आणि पुष्प १६ वें – त्यावर दुर्गारामाचें उत्तर.

काका आणि दुर्गाराम हे दोघे हि श्रीसमर्थांचे सारखे च अभिमानी आहेत. श्रीसमर्थांवर प्रेम करण्यांत दोघांपैकीं कोणी हि कोणाला हार जाणार नाहीं. पण

( ३ ) दुसरी शंका येत्ये ती ही कीं, श्रीसर्थांचा आश्रम कोणता? श्रीसमर्थ बालब्रह्मचारी होते, ते आमरणान्त तसे च होते, हें सर्वांस माहीत आहे. पण शास्त्रीय दृष्टीनें त्यांचा आश्रम कोणता हें निश्चितपणें सांगणें कठीण आहे. शास्त्रीय दृष्टीनें त्यांचा ब्रह्मचर्याश्रम, त्यांच्या होऊं घातलेल्या विवाहाचे वेळेस संपला होता, म्हणजे समावर्तन विधि पूर्ण जाहला होता, असें मान्य करणें प्राप्त आहे. कारण समावर्तनाशिवाय विवाह होणें, शास्त्रदृष्टीनें तरी, शक्य नाहीं. व्यावहारिक भाषेंत बोलावयाचें झाल्यास त्यांची सोडमुंज झालेली होती. तेव्हां प्रश्न असा उपस्थित होतो कीं, इकडे सोडमुंज झालेली पण तिकडे विवाह न झालेला, तेव्हां अशा अर्धवट स्थितीला कोणता आश्रम म्हणावयाचें? शास्त्राच्या दृष्टीनें ही स्थिति अत्यंत गर्ह्य मानली गेली आहे; येवढेंच नव्हे तर अशा स्थितींत केलेलीं तपदानादि कर्में निष्फळ होतात व तीं करणारास शेवटीं नरकावस्था प्राप्त होते, असें शास्त्रें म्हणत आलीं आहेतः—

अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकमपि द्विजः।
आश्रमेण विना तिष्ठन्प्रायश्चित्तीयते हि सः॥
जपे होमे तथा दाने स्वाध्याये च रतः सदा।
नासौ फलमवाप्नोति कुर्वाणोऽप्याश्रमाच्च्युतः॥ दक्षस्मृतिः
अनाश्रमी व्यपेतश्च आश्रमी च निरर्थकः।
मिथ्याश्रमी च सर्वे वै निरयं यान्ति मानवाः॥ हारीतस्मृतिः
अनाश्रमी न तिष्ठेत यावज्जीवं द्विजोत्तमः॥ बृ. हारीत

( ४ ) तिसरी शंका येते ती भिक्षेसंबंधीची. श्रीसमर्थसांप्रदायाच्या बाह्य चिन्हांपैकीं भिक्षा मागणें हें एक महत्त्वाचें चिन्ह समजलें जातेंः—

ब्राह्मणाची मुख्य दीक्षा। मागितली पाहिजे भिक्षा।
ॐ भवति या पक्षा। रक्षिलें पाहिजे॥

ही ओंवी सर्वांस मुखोद्गत आहे. 'ॐ भवति' हीं अक्षरें ओंवींत आहेत. पण त्यांचा अर्थ सांप्रदायात मात्र निराळा केलेला दिसतो. मधुकरीच्या वेळीं 'ॐ भवति' असें मधुकरी मागणारा गृहस्वामिनीला उद्देशून म्हणतो व भिक्षा ओली-कोरडी नव्हे-घेतो. ही ओली म्हणजे शिजवलेली भिक्षा मागण्याचा प्रघात शास्त्रास अनुसरून आहे. पण श्रीसमर्थसांप्रदायाच्या कोरडी भिक्षा मागण्याच्या प्रघातास शास्त्रात कोठें आधार दिसत नाहीं. कारण

यतिश्च ब्रह्मचारी च पक्वान्न स्वामिनावुभौ।

असें स्पष्ट स्मृतिवचन च आहे. याचा अर्थ असा कीं संन्यासी व ब्रह्मचारी यांना केवळ शिजविलेलें अन्न च विहित आहे. श्रीसमर्थसंप्रदायांत चतुर्थाश्रमास मुळीं च अवकाश नाहीं. तेव्हां ह्या आश्रमाच्या आपणांस ह्या भिक्षेपुरत्या प्रश्नाबाबत विचार कर्तव्य नाहीं. ब्रह्मचाऱ्यास मग तो शास्त्रविहित ब्रह्मचारी असला तरी ( श्रीसमर्थ हे तसे नसावेत असें वर येऊन गेलेंच आहे ) कोरड्या भिक्षेचा निषेध आहे, हें वरील स्मार्त वचनावरून स्पष्ट आहे.

तेव्हां प्रश्न असा कीं, ह्या प्रकारच्या भिक्षेचा संप्रदाय श्रीसमर्थांनीं कोणत्या शास्त्राधारावर स्वीकारला व प्रचारांत आणला ?

दासबोध द. १४×२ मध्यें श्रीसमर्थांनीं आपल्या भिक्षासंप्रदायाला परंपरेचें पाठबळ कसें आहे, हें दासविप्यासाठीं

दत्त गोरक्ष आदि करुनी । सिद्ध भिक्षा मागती जनीं ।

असा पूर्वीच्या भिक्षासांप्रदायिकाचा आधार दिला आहे. पण मुख्य मुद्दा भिक्षा मागणारे कोण हा नसून, ती भिक्षा कोरडी कीं ओली व यापैकीं शास्त्रविहित कोणती व शास्त्रनिषिद्ध कोणती याबद्दलचा आहे. श्रीसमर्थांनीं वर निर्दिष्ट केलेले संत, हे कोणती भिक्षा नेमकी ( कोरडी कीं ओली ) मागत असत याचा उल्लेख कोठें हि नाहीं. जे उल्लेख आहेत, त्यांतील सत्यांश काढणें फार विकट आहे. श्रीगुरुचरित्र, नवनाथ भक्तिसारादि ग्रंथांत या गोष्टीचा उल्लेख येतो, नाहीं असें नाहीं. पण ह्या उल्लेख समाधानकारक नाहीं. याचें कारण उघड आहे. हे संत जवळ जवळ पौराणिक कालांतील असल्यानें यांच्या भोंवतीं त्यांच्या चरित्रकारांनीं अगदीं नवी सृष्टि निर्माण केली आहे. सबब या प्रश्नाचें उत्तर आपणांस त्यांच्या या चरित्र-ग्रंथांत समाधानकारक मिळत नाहीं.

आह्मांस येवढें च दाखवावयाचें आहे कीं, श्रीसमर्थांनीं हा प्रचलित केलेला नूतन भिक्षासंप्रदाय मनुयाज्ञवल्क्यादि शास्त्रांस, निदान ब्रह्मचाऱ्यापुरता तरी, प्रतिकूल भासतो. तेव्हां याचें समाधान कोणास सुचल्यास फार बरें होईल.

( ५ ) चौथा प्रश्न श्रीसमर्थांनीं चालू केलेल्या संप्रदायाबद्दलचा. या प्रश्नाचा थोडा बहुत उहापोह प्रसिद्ध इतिहाससंशोधक राजवाडे यांनीं सुमारें २०।२२ वर्षांपूर्वी ' रामदास व रामदासी ' या मासिकाच्या ' सांप्रदायिक विविध विषय भाग पहिल्याच्या लेखांक सद्तीस ' मध्यें केला आहे. पण त्यानें समाधान होत नाहीं. राजवाड्यांच्या प्रतिपादनांत शास्त्रीय दृष्टी आह्मांस तरी दिसत नाहीं. श्रीसमर्थ स्वतन्त्र आचारविचाराचे होते, गतानुगतिकत्व त्यांच्यांत नव्हतें, सबब ते इतर संतांहून श्रेष्ठ होते, येवढेंच त्यांस सिद्ध करावयाचें होतें. राजवाड्यांप्रमाणेंच कांहीं अंशीं आमचें हि मत आहे. पण या ठिकाणीं प्रश्न असा उपस्थित होतो

कीं, श्रीसमर्थ स्वतन्त्र वाण्याचे असतील व ते आहेत हि, त्यांनीं पूर्वपरंपरेला झुगारून दिलें हें हि कदाचित् चागलें केलें असेल व त्याचा परिणाम हि पाहिजे तोच झाला असेल, पण त्याचें हें करणें पूर्वींच्या सनातनी शास्त्राला धरून आहे काय ? शास्त्रात सागितलेल्या चार आश्रमात श्रीसमर्थांचा संप्रदाय कोठें बसतो ? या शास्त्रविहित चार आश्रमाप्रमाणें श्रीसमर्थसाप्रदायांत क्रम आहे काय ? हुर्मुजी वस्त्रें, संन्यासनिषेध, कुबडी, मेखळा इत्यादि बाह्य चिन्हें कोणत्या श्रुतिस्मृतींचा आधार घेऊन श्रीसमर्थांनीं आपल्या साप्रदायांत चालू केलीं ? श्रीसमर्थांसंबंधींच्या असल्या अनेक बाबींची सूक्ष्म चिकित्सा होणें अत्यंत आवश्यक आहे, असें आमच्याप्रमाणें वाचकास वाटत नाहीं काय ?

( ६ ) पाचवा मुद्दा असा कीं, स्त्रियानीं आपल्या पतिव्यतिरिक्त इतरांस गुरु करावें किंवा कसें ? मग त्या स्त्रिया सुवासिनी असोत या विधवा असोत. सुवासिनी असल्यास स्त्रियास पतिव्यतिरिक्त दुसरा कोणता हि गुरु करणें शक्य व इष्ट नाहीं असें मन्वादि स्मृतिकार कंठरवानें सागत आहेत. ' पतिरेव गुरु: स्त्रीणाम् । ' पति हाच स्त्रियाचा गुरु होय. पतिशुश्रूषेनेंच स्त्रीला सर्व गोष्टींचा लाभ होत असतो, असें याज्ञवल्क्य सागत आहेत —

पतिशुश्रूषयैव सर्वान्कामान्समश्नुते ॥

स्त्रियाना आपल्या पतिशुश्रूषेशिवाय दुसरें मत, तप किंवा यज्ञ नाहीं असें मनु हि सागतात.—

नास्ति स्त्रीणां पृथग्यज्ञो न व्रतं नाप्युपोषितम् ।
पतिः शुश्रूष्यते येन तेन स्वर्गे महीयते ॥ ५।१५४

स्त्रीला पतिपूजनाशिवाय दुसऱ्या कोणत्या हि गोष्टीनें स्वर्गप्राप्ति होत नाहीं, असें शंख ऋषींचें सुद्धा मत आहे —

न व्रतेनोपवासेन धर्मेण विविधेन च ।
नारी स्वर्गमवाप्नोति प्राप्नोति पतिपूजनात् ॥

हे निर्बन्ध झाले सुवासिनींच्या बाबतचे. पण शास्त्रकार विधवांना हि ते च नियम लागूं करतात. पति जिवन्त असतांना स्त्री जशी त्याच्याशीं वागत असते, तसें च तिनें तो मृत झाल्यानंतर हि त्याच्याशीं वागलें पाहिजे, असें मनु सागत आहेत —

तं शुश्रूषेत जीवन्तं संस्थितं च न लंघयेत् ।

शास्त्र मर्यादा अशी असतांना मोक्षगुरु म्हणून पतिव्यतिरिक्त दुसरा कोणी तरी करण्याची किंवा मानण्याची जी पद्धत आहे, ती निदान शास्त्रकारास तरी संमत आहे, असें दिसून येत नाहीं.

वस्तुस्थिति अशी असतांना श्रीसमर्थांनीं अक्कास्वामी, वेणुस्वामी, बाइयाबाई, अंबिकाबाई इत्यादि जे स्त्रीमहंत केले ते कसे ? श्रीसमर्थांना हे शास्त्रनिर्बन्ध माहीत नव्हते असें म्हणणें अज्ञानाचें, धार्ष्ट्याचें व मर्यादातिक्रमणाचें द्योतक होईल. हें पातक आम्ही आपल्या माथीं घेण्याचें साहस करीत नाहीं. श्रीसमर्थांस हें सर्व माहीत असून हि त्यांनीं हें शास्त्रनिषिद्धाचरण कसें केलें, त्यास कारणें काय जाहलीं असावींत, एवढ्या च गोष्टीचें स्पष्टीकरण आम्हास पाहिजे आहे.

एवढ्यावर च हें भागतें तर कांहीं हरकत नव्हती. श्रीसमर्थ या स्त्रियांना केवळ ज्ञानोपदेश करुन व त्यांना त्याच्या उन्नतीचा मार्ग दाखवून स्वस्थ बसते तरी ठीक होतें. पण ते एवढ्यावर च न थांबता याच्या पुढें फार च गेले आहेत. मग त्याच्या ह्या अश्या करण्यांत 'पापयोनी' म्हणून चिरकाल अज्ञानात शास्त्रकारानी दडपून टाकलेल्या अबलाना अनुकूल परिस्थिति प्राप्त करून दिली असता, त्या त्यांच्यावर जुलूम करणाऱ्या पुरुषाच्या जोडीला केवळ ऐहिक गोष्टींत च नव्हे, तर अत्यंत सूक्ष्म व विकट अशा पारमार्थिक गोष्टींत सुद्धा त्याच्या इतकी च नव्हे तर कांकणभर जास्त प्रगति करून दाखविण्यास समर्थ आहेत, हें जगाला सिद्ध करुन दाखविण्याचा परम कारुणिक श्रीसमर्थांचा हेतु होता कीं काय न कळे ? *श्रीसमर्थांनीं आपल्या स्त्रीमहंताना मठ करणें, मन्त्रोपदेश देऊन* शिष्यशाखा वाढविणें इत्यादि गोष्टींत पूर्ण स्वातन्त्र्य दिलें होतें, हें रामदासी वाङ्मयाच्या अभ्यासकास सांगण्याची आवश्यकता नाहीं. श्रीवेणुस्वामी, श्रीअंबिकाबाई व श्रीबाइयाबाई याचे मठ असून त्याची शिष्यशाखा हि बरी च असावी, असें अनुमान या उपलब्ध वाङ्मयावरुन दिसतें. श्रीवेणाबाईंच्या शिष्य श्रीबाइयाबाई व श्रीबाइयाबाईंचें शिष्य श्रीसमर्थांचे प्रसिद्ध चरित्रकार व स्वतन्त्र ग्रंथकार बीड मठाचे अधिपति श्रीगिरिधर गोसावी, हें सर्व विश्रुत आहे.

स्त्रियाना पतिशिवाय दुसरा गुरु — मोक्षगुरु करिता येतो, असें या श्रीसमर्थप्रतापकार गिरिधराचें मत आहे. तें येणेंप्रमाणें —

स्त्रियांसी कर्मदेह भर्तार गुरु । तयांसी कासयासी व्हावे श्रीगुरु ।
ऐसें म्हणाल तरी मोक्षार्थ सद्गुरु । बहुतीं स्त्रियां हि सेविले ॥

प्रताप ११ × ३१

असें सांगून अशा रीतीनें ज्यानीं गुरु केले आहेत अशा पंधरा स्त्रियांचीं नावें त्यानीं 'प्रतापात' उद्धृत केलीं आहेत व आणखी अशा प्रकारचीं उदंड उदाहरणें देता येतील अशी हि ग्वाही 'प्रताप' कार देत आहेत.

गिरिधरानीं दिलेल्या या पंधरा नावाची आपण जरा छाननी करुं या. पैकीं गार्गी व सुलभा या पौराणिक स्त्रिया असून त्या विवाहित असल्याचें दिसून येत

नाहीं. मुक्ताबाई या ऐतिहासिक आहेत व त्या हि कुमारिका च आहेत. या तीनहि स्त्रिया कुमारिका असल्यानें ( शास्त्रानें स्त्रियांना ज्ञानाधिकार दिला असल्यास, कारण त्या पापयोनि आहेत ) त्यांना गुरु करणें शक्य आहे. मैत्रेयी, अनसूया, अरुंधति व उमा यांचे पतिव्यतिरिक्त निराळे गुरु असल्याचें प्रसिद्ध नाहीं. तेव्हां त्यांनीं ब्रह्मनिष्ठ असलेल्या आपल्या पतींस मोक्षार्थ गुरु केले असल्यास त्यांत वावगें काहींच नाहीं. ' पतिरेव गुरुस्त्रीणाम् ' याच सदरांत या स्त्रिया पडतात. मीराबाई ऐतिहासिक आहेत. यांचें लग्न यांच्या इच्छेविरुद्ध लावण्यांत आलें होतें. कारण यांनीं लहानपणीं देवाला च आपला पति म्हणून वरलें होतें इत्यादि प्रकार इतिहासज्ञांस विदित आहेच. कौसल्या मातेनें श्रीरामास आपला मोक्ष गुरु केल्याचें कोठें उपलब्ध नाहीं व तिची ब्रह्मनिष्ठ स्त्री म्हणून ख्याती हि पण नाहीं. तिला श्रीरामचंद्रानीं ब्रह्मज्ञान सांगितलें असेल, पण तें गुरुशिष्य या नात्यानें सांगितल्याचें ऐकिवांत नाहीं. एरव्हीं ज्ञान सांगणें निराळें व गुरुशिष्यसंबंधानें ज्ञान सांगणें निराळें. भगवान् श्रीकृष्णानीं आपल्या यशोदा मातेला व धृतराष्ट्राला आपलें विश्वरूप दाखविलें होतें, तसेंच तें आपले परमशिष्य जे अर्जुन व उद्धव यांनाहि दाखविलें होतें. पण अर्जुन व उद्धव यांस जसें भगवंताचे शिष्य मानण्यांत येतें, तसें यशोदामातेला किंवा धृतराष्ट्राला त्यांचे शिष्य असें कोणी समजत नाहींत. त्याचप्रमाणें कौसल्यामातेला हि श्रीरामचंद्राची शिष्या मानण्यांत आल्याचें कोठें आढळत नाहीं. जो प्रकार कौसल्येचा तो च प्रकार कपिलमाता देवहूतीचा. ध्रुवमाता एका श्रेष्ठ भक्ताची माता म्हणून मोठी असली तरी ब्रह्मनिष्ठांच्या पंक्तींत पुराणांनां तिला बसविलेलें व मोक्षार्थ तिनें कोणाला गुरु केल्याचें दिसून येत नाहीं. कौसल्या, देवहूति व सुनीति यांचीं नांवें ब्रह्मवेत्त्यांच्या सदरांत गिरिधरांनीं का व कशीं घातलीं हें कळत नाहीं. आतां राहिलेल्या चार स्त्रियांपैकीं मदालसा, चूडाला व लीला या तीन हि उच्च पदवीला पावलेल्या ब्रह्मनिष्ठ म्हणून प्रसिद्ध आहेत पैकीं मदालसेला साक्षात् श्रीशंकराचा अनुग्रह होता, पण तो ती आपल्या पतीबरोबर – ऋतुध्वजबरोबर या भूलोकीं नांदत असतांना झालेला नसून, पतिनिधनाची खोटी वार्ता ऐकून स्वर्गास गेल्यावर तेथें झालेला आहे, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. चूडाला व लीला या कोणापासून ज्ञानप्राप्ति करून घेऊन कृतकृत्य झाल्या, हें योगवासिष्ठावरून स्पष्ट होत नाहीं. मैनावतीनें मात्र जालंदरनाथास गुरु केल्याचें प्रसिद्ध आहे.

वरील विवरणावरून वाचकाच्या लक्षांत सहज येईल कीं, गिरिधरांनीं " मोक्षार्थ सद्गुरु । बहुता स्त्रिया हि सेविले ॥ " या आपल्या सिद्धांताच्या पुष्ट्यर्थ जीं पधरा उदाहरणें घेतलीं आहेत, त्यांतील बारा त्याच्या विरुद्ध अजिबात जात आहेत, दोनींबद्दल संशय आहे व एक मात्र त्यांच्या म्हणण्यास दुजोरा देत आहे. आमची सुज्ञ वाचकास विनंति ही कीं, त्यांनीं आपल्या मनाशींच

गिरिधरांच्या विधानाचा विचार चिकित्सापूर्वक करून आपलें मत बनवावें. पण, घटकाभर आम्ही गृहीत धरतों कीं, हीं गिरिधरांचीं सर्व उदाहरणें बरोबर आहेत. पण आमचा मुख्य प्रश्न असा आहे कीं, हीं सर्व उदाहरणें स्मृतींना विरुद्ध जातात त्याची वाट काय ?

समाजामध्यें अशा प्रकारें अभूतपूर्व सुधारणा सर्व शास्त्रें विरुद्ध असतांना, श्रीसमर्थांपूर्वी, भगवान् श्रीकृष्णांशिवाय, दुसऱ्या कोणी महात्म्यानें घडवून आणल्याचें इतिहासपुराणज्ञांस माहीत नाहीं. निदान सनातनीयांस तरी माहीत नाहीं. स्त्रियांनीं मठमहंतादि करणें, इतरांस ज्ञानोपदेश करणें हें बौद्ध सांप्रदायांत एका काळीं फार ज्यारींत होतें. जैन, महानुभाव व लिंगायत या सांप्रदायांत हि प्रचलित होतें. पण हे सर्व संप्रदाय अवैदिक होत. तेव्हां या प्रश्नाबाबत आपणांस त्यांशीं कर्तव्य नाहीं. पण श्रीसमर्थांनीं घालून दिलेलें हें उदाहरण सनातनीयांस अगदीं नवीन होतें. त्यांच्यापूर्वी वारकरी सांप्रदायांत मात्र या प्रश्नाचा थोडा विचार होऊन या गोष्टीस थोडी चालना देऊन ती प्रत्यक्ष कृतींत आणण्याचा थोडा बहुत प्रयत्न झालेला दिसतो. श्रीमुक्ताबाई व श्रीनामदेवशिष्या जनाबाई हीं त्याचीं फलें होत. श्रीज्ञानेश्वरनामदेवांनंतर श्रीसमर्थांचे कालापर्यंत वारकरी सांप्रदायांत नाव घेण्यासारखा वर उल्लेखिलेल्या दोन स्त्रियांखेरीज, कोणी स्त्री महंत झालेला आढळून येत नाहीं. जीं नांवें आढळतात तीं किरकोळ आहेत. श्रीसमर्थांचे काळीं त्यांचे समकालीन श्रीतुकाराम महाराज यांच्या शिष्यवर्गांत सुद्धां बहिणाबाईसारखी कर्तबगार एखादीच दिसते. पण श्रीसमर्थांनीं आपल्या आयुर्मानांत केलेल्या साक्षेपी स्त्रीमहंतांच्या नामावलीकडे पाहिलें, तर मति गुंग होऊन जाते. कोणत्या हि आधुनिक सुधारकाच्याला श्रीसमर्थांचें हें सामाजिक कार्य सदैव उदाहरण होऊन राहण्यासारखें आहे. तात्पर्य, ऐतिहासिक कालांत ही आचारविचारांतील क्रांति अगदीं नवी होती. आपल्या धगधगीत वैराग्यानें प्रचंड तपश्चर्येनें व भगीरथ प्रयत्नानें श्रीसमर्थांनीं ही सामाजिक सुधारणा समाजाच्या गळीं उतरविली होती हें समर्थसांप्रदायिक वाङ्मयाच्या भक्तांस सांगण्याची फारशी आवश्यकता आहे असें वाटत नाहीं. श्री वेणाबाई व अंबिकाबाई यांचे मठ अनुक्रमें मिरज व शिवडें येथें अद्याप विद्यमान आहेत. या संबंधीं जास्त माहिती बद्दल जिज्ञासूंनीं 'प्रतापा'स वाट पुसावी, एवढें सांगून मुख्य मुद्याकडे वळतों.

परम कारुणिक श्री समर्थांनीं हें सर्व त्या वेळेच्या परिस्थितीला अनुरूप केलें असेल, तत्कालीन समाजाची सर्वांगीण उन्नति त्यायोगें घडून आली असेल, संसाराचीं दोन चक्रें तुल्यबल होऊन तो त्यावेळीं अगदीं कार्यक्षम जाहला असेल; नाहीं असें नाहीं. किंबहुना श्रीसमर्थांच्या या सम, व्यापक व उदार दृष्टीनें त्या वेळीं समाजांत केवढी धार्मिक, राजकीय व सामाजिक क्रान्ति घडवून आणली व त्यायोगें केवढें

प्रचंड आंदोलन जाहलें याची साक्ष मराठ्यांचा इतिहास देत च आहे. पण आपला हा मुख्य मुद्दा नाहीं हें वाचकांनीं फिरून लक्षांत ठेवावें. मुद्दा असा आहे कीं, स्त्रियांस मग त्या किती हि ज्ञानवैराग्य संपन्न असोत, इतरांस ज्ञानोपदेश करण्याची अनुज्ञा पूर्वशास्त्रकारांनीं दिली आहे काय? दिली असल्यास कोठें दिली आहे? दिली नसल्यास हें शास्त्रनिषिद्ध आचरण नव्हे काय? कां, ही श्रीसमर्थांनीं समाजांत नवीन क्रान्ति घडवून आणून जगास एक सामाजिक सुधारणेचा नवा पाठ भविष्यत्कालासाठीं घालून दिला? या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर पाहिजे आहे. श्रीसमर्थांची त्यांच्या सांप्रदायिक वाङ्मयाचा अभ्यास करणाऱ्या विद्वानांत, भक्तांत – मग ही मंडळी सांप्रदायिक असोत वा नसोत – व अभिमान्यांत ते सामाजिक सुधारणावादी होते अशी प्रसिद्धि नाहीं, येवढें च नव्हे, तर उलट ते पुराणमताभिमानी सनातनी होते, असें च हे विद्वान व इतर, वेळीं अवेळीं आपल्या व्याख्यानांत, प्रवचनांत, लेखांत व खासगी संभाषणांत प्रतिपादितांना दिसतात तेव्हां हे विद्वान या प्रश्नाचें उत्तर निर्विकारपणें व समाधानकारक देतील काय?

( ७ ) *मोक्षगुरु ब्राह्मण च पाहिजे, मग तो क्रियाहीन असला तरी चालेल, नीच यातीचा माणूस केवढा हि ज्ञानी झाला तरी त्याला गुरुत्व घडणें शक्य नाहीं व इष्ट नाहीं,* असें मत श्रीसमर्थ ठिकठिकाणीं प्रतिपादितात.

( अ ) गुरु तो सकळांसी ब्राह्मण । जर्‍ही तो जाला क्रियाहीन ।
तरी तयासी च शरण । अनन्यभावें असावें ॥ दा. ५।१।६

( ब ) नीच यातीचा गुरु करूं नये । दा. १४२४३१

( क ) नीच यातीचा गुरु । तो हि कानकोंडा विचारु ॥ ५।२।५८

( ड ) नीच यातसि गुरुत्व न घडे । ५४२।६२

या सर्वांचें तात्पर्य असें कीं, श्रीसमर्थमतें ब्राह्मणेतर मनुष्य ब्राह्मणांचा मोक्षगुरु केव्हांच होणें शक्य नाहीं. त्याला त्यांनीं कारणें दिलीं आहेत. पण तीं मुळींच तर्कशुद्ध दिसत नाहींत. जन्मजात ब्राह्मणांचा कैवार श्रीसमर्थांनीं दा. द. ५४१४६–१६ मध्यें बराच घेतला आहे. पण त्याच्या उलट

करिती ब्रह्मनिरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण ।
ते चि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद ॥ ६४८४२४

या ठिकाणीं ते जन्माला मान देत नसून गुणकर्माला मान देत आहेत, हें स्पष्ट आहे. या ओंवीचा अर्थ शब्दच्छल करून निराळा लावल्याचें आम्हीं कांहीं वेळां ऐकिलें आहे. पण आम्ही त्यास डावलून पुढें जातों. ज्याला ब्रह्मसाक्षात्कार झाला

तोच ब्राह्मण, असा या ओंवीचा स्पष्ट अर्थ आहे. असें असतांना ब्राह्मणच मोक्षगुरु पाहिजे हा आग्रह कां हें कळत नाहीं.

ब्राह्मणेतर गुरु केल्यास त्या गुरूचें तीर्थ घेतां येत नाहीं, त्याचें तीर्थ टाकून दिल्यास गुरुभक्तीस बाधा येते, इतका हि दोष पत्करून एखाद्यास असला च गुरु करावासा वाटल्यास त्यानें एकट्यानें च भ्रष्टावें, पण इतरांस आपणांसारखें भ्रष्टवूं नये इत्यादि जें श्रीसमर्थ दा. द. ५ × २ मध्ये प्रतिपादितात, त्याच्या उलट ' दासविश्रामधाम ' कार श्रीआत्माराम महाराज आपल्या धामाच्या अध्याय सतराव्यामध्यें प्रतिपादित आहेत, त्याची वाट कशी लावावयाची ? श्रीसमर्थांचे दत्तोबा व कृष्णाप्पा नांवाचे दोन न्हावी जातीचे शिष्य होते. यांचें वर्णन आत्माराम महाराजांनीं अध्या २१ यांत केलें आहे. पैकीं प्रस्तुत प्रकरणीं आपणांस कृष्णाप्पाशीं कर्तव्य आहे. यांचे कोणी जयराम नांवाचे शिष्य होते. श्रीसमर्थांज्ञेने च कृष्णाप्पांनीं या जयरामांस अनुग्रह देऊन पावन केलें होतें. तेव्हां आतां या गोष्टीची व ' गुरु तो सकळांसी ब्राह्मण ' किंवा ' स्वयातीचा पाहिजे गुरु । नाहीं तरी भ्रष्टाकारु । नेमस्त घडे ॥ ' ५ × २ × ६४ या वचनांची सांगड कशी घालावयाची ? श्रीसमर्थ चुकले ह्मणावयाचे, कीं आत्माराम महाराजांस या वचनांचा भावार्थ समजला नाहीं ह्मणावयाचा ? कां आत्माराम महाराजांचें

भाव मात्र येक असावा चांग । यातीस कारण नाहीं कीं ॥ धाम २१×६६

हें वाक्य प्रमाण मानावयाचें ? पण असें केरयानें ' गुरु तो सकळांस ब्राह्मण ' इत्यादि वचनांस हरताळ लागतो याची वाट काय ? आत्माराम महाराजांचें वरील वाक्य प्रमाणभूत मानल्यास व त्यांनीं दिलेला कृष्णाप्पा न्हाव्यांचा इतिहास विश्वसनीय धरल्यास इतर संतांत व श्रीसमर्थांत काय भेद राहिला ? पण असें होणें आमच्यांतील कांहीं विद्वानास इष्ट नाहीं. त्यांच्या मतें श्रीसमर्थ च काय ते ' येकेकार गजावरि पंचानन ' व बाकीचे सर्व संत सबगोलंकाराला अनुकूल. तेव्हां या सांपळ्यांतून कसें पार पडावयाचें ? श्रीसमर्थ प्रमाण, कां आत्माराम महाराज प्रमाण ? आत्माराम महाराजांनीं दिलेली कथा प्रमाणभूत मानल्यास श्रीसमर्थवाक्याचें प्रामाण्य कमी होत नाहीं काय ?

मनुस्मृतीच्या चवथ्या अध्यायांत

न शूद्राय मतिं दद्यात् .... .... .... ।
न चास्योपदिशेद्धर्मं न चास्य व्रतमादिशेत् ॥ ८०

असा एक श्लोक आहे व त्याचा अर्थ शूद्राला सल्ला देऊं नये, त्याला धर्मोपदेश व कोणत्याहि व्रताचा उपदेश देऊं नये, असा आहे. अशा प्रकारचीं आणखीं किती

तरी शास्त्रवचनें देता येतील पण आपणांस सध्या एवढें एकच पुरे. श्रीसमर्थांच्या साप्रदायात ब्राह्मणेतर शिष्य किती तरी होते व श्रीसमर्थमतें हे सर्व शूद्र असावेत असें वाटतें तसें नसतें तर त्यानीं ब्राह्मणावरोबर च निदान इतर दोन वर्णांस ह्मणजे *क्षत्रिय व वैश्य या दोन वर्णांस वेदाधिकार आहे असें ह्मटलें असतें. पण त्यानीं तसें* ह्मटलेलें दिसत नाहीं वेदाध्ययनाचा अधिकार केवळ ब्राह्मणाचाच असें त्याचें स्पष्ट मत दासबोधात दिसून येतें —

तया ब्राह्मणदेहास पाहो । अधिकार वेदीं ॥ १०×२×१७

श्रीसमर्थांचें हें मत श्रुतिस्मृतींस धरून नाहीं, हें या वचनावरून स्पष्ट आहे. असें असताना सुद्धा श्रीसमर्थ या शूद्रादिकांस नुसते सल्ला मसलत देऊन थाबले असें मुळींच नाहीं, तर आत्मसाक्षात्कारापर्यंतचें ज्ञान त्यानीं आपल्या मराठे, कुणबी, न्हावी इत्यादि शिष्यास दिल्याचें इतिहासप्रसिद्ध आहे. या त्याच्या कृतीस धर्मशास्त्राचा टेकू आहे काय ? असा प्रश्न आहे.

तया ब्राह्मणदेहास पाहो । अधिकार वेदीं ॥

या वचनावरून आणखी एक शका उपस्थित होते, ती अशी कीं, ब्राह्मणाव्यतिरिक्त वेदांचा अर्थात् त्यावरोबर वेदोक्त कर्मांचा अधिकार जर इतरांस ह्मणजे क्षत्रिय व वैश्यांस सुद्धा नाहीं, तर मग त्यानीं श्रीशिवछत्रपतींस पडितवर्य गागाभट्टाकरवीं वेदोक्तमन्त्रानीं राज्याभिषेक करविण्याचा खटाटोप का करावा ? श्रीशिवछत्रपतींचें क्षत्रियत्व सिद्ध करविण्याची यातायात कां करावी ? हें समजत नाहीं. " त्रयोदशाक्षरी मन्त्राचा जप करण्याच्या अगोदर आसनविधि व प्रणवकार पृथ्व्यादि तान्त्रिक व वैदिक मन्त्रानीं करण्यास समर्थसाप्रदायाची त्रैवर्णिक अशा सर्व रामदासी साप्रदायिकास व अर्थात् भोंसल्यास अनुज्ञा होती, " " पुरश्चरणें करण्यासहि समर्थसाप्रदायाची त्यास ( भोंसल्यास ) अनुज्ञा होती, " " षोडश सस्कार वेदोक्त मन्त्रानी करण्याची हि वहिवाट भोंसल्याच्या कुळात असावी " इत्यादि जें राजवाडे प्रतिपादितात ( सा वि. वि. भा १ ले. ३४ ) त्याचा व दासबोधातील वर उध्दृत केलेल्या वचनाचा समन्वय कसा करावयाचा ? अशी शका मनास त्रास देऊ लागली ' मनस्यन्यद्वचस्यन्यत्कर्मण्यन्यत् ' अशा आचरणाची श्रीसमर्थचरणीं स्वप्नात सुद्धा चुकून शका घेणें ह्मणजे महत्पातकाचें आस्पद होणें आहे. ' विचारून व विवचून बोलण्याचा ' त्याचा बाणा होता, ' बोला ऐसी क्रिया ' हें त्याच ब्राद-वाक्य होतें. असें असता हें लेखनात व क्रियेत विसवादित्व का ? याचें उत्तर पाहिजे आहे.

( ८ ) दासबोधात एके ठिकाणीं श्रीसमर्थ

अतर येक तों खरें । परी सागातीं घेऊ न येती माहारें । १३×१०×१३

असा उपदेश समाजाला–सवर्ण ह्मणविणाऱ्या समाजाला–करीत आहेत. सर्वांचीं अन्तःकरणें आपल्या हातीं धरणारा व इतरांस तसें करा असा उपदेश करणारा हा योगी, व्यवहारांत कां होईना, अशी भेदनीति कां शिकवितो हें कळत नाहीं. पण प्रत्यक्ष श्रीसमर्थ च आपल्या या वचनाविरुद्ध एके ठिकाणीं बोलत आहेत. जनींजनार्दनास तोषविण्यासाठीं भजन कसें करावयाचें या प्रश्नाचें उत्तर त्यांनीं पुढील प्रमाणें दिलें आहेः–

> भेटो कोणी येक नर । धेड माहार चांभार ।
> त्याचें राखावें अंतर । या नांव भजन ॥ करुणाष्टकें २१५ × ९

पण या वचनाचा अर्थ काय करावयाचा? स्त्रीशूद्रसंबंधीं श्रीसमर्थांचें धोरण काय होतें हें वर येऊन गेलेंच आहे. प्रस्तुत आपणांस वर उद्धृत केलेल्या करुणाष्टकांतील वचनाचा विचार कर्तव्य आहे. हल्लींच्या भाषेंत ज्यांना सनातनी म्हणतात, त्याप्रमाणें च श्रीसमर्थ होते, असें कांहीं विद्वानांचें मत आहे व याला आधार म्हणून ते ग्रंथराजांतील पुढील ओंवी पुढें करतातः–

> भेद ईश्वर करूनि गेला । त्याच्या वाचेन न वचे मोडिला ।
> मुखामध्यें घांस घातला । तो अपानीं घालावा ॥ १७ × ४ × २७

यांच्या मतें नीच तो नीच च, तो किती हि ज्ञानी झाला, तरी त्यास उत्तम वर्णाची सर कधीं यावयाची नाहीं. या च सिद्धांताच्या पुष्ट्यर्थ श्रीसमर्थांचें आणखी एक वचन त्यांस आपणांसारखे सनातनी समजणारे हे विद्वान् उद्धृत करीत असतातः–

> जरी ज्ञान जालें जनीं नीच याती ।
> तरी तें नव्हे वंद्य कांहीं महंतीं ॥ करुणाष्टकें १३४ × ८७

वर कृष्णाप्पा न्हावी यांची गोष्ट येऊन गेली आहे. नापिताची जात श्रेष्ठ असें कोणता सनातनी मान्य करील बरें? तरी पण कृष्णाप्पा महंती करीत होते ना? शास्त्रकार स्त्रीयोनीला पापयोनि म्हणतात. पण या पापयोनींपैकीं कित्येक अधिकारी महंत श्रीसमर्थांचे पट्टशिष्य असून संप्रदाय वाढवीत होते ना? श्रीसमर्थमतें ब्राह्मणेतर सर्व शूद्र होत. मग शिरवळचे बाजी गोसावी व पारगांवचे शंकराजी गोसावी हे काय ब्राह्मण होते? शूद्र असून सुद्धां ते महंतगिरी करीत होते च ना? नीच योनींत जन्म घेतलेल्या सेना न्हावी, कान्होपात्रा, गोरा कुंभार, रोहिदास चांभार, चोखामेळा, बंका महार प्रभृति संतांना श्रीसमर्थांनीं व त्यांच्या पट्टशिष्यांनीं – कल्याणांनीं – आपल्या 'संतनामावळींत' व 'आरतींत' नमन केलें आहे तें कां। नीच

जातीचा मनुष्य मग तो केवढा हि ज्ञानी असो, तो उच्चवर्णीयांस नमनार्ह कसा ! याला शास्त्राधार कोणता ! तेव्हां श्रीसमर्थांचें वाक्य ' जरी ज्ञान जालें जनीं नीच याती ' इत्यादिचा व त्यांच्या वर लिहिलेल्या प्रत्यक्ष कृतीचा मेळ कसा घालावयाचा ?

( ९ ) आमच्या लिहिण्याचा आशय सुज्ञ वाचकांच्या लक्षांत आला असेल. सनातनी ह्मणविणाऱ्या रामदासी वाङ्मयाच्या अभ्यासकांचा आग्रह असा कीं, श्रीसमर्थ हे सर्वतोपरी श्रुतिस्मृत्युक्त आचारांचें तंतोतंत पालन करणारे होते. आह्मांस तसें वाटत नाहीं. आह्मास श्रीसमर्थांच्या आचारांत व विचारांत पूर्ण स्वातन्त्र्य दिसतें. त्यांचें हें स्वातन्त्र्य देशकालवर्तमानाप्रमाणें शास्त्राच्या आचारांत केलेल्या योग्य सुधारणा असाव्यात किंवा काय असें वाटतें. तरी वर उपस्थित केलेल्या शंकांचें साधार समाधान कोणाकडून झाल्यास प्रस्तुत प्रसंगीं तें अनेक दृष्टींनी अनेकांस मार्गदर्शक व हितावह होईल अशी खात्री आहे.



( १५ )

॥ श्रीरामसमर्थ ॥

# श्रीसमर्थांचें आचारस्वातन्त्र्य व विचारस्वातन्त्र्य या लेखावरील श्री. दुर्गाराम रामदासी यांच्या कांहीं आक्षेपांचा परामर्श *

( लेखक — रा. गणेश गोविंद कारखानीस, बी. ए., गौरव कार्यदर्शी, हरिजनसेवकसंघ, विजापूर )

चार पांच वर्षे झालीं. मुंबईस त्या वेळीं निघणाऱ्या 'नवशक्ति' या मराठी दैनिकांत, आम्ही 'श्रीसमर्थांचें आचारस्वातन्त्र्य व विचारस्वातन्त्र्य' म्हणून एक लेख लिहिला होता. त्यास उत्तर म्हणून मंगळूरच्या श्री. दुर्गाराम रामदासी यांनीं 'पहिला सुमनहार' यांत 'श्रीसमर्थ व सनातन धर्म' म्हणून एक लेख लिहून आमच्या लेखाचें खंडण करण्याचा प्रयत्न केला आहे. आपला हा खंडणात्मक लेख लिहिण्याच्या वेळेस, त्याच्या समोर आमचा लेख नसावासा वाटतें व केवळ आपल्या स्मरणशक्तीवर विसंबून, त्यांनीं आपला लेख लिहिलेला आहे असें दिसतें. तसें नसतें तर, त्यांनीं आमच्या तोंडीं आम्हीं न केलेलीं विधानें घातलीं नसतीं व आमच्या सर्व विधानांचा परामर्श त्यांनीं घेतला असता. पण तसें दिसत नाहीं. त्यांनीं आमच्या लेखातील कांहीं थोड्या मुद्यांचा विचार केलेला दिसतो. आमचा मूळचा लेख याच सुमनहारात अन्यत्र प्रसिद्ध करण्यांत येत आहे. वाचकांनीं तो व श्री. दुर्गाराम यांचा लेख वाचावा अशी त्यांस विनंति आहे. या लेखांत श्री. दुर्गारामांनीं आमच्या लेखावर जे आक्षेप काढले आहेत, त्याचा विचार आम्हीं करणार आहोंत.

मूळच्या लेखांत आम्ही थोडें कमी जास्त केलें आहे. पण त्यातील, श्री. दुर्गाराम यांनीं ज्या मुद्यांचें खंडण करण्याचा प्रयत्न केला आहे ते व इतर मुद्दे जसेच्या तसे च आहेत. एक च मुद्दा त्यात आम्ही गाळला आहे. 'श्रीसमर्थ-

* टीप — पृष्ठांक ९० वरील टीप पहावी.

सांप्रदायी गृहस्थाश्रमी भिक्षा मागतात तें शास्त्रनिषिद्ध आहे ' असें आमचें विधान होतें. तें चुकीचें आहे, हें श्री. दुर्गारामांनीं सिद्ध केलें आहे. तें आम्हांस मान्य आहे, म्हणून आम्ही तो मुद्दा आमच्या या लेखांत गाळला आहे.

' पहिला सुमनहार ' हें पुस्तक आजवर आम्हांस वाचावयास मिळालें नव्हतें. तें नुकतेंच आम्ही वाचलें. त्यांत श्री. दुर्गाराम रामदासी यांनीं आमच्या विधानांचें जें खंडण केलें आहे, तें कितपत शास्त्रीय धरून आहे तें आतां क्रमशः पाहूं याः—

( १ ) " श्रीसमर्थांचा आश्रम कोणता " या आमच्या प्रश्नास श्री. दुर्गाराम उत्तर देतात कीं, " श्रीसमर्थांचा आश्रम विद्यास्नातक ब्रह्मचारी ". ' विद्यास्नातक ब्रह्मचारी ' हा शब्दप्रयोग शास्त्रदुष्ट आहे. स्नातक व ब्रह्मचारी हे शब्द च परस्पर-विरोधी अर्थाचे आहेत. स्नातक याचा अर्थ च मुळीं विवाहाकरितां स्नान केलेला असा आहे. श्री. दुर्गाराम यांनीं याज्ञवल्क्य स्मृतींतील १ × ५१ हा श्लोक आपल्या बाजूचें प्रमाण म्हणून दिला आहे. पण तो चूक आहे. तो त्यांच्याच विरुद्ध जात आहे. या श्लोकापासून प्रारंभ होणाऱ्या प्रकरणाला विवाहप्रकरण असें नांव दिलें असून विज्ञानेश्वरांनीं त्याचा प्रारंभ ' यः पुनर्विवाहस्तस्यस्नानमाह ' अशा या श्लोकाच्या आधीं केला आहे. तेव्हां विद्याध्ययन पूर्ण करून ब्रह्मचर्य व्रतानें राहणारा तो विद्यास्नातक, अशी जी ' विद्यास्नातक ' शब्दाची व्याख्या श्री. दुर्गाराम देतात ती स्वकपोलकल्पित आहे. शास्त्रीय नव्हे. ' विद्यास्नातक ' शब्दाचा अर्थ ' धर्मसिंधु ' कार पुढीलप्रमाणें करतातः—

तत्र एकं द्वौ त्रीन् चतुरो वेदान् वेदैकदेशं वा अधीत्य तदर्थंच
ज्ञात्वा द्वादशवर्षादि ब्रह्मचर्य कालावधेः प्रागेव स्नाति सः विद्यास्नातकः

म्हणजे त्यामध्यें एक, दोन, तीन अथवा चार वेद किंवा वेदाचा एक भाग यांचें पठण करून व त्याचा अर्थ जाणून बारा वर्षें इत्यादिक ब्रह्मचर्य कालाचा जो अवधि सांगितला, त्याचे पूर्वींच जो स्नान म्हणजे समावर्तन म्हणजे सोडमुंज करतो तो विद्यास्नातक. श्री. दुर्गारामांचें यानें समाधान होईल काय ?

*एवढ्यांवर त्यांचें समाधान होत नसल्यास ' स्नातक ' या शब्दाबद्दल मनु* काय म्हणतात तें पुढें देतोंः—

वेदविद्याव्रतस्नाताञ्छ्रोत्रियान्गृहमेधिनः ।
पूजयेद्धव्यकव्येन विपरीतांश्च वर्जयेत् ॥ ४ × ३१

याचा अर्थः—वेदविद्याव्रतस्नातक असलेल्या श्रोत्रियगृहस्थाश्रम्यांचें पूजन ( गृहस्थानें ) हव्यकव्यांनीं करावें... ...इ. या श्लोकावर कुल्लूकभट्टांचें भाष्य असें आहेः—

वेदविद्यास्नातानिति विद्यास्नातकव्रतस्नातकोभयस्नातकास्त्रयोऽपि गृह्यन्ते म्हणजे 'वेदविद्याव्रतस्नातान्' या शब्दानें विद्यास्नातक, व्रतस्नातक व विद्याव्रतस्नातक या तिघांचें हि ग्रहण आहे. श्री. दुर्गारामांचा 'विद्यास्नातक' यांत आला आहे व तो गृहस्थाश्रमी च आहे, हें श्लोकांतील 'गृहमेधिनः' या पदानें माध्याह्नकालाच्या सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे. असें असतांना 'विद्याध्ययन पूर्ण करून ब्रह्मचर्यव्रतानें राहणारा तो विद्यास्नातक' असा अर्थ ते कोणत्या स्मृतीच्या आधारावर देतात तें कोण जाणे ?

मनु अ. १ × ११३ या श्लोकांतील "स्नातकस्य व्रतानि च' या पदांतील 'स्नातकस्य' या शब्दाचा अर्थ कुल्लूकभट्टांनीं 'गृहस्थस्य' असा केला आहे. स्नातक म्हणजे गृहस्थ.

(२) 'अनाश्रमी न तिष्ठेच्च दिनमेकमपिद्विजः' हें वाक्य मानणें कठीण आहे, असें श्री. दुर्गाराम म्हणतात. कां तर "समावर्तनोत्तर त्रिरात्र आशौच सांगितलेलें आहे. मग आशौचांत विवाह कसा होईल" अशी आपत्ति येथें असें त्यांचें म्हणणें आहे. पण ही अडचण मुळीं उपस्थित च होत नाहीं. कारण 'समावर्तनोत्तर त्रिरात्र आशौच ब्रह्मचर्यावस्थेंत दहा दिवस आशौच धरण्यासारखा कोणी आपल्या सपिंडांतला मृत झाला असेल, तर समावर्तन झाल्यावर मृताला तिलांजलि देऊन तीन दिवस अतिक्रान्त आशौच धरावें, असा निर्णय 'धर्मसिंधु' कार देतात. म्हणजे कोणी मृत झाला नसल्यास हें त्रिरात्र आशौच पाळण्याची आवश्यकता नाहीं, असा याचा अर्थ झाला. अशा रीतीनें श्री. दुर्गाराम यांच्या विधानांतील आमच्या विरुद्ध येणारी एक नड दूर झाली. दुसरी अडचण अशी कीं, ब्रह्मचर्यावस्थेंत, वर लिहिल्याप्रमाणें, कोणी मृत झाला असल्यास 'अतिक्रान्त आशौच' धरलें पाहिजे ही होय व ती मान्य केल्यास श्लोकांतील 'दिनमेकमपि द्विजः' याची वाट कशी लावावयाची असा प्रश्न उभा राहतो. पण याचें उत्तर हि श्री. दुर्गाराम समजतात तसें बिकट नाहीं. मग हें त्रिरात्र आशौच 'कर्मांग' या विधींत पडतें व तें शास्त्रविहित च आहे. याप्रमाणें दुसरी अडचण दूर झाली. या ठिकाणीं वाचकांस आणखी हि एक गोष्ट सांगावीशी वाटते. ती ही कीं, या 'अतिक्रान्त आशौचा' बाबत पंडितांत मतभेद आहे. विज्ञानेश्वर तें पाळण्याची आवश्यकता नाहीं असें म्हणतात, तर माधव तें पाळलें पाहिजे असें म्हणतात. सारांश, श्री. दुर्गारामांचें याबद्दलचें म्हणणें कितपत तर्कशुद्ध व शास्त्रशुद्ध आहे, याचा विचार वाचकांनीं च आपल्या मनाशीं ठरवावा व योग्य तो निर्णय द्यावा.

"ब्रह्मचर्य सोडलेल्या दिवशीं च जर विवाह व्हावा, तर स्मृति व सूत्रें यांत इतके स्नातकाचे धर्म सांगण्याची जरूरी नव्हती" असें श्री. दुर्गाराम म्हणतात, स्नातकाचे धर्म शास्त्रकारांनीं किती हि सांगितले तरी

त्यांत बिघडलें कोठें? या ठिकाणीं घोटाळा झाला आहे. तो श्री. दुर्गारामांच्या समजुतींत, ते धरून बसले आहेत कीं स्नातक म्हणजे ब्रह्मचारी. त्याला शास्त्रकारांनीं काय करावें? दोष स्मृतिकारांचा नाहीं. तो त्या समजून घेणारांचा आहे. याज्ञवल्क्य स्मृतींत गृहस्थधर्मप्रकरणानंतर स्नातक धर्मप्रकरण दिलें आहे. त्यांत एक श्लोक आहे:—

शुक्लांबरधरो नीचकेशश्मश्रुनखः शुचिः ।
न भार्यादर्शनेऽश्नीयान्नेकवासा न संस्थितः ॥ १ × १३१

विज्ञानेश्वरांचा या श्लोकावरील अभिप्राय असा आहे:— स्नातकानें – मग तो तीन हि स्नातकांपैकीं कोणता का असेना – नित्य दोन शुभवस्त्रें धारण करावींत; केंस, श्मश्रु व नखें काढावींत; ... ... चंदन, सुवासिक पुष्पाच्या माळा यांचें आदरानें सेवन करावें, ... ... वैभव आल्यास सुवर्णाच्या व रत्नाच्या माळा घालाव्यात; ... ... भार्या समोर असतांना जेऊं नये इ. इ. वरील श्लोकाचा पूर्वार्ध व मनु ४ × ३५ चा पूर्वार्ध जवळ जवळ एकच आहे. वर आम्ही ' स्नातक ' शब्दाचा अर्थ मनुस्मृति ( ४ × ३१ ) काय करते याचें विवरण केलें च आहे. त्या स्मृतीच्या चौथ्या अध्यायात गृहस्थानें कसें वागावें, काय करावें, त्याचे धर्म कोणते इ. हें वर्णन आहे. अर्धा अधिक अध्याय यांत च खर्च झाला आहे. या अध्यायाचा प्रारंभ

चतुर्थमायुषो भागमुषित्वाऽद्यं गुरौ द्विजः ।
द्वितीयमायुषो भागं कृतदारो गृहे वसेत् ॥

म्हणजे आयुष्याचा पहिला चतुर्थ भाग होईपर्यंत गुरूचे संनिध वास्तव्य करून ब्राह्मणानें दार परिग्रह करावा इ. अशा प्रस्तावनेनें झाला आहे. असें असतांना

वैणवीं धारयेद्यष्टिं सोदकं च कमण्डलुम् ।
यज्ञोपवीतं वेदं च शुभे रौक्मे च कुण्डले ॥ ४ × ३६

ह्मणजे कळकाची काठी, उदकयुक्त कमंडलु, यज्ञोपवीत, दर्भमुष्टि आणि शुभ सुवर्ण कुंडलें ब्राह्मणानें धारण करावीं असें या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें श्रीसमर्थ होते असें श्री. दुर्गारामांचें मत आहे व याला प्रमाण ह्मणून " श्रीसमर्थांचे हातांतील वेणुयष्टि सज्जनगडावर अजून आहे. कुंडलें होतीं तीं त्यांच्या अनुष्ठानयात्रा इत्यादि कालांत हरवलीं असावीं. पुनः प्रतापगडावरील देवीनें आपल्या हारांतील मोतीं काढून स्वहस्तें चौकडा कुंडलें लेवविल्याचें प्रसिद्ध आहे इ. " चिकित्सक बुद्धीस न पटणाऱ्या गोष्टी दिल्या आहेत. गृहस्थप्रकरणातील हा श्लोक आहे. श्री. दुर्गारामांनीं दिला तो चिकटवून श्रीसमर्थांना! या छत्तीसाव्या श्लोकापुढील चाळीसाव्यांत

नोपगच्छेत् प्रमत्तोऽपि स्त्रियमार्तवदर्शने ।
समानशयने चैव न शयीत तया सह ॥ ४ × ४०

गृहस्थानें स्वस्त्रीसंबंधानें कसें वागावें याचें वर्णन आहे वर दिलेला याज्ञवल्क्य-स्मृतींतील श्लोक, त्यावरील विज्ञानेश्वराची टीका व तसेंच त्रुकाच वर दिलेला मनुस्मृतींतील श्लोक या सर्वांचा श्री दुर्गारामानीं शांतपणें विचार करावा व आपलें लिहिणें कितपत साधार आहे हें ठरवावें, अशी त्यास प्रार्थना आहे, म्हणजे ' विद्यास्नातक ' या शब्दाचा अर्थ आपण किती विलक्षण चुकीचा केला आहे, हें त्याच्या लक्षात येईल. मनु, याज्ञवल्क्य इ स्मृतींतील त्या त्या वचनाचा पूर्वापार संदर्भ सावधानतेनें न पाहिल्याकारणानें व पक्षाभिनिवेशाच्या भरात सत्यान्वेषणाकडे दुर्लक्ष झाल्यानें त्याच्या हातून हें असें झालें असावेसें वाटतें.

' वैणवीं धारयेद्यष्टिं ' इ. श्लोक ब्रह्मचर्याश्रमाचे वर्णनपर नसून तो गृहस्था-श्रम्याचे वर्णनपर आहे. यावद्दलचें आणखी एक नि संदिग्ध प्रमाण श्री. दुर्गारामास सादर करतों. श्री श्रेष्ठाच्या भक्तिरहस्याच्या ३९ व्या प्रकरणातील तें आहे. हें सबंध प्रकरण गृहस्थधर्मवर्णन करण्याकडे श्रेष्ठांनीं खर्च केलें आहे.

वेदाभ्यासपर्यंत गुरुगृहीं वसोन । सेवापूर्वक करून अध्ययन ।
मग गुरुआज्ञा घेऊन । दारागृहण करावें ॥ भ र ६९ × ११

असा या प्रकरणाचा प्रारभ आहे. या ओवीपुढील वर्णन वाचले असतां श्रेष्ठाच्या पूर्वसूरींच्या ग्रंथाध्ययनाचें आश्चर्य वाटतें व त्याच्या दांडग्या व्यासंगाची कांहींशी कल्पना येते. सर्व विद्यमान स्मृतींशीं त्याचा गाढ परिचय होता यावद्दल शंका उरत नाहीं. असें वाटतें कीं त्यांनीं स्मृति पुढें ठेऊन च हें वर्णन केलें आहे कीं काय ? पुढें दिलेल्या ओंव्या मनु व याज्ञवल्क्य या स्मृतींतील गृहस्थाश्रमपर वर्णनाच्या श्लोकांचें अक्षरश भाषांतर आहेत —

गृहस्थाश्रमावलंबनीं । यज्ञोपवीतें धरावीं दोनी ।
एक ब्रह्मसूत्र उत्तरी स्थानीं । दुसरें हें अगत्य ॥
सुवर्णकुंडलें धौतवस्त्रयुग । चंदनानुलेपन लिंगाग ।
श्मश्रुकर्म वैणदण्डधारण योग । जळपूर्ण कमंडलु ॥
भ र. ६९ × २७, २८

वर दिलेली दुसरी ओंवी व ' वैणवीं धारयेद्यष्टिं ' याची तुलना श्री. दुर्गारामानीं करावी व आपल्या मनाशींच काय तें ठरवावें पहिल्या ओंवींतील ' गृहस्थाश्रमा-वलंबनीं ' या शब्दप्रयोगाकडे त्यांनीं लक्ष द्यावें व शक्यतो हें सर्व प्रकरणच त्यांनीं

एकदां वाचावें, म्हणजे त्यास आपली चूक कळून येईल.

अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकमपि द्विजः ।

हें वाक्य प्रमाण मानण्यास श्री दुर्गाराम सिद्ध नाहात, हें वर आलें च आहे पण हें वाक्य जसेंच्या तसेंच पाळलें जावें याबद्दल 'धर्मसिंधु' काराचा केवढा कटाक्ष आहे हें त्याच्या 'समावर्तनकाल' या प्रकरणांत दिसून येतें. आमच्या कार्यापुरता त्यातील भाग आम्हीं पुढें देत आहोंत —

मार्गशीर्षे विवाहप्रसक्तौ दक्षिणायनेऽपि भवति ।
अन्यथा अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकमपि द्विज. ।

इति निषेधातिक्रमापत्ते म्हणजे मार्गशीर्ष मासांत एखाद्याचा विवाह करण्याचा प्रसंग आल्यास दक्षिणायनांत हि समावर्तन करावें. विवाह नसतां समावर्तन केल्यास 'द्विजानें एक दिवस हि आश्रमावांचून राहूं नये' असा जो निषेध सांगितला आहे, त्याचें उल्लंघन होईल श्री. दुर्गारामानीं याचा विचार करावा

"अनाश्रमी न तिष्ठेत" इ वाक्यासंबधीं 'धर्मसिंधु' काराचा जो अभिप्राय आहे, तसाच अभिप्राय बाळंभट्टी टीकेचा हि आहे समावर्तन झाल्या-घरोघर स्नातकानीं (विद्यास्नातक, व्रतस्नातक व विद्याव्रतस्नातक) लगेच विवाह केला पाहिजे असें या टीकाकाराचें मत आहे ही टीका विज्ञानेश्वरांच्या टीकेवरील उपटीका आहे. आचाराध्यायाच्या ५२ व्या श्लोकापूर्वी विज्ञानेश्वरांचें

स्नानानंतरं किं कुर्यात्

असें वाक्य आहे यावरील बाळंभट्टी टीका

त्रिविधेनापि तेन तऽतोविलंबितः विवाहः कार्यः ।
"अनाश्रमी न तिष्ठेत्तुदिनमेकमपि द्विजः" इति दक्षोक्ते

म्हणजे समावर्तन झाल्यावर काय करावें या प्रश्नाला टीकाकाराचें उत्तर असें कीं, या तीन हि स्नातकांनीं तावडतोब विवाह करावा, कारण दक्षस्मृतींत तसें सांगितलें म्हणून.

"श्रीसमर्थांचा आश्रम कोणता" व अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकमपि द्विज" या आमच्या दोन आक्षेपास श्री दुर्गारामानीं स्मृतिवचनानीं उत्तर देण्याचा जो प्रयत्न केला आहे तो कसा विफल झाला आहे, हें वर स्मृतिवचनांनींच सिद्ध केलें आहे. आतां त्यानीं जीं सूत्रकारांचीं वचनें दिलीं आहेत त्यांचा परामर्ष घेऊं या. त्यानीं आश्वलायन गृह्यसूत्रातील पुढील सूत्र

यत्रेनं पूजयिष्यन्तो भवन्ति तत्रैता रात्रिं वसेत् । ३×९×३

असें दिलें आहे व याचें तात्पर्य "अर्थात् एके ठिकाणी फार दिवस राहूं नये" म्हणून दिलें आहे. कोणी राहूं नये? याचें उत्तर त्यांनीं दिलें नाहीं. पण त्याच्या लिहिण्याचा संदर्भ ध्यानात घेतला असता त्याच्या 'विद्यास्नातकानें' हें विविक्षित आहे. 'विद्यास्नातक' याचा अर्थ स्मार्त वचनान्वयें आम्हीं वर दिला च आहे. वरील सूत्राचा अर्थ "जेथें याची पूजा करणारे असतील तेथें त्यानें त्या रात्रीं रहावें" असा आहे. या सूत्रावर 'गार्ग्यनारायणीय' वृत्ति अशी आहे --

यत्रात्मानं मधुपर्केण पूजयन्ति तत्रैतां रात्रिं वसेत् वसतिं कुर्यात् । कुतः एतत् । स्नातकायोपस्थितायेति वचनान्मधुपर्केण पूजनमीति लब्धम् ।

म्हणजे ज्या ठिकाणीं मधुपर्कविधीनें लोक आपली पूजा म्हणजे आदरसत्कार करतील त्या ठिकाणीं त्यानें त्या रात्रीं रहावें. असें करण्यास प्रमाण कोणतें? तर "स्नातकायोपस्थिताय" आ. गृ. सू. १ × २४ × २ हें सूत्र. आता या सूत्रावर 'गार्ग्यनारायणीय' वृत्तींत काय पाण्डित्य केलें आहे, तें आपण पाहूं या.

उपस्थिताय कृतसमावर्तनाय तस्मिन्नहनि गृहानभ्यागताय विवाहार्थिने च ।

असें या सूत्राचें स्पष्टीकरण केलेलें आहे व याचा अर्थ 'ज्याचें समावर्तन झालें आहे व जो विवाहेच्छु असा जो त्या रात्रीं आपल्या घरीं आलेला असतो त्याचा मधुपर्कानें सत्कार करावा असा 'मधुपर्कमाहरेत्' या त्याच्या आधींच्या सूत्रानें होतो. तेव्हां या सूत्रातील 'स्नातक' याचा अर्थ श्री. दुर्गारामास इष्ट असलेला 'विद्यास्नातक' नसून विवाहेच्छु असा आहे. तसेंच 'एता रात्रिं वसेत्' याचा अर्थ त्यांस अभिप्रेत असलेला "येके स्थळीं राहों नये" असा नसून 'त्या रात्रीं पुरतेंच तेथें रहावें' असा साधा आहे.

'स्नातक' शब्दाचा अर्थ आश्वलायनगृह्यसूत्रांतील

महद्वैभूतं स्नातको भवतीति विज्ञायते ॥ ३ × ९ × ८

या सूत्रावरील गार्ग्यनारायणीय टीकेंत त्या टीकाकारानीं मुद्दाम उध्दृत केलेल्या स्मार्तवचनांवरून ते कोणता समजतात हें स्पष्ट होत आहेः---

देवैश्चापि मनुष्यैश्च तिर्यग्योनिभिरेवच
गृहस्थः सेव्यते यस्मात्तस्माच्छ्रेष्ठो गृहाश्रमी

म्हणजे देव, मनुष्य व नीच योनींतील प्राण्याकडून ज्या अर्थी गृहस्थ सेविला जातो, त्या अर्थी गृहस्थाश्रमी हा श्रेष्ठ आहे. सूत्रातील 'स्नातक' म्हणजे

गृहस्थाश्रमी. श्री. दुर्गादासानीं " यन्नेनं पूजयिष्यन्तो " इ. दिलेलें सूत्र गृहस्थाश्रम्यासंबधाचें आहे, हें वरील विवेचनावरून स्पष्ट आहे.

आता त्यानीं दिलेल्या गौतम सूत्राकडे आपण वळूं या. तीं सूत्रें पुढें दिल्याप्रमाणें आहेत व तीं गौ. सू. प्रथम प्रश्न अ. ९ पैकीं ६८ ते ७४ आहेत तीं अशीं:—

सत्यधर्मा । आर्यवृत्त. । शिष्टाध्यापकः । शौच शिष्टः ।

श्रुतिनिरत स्यात् । नित्यमहिंस्रो मृदुर्दृढकारी दमदानशील. ।

एवमाचारो मातापितरौ पूर्वापराश्च संबंधान्दुरितेभ्यो

मोक्षयिष्यन् स्नातकः शश्वद्ब्रह्मलोकान्न च्यवते न च्यवते ।

या अध्यायांत स्नातकाचे धर्म सांगितले आहेत. तेव्हा ' स्नातक ' याचा अर्थ गौतमानीं व त्या सूत्रावरील टीकाकारानीं काय केला आहे तें पाहिलें म्हणजे हीं सूत्रें श्री. दुर्गारामानीं श्रीसमर्थांना बरोबर लागू होतात असें सांगताना ' वडाची साल पिंपळाला लावण्या ' चा कसा प्रयत्न केला आहे, तें पटकन ध्यानात येईल गौतमसूत्र, प्रथम प्रश्न अ. ८ मध्यें

स्नानं सहधर्मचारिणीसंयोग. ॥ १६

असें आहे. याच्या वरील हरदत्ताची टीका

स्नानं समावर्तनं सहधर्मचारिणीसंयोग. विवाह ।

अशी आहे व तिचा अर्थ समावर्तनानंतर विवाह करावा असा आहे. यावरून ' स्नान केलेला ' तो ' स्नातक ' याचा अर्थ काय होतो तें स्पष्ट आहे. नवव्या अध्यायात २६, २७ व २९, ३०, ३१ हीं सूत्रें पुढें दिल्याप्रमाणें आहेत —

न मिथुनी भूत्वा शौचं प्रति विलम्बेत ।

नच तस्मिन्शयने स्वाध्यायमधीयीत ।

नाकल्पा नारीमभिरमयेत ।

न रजस्वलाम् । न चैना श्लिष्येन्न कन्याम् ।

श्री. दुर्गारामांस आम्ही नम्रपणानें विचारतों कीं, हीं सूत्रें ते समजतात त्या ' विद्यास्नातक ' म्हणजे ब्रह्मचार्यासंबंधींचीं आहेत काय ?

भट्ट गोपीनाथ दीक्षित विरचित ' संस्काररत्नमालेंत ' समावर्तनाचें फल सांगतांना आम्ही वर दिलेलें ' महाभूत स्नातको भवतीति ' असें आश्वलायन सूत्र व त्यावर दिलेलें " दैवैश्चापि " स्मृतिवचन, स्नातकाचें महत्त्व सांगण्याकरिता देऊन, शिवाय श्रुति हि स्नातकाचें म्ह. गृहस्थाश्रमाचें महत्त्व काय समजते, हें दर्शविण्यासाठीं

य: स्नातकः स भवति महाभूतम् ।

असें वाक्य दिलें आहे. या श्रुतिवाक्यांतील 'स्नातक' शब्दाचा अर्थ काय आहे हें त्यांनीं च पुढें दिलेल्या स्मृतिवाक्यांवरून स्पष्ट आहे:—

स्नातकस्यैव माहात्म्यं महाभूतमयं यतः ।
यथामातरमाश्रित्य सर्वे जीवन्ति जन्तवः ।
तथा गृहस्थमाश्रित्य सर्वे जीवन्ति भिक्षुकाः ॥

आतां शास्त्रकारांनीं कांहीं स्थलीं गृहस्थाचे धर्म व स्नातकाचे धर्म म्हणून निरनिराळीं प्रकरणें दिलीं आहेत. यावरून कदाचित् शंका येण्याचा संभव आहे कीं, गृहस्थ व स्नातक निरनिराळे म्हणून. पण तसें नसून स्नातक हा इतर गृहस्थांसारखाच गृहस्थ पण आदर्शभूत गृहस्थ. ती एक पदवी आहे.

आपल्या विधानाच्या पुष्ट्यर्थ – विद्याध्ययन करून ब्रह्मचर्यव्रतानें राहणारा तो विद्यास्नातक – म्हणून श्री. दुर्गारामांनीं आश्वलायन स्मृतींतील जे श्लोक दिलेले आहेत, त्यांत त्यांनीं केलेली शब्दांची ओढाताण फारच मौजेची आहे. आमच्या जवळ ही स्मृति नसल्यानें आम्हांस या श्लोकांबद्दल विशेष लिहितां येत नाहीं. तरी पण त्यांनीं दिलेल्या श्लोकांवरून पहातां ते श्लोक गृहस्थाश्रम्यासंबंधींचे च आहेत असें वाटतें व त्यांनीं हि तें मान्य केलें आहे. पण त्यांस हे श्लोक आपल्याला अनुकूल करून घ्यावेसें वाटल्यानें त्यांनीं आपण दिलेल्या पहिल्या श्लोकांतील 'सुस्वस्थः' व 'सुसमाहितः' या पदांच्या अर्थांची चांगलीच ओढाताण केली आहे. 'सुस्वस्थः' चा अर्थ श्रीसमर्थांसंबंधीं करतांना "श्रीसमर्थांचें मन जगाच्या चिंतेनें अस्वस्थ होतें," असा केला तर 'सुसमाहितः' चा अर्थ "श्रीसमर्थांचें मन भवाच्या भयें भ्यालें होतें" इ. केला आहे. पण त्यांचा हा प्रयत्न कितपत साधला आहे, हें वाचकांनींच ठरवावें.

"समावर्तन म्हणजे विद्या पूर्ण करून गुरुकुलांतून परत येणें; तेवढ्यावरून त्यानें ब्रह्मचर्य सोडलें असा अर्थ होत नाहीं; म्हणून तो अनाश्रमी ठरत नाहीं" इ. जें श्री. दुर्गाराम प्रतिपादितात, तें कितीसें शास्त्रोक्त आहे, हें वरील विस्तृत विवेचनावरून वाचकांस चांगलें कळून आलें असेल, अशी आमची खात्री आहे.

( ३ ) श्रीसमर्थांनीं चालू केलेली धोराख भिक्षा ब्रह्मचाऱ्यांस निषिद्ध आहे, असें आम्ही

यतिश्च ब्रह्मचारी च पक्वान्नस्वामिनावुभौ ।

या वचनाधारें लिहिलें आहे. हें वचन चूक आहे, असें श्री. दुर्गारामांनीं सिद्ध केलेलें नाहीं. 'शास्त्रांत भिक्षेचा उहापोह पुष्कळ केलेला आहे' असें मोघम म्हणून त्यांनीं आपल्या भिक्षेच्या पुष्टिकरणार्थ

आममेवाऽऽददीतास्मादवृत्तावेकरात्रकम् ।

.... .... .... .... ....

तस्मादामं गृहीतव्यं शूद्रादप्यंगिरोऽब्रवीत् ॥

ही वचनें दिलीं आहेत. यांतील ' अवृत्तौ ' व ' एकरात्रकम् ' या पदांकडे त्यांनीं यावें तसें लक्ष दिलें नाहीं असें वचनानें म्हणावें लागतें. जेथें मधुकरी मिळणें शक्य नाहीं, तेथें च कोरान्न भिक्षा मागावी, अशा आपत्तींत ती शूद्राकडून सुद्धा घ्यावी, पण ती एकरात्रकम् म्हणजे एक दिवसापुरतीच, कायमची नव्हे, असें या श्लोकार्थें तात्पर्य आहे. बालंभट्टानीं या प्रश्नाचा जो उहापोह केला आहे, तो श्री. दुर्गारामानीं पहावा. पाहिल्यास त्यास आढळून येईल कीं, कोरान्नभिक्षा ही केवळ आपत्काला-करिताच आहे, असा त्याचा निर्णय आहे. तेव्हां त्यास असें विचारावेंसें वाटतें कीं, रामदासी ब्रह्मचाऱ्याचा हा आपत्काल ( कोरान्न भिक्षा मागण्याचा ) गेलीं तीनशें वर्षे चालूच आहे काय ?

श्रेष्ठाचें भिक्षेसंबंधीं मत देऊन हें भिक्षा प्रकरण संपवितों. ब्रह्मचाऱ्यानें

जनीं भिक्षान्न भोजन । भक्ति. र. ६८ × ३९

भिक्षान्न श्रोत्रियागारीचें । भ. र. ४०

नित्य भिक्षान्न भक्षावें । कदा एकान्न न सेवावें ।
अनिंद्य विप्रगृहीं मागावें । त्यागावें निंद्य जनासी ॥

भ. र. ६८ × ४३

या वर दिलेल्या वचनाप्रमाणें भिक्षा मागावी, श्रेष्ठांनीं सांगितलेली ही भिक्षा ओली आहे, कोरडी नव्हे श्रेष्ठ व समर्थ हे दोघे बंधु खरे. पण त्यांच्यात कसें मतवैचित्र्य आहे तें पाहून असें कां व्हावें, असा प्रश्न उपस्थित होतो. श्रीसमर्थसांप्रदायी गृहस्थाश्रमी भिक्षा मागतात. पण श्रेष्ठांनीं, गृहस्थाश्रम्यानें भिक्षा मागावी, असें कोठें हि म्हटलेलें आढळत नाहीं. शास्त्रानीं गृहस्थास भिक्षा मागण्यास प्रत्यवाय नाहीं, असें सांगितलें असताना सुद्धा ' श्रेष्ठ ' त्या बाबतींत कांहीं च बोलत नाहींत याचें आश्चर्य वाटतें. विद्वानानीं या गोष्टीचा अवश्य विचार करावा असें आह्मास वाटतें. उभयता बधूंतील हें मतवैचित्र्य ही एक विचारणीय गोष्ट आहे.

" दासबोधात भिक्षेच्या समासात दत्त, गोरक्ष वगैरे भिक्षेची परंपरा सांगितली आहे. पण हे सारे सिद्धाच मागणारे होते " असें आमचें वाक्य म्हणून श्री. दुर्गाराम देतात. यास आह्मी येवढेंच उत्तर देतों कीं, आह्मीं तसें विधान केलेलें नाहीं. आह्मी हे संत नेमकी कोणती भिक्षा मागत असत याबद्दल संशय प्रगट केला आहे. निश्चित विधान त्याबाबत केलेलें नाहीं.

( ४ ) ' श्रीसमर्थसंप्रदायांत संन्यासाश्रमाचा निषेध आहे ' या आमच्या विधानास " हा आक्षेप निराधार आहे, श्रीसांप्रदायांत शास्त्रविहित कोणत्या हि वर्णाचा किंवा आश्रमाचा निषेध नाहीं " असें हे रामदासी लिहितात. यावर आमचें काय म्हणणें आहे, तें आम्हीं आमच्या त्या लेखांत दिलें च आहे. येथें पुनः त्यांस विचारावेंसें वाटतें कीं, मग हीं शास्त्राधार नसलेलीं हुमुंजी वस्त्रें, कुबडी, मेखळा इ. आलीं कोठून ? श्री. दुर्गारामांनीं याचें उत्तर देण्याचें आपल्या लेखांत टाळलें आहे. तें त्यांनीं द्यावें.

( ५ ) शास्त्रकार स्त्रियांस पापयोनि समजतात या आमच्या विधानास श्री. दुर्गारामाचें उत्तर असें कीं, " शास्त्रानें स्त्रियांस पापयोनि म्हटलेलें नाहीं. " आपल्या या विधानाच्या सिध्यर्थ त्यांनीं जगदुत्पत्ति प्रकरणात आलेलें मनुस्मृतींतील १ × ३२ वचन दिलें आहे. तें अगदींच अप्रस्तुत आहे. श्री. दुर्गाराम याच्या नित्यपाठांत गीता असेलसें वाटतें. त्यांतील

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपिस्युः पापयोनयः ।

स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥ ९ × ३२

या श्लोकाकडे त्याचें दुर्लक्ष झालेलें दिसतें. नाहीं तर ते तसें म्हणतेना ? श्लोकांत ' पापयोनि ' शब्द स्पष्ट आहे. येवढ्यानें त्यांचें समाधान होत नसल्यास व आपलें विधान चुकीचें आहे, असें त्यांस मान्य करवत नसल्यास या श्लोकावरील शांकरभाष्य त्यांनीं पहावें व आपल्या मनाशींच काय तें ठरवावें. श्रीमदाचार्यांचें भाष्य पुढील-प्रमाणें आहेः—

पापयोनयः पापा योनिर्येषां ते पापयोनयः ।

के त इत्याह स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः .... .... ।

याचा अर्थः—" पापयोनीमध्यें जन्मास येऊन उत्कृष्ट गतीला जाणारे कोण ही शंका येऊं नये म्हणून ' स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः ' असें म्हटलें आहे. " यानें तरी श्री. दुर्गारामाचें समाधान होईल काय ?

श्री. दुर्गाराम यानीं ज्या ब्रह्मवादिनींचीं नावें आपल्या बाजूचीं म्हणून दिलीं आहेत, तीं सर्व त्या कालांतील आहेत कीं, ज्या कालीं स्त्रियांस ब्रह्मज्ञानप्राप्त्यर्थ शास्त्राचा प्रतिबंध नव्हता. या आमच्या विधानासाठीं त्यांनीं शांतिपर्वांतर्गत सुलभा–जनक संवाद प्रकरणीं नीलकंठी टीका पहावी. आमच्यातील स्त्रिया मुद्दां केवढ्या योग्यतेच्या होत्या या मिथ्या अभिमानाच्या समर्थनार्थ हीं ठराविक व अपवादात्मक उदाहरणें सनातनी म्हणविणारे पुढें आणीत असतात. हीं उदाहरणें बाजूला सारल्यास एतत्सदृश दुसरीं कितीशीं उदाहरणें श्री. दुर्गाराम यांस दाखवितां येतील असा आमचा त्यांस प्रश्न आहे. स्त्रिया शूद्रसमान आहेत याबद्दल आमची

शास्त्रें अट्टाहास करीत आहेत. शूद्रांइतकें त्यांस शास्त्रकारांनीं दूर लोटलें नाहीं याचें कारण त्यांचा स्वार्थीपणा इतकें च.

श्रेष्ठ हि स्त्रियांस 'पापयोनि' समजत याबद्दल त्यांचे दोन चार उद्गार पुढें देतों:—

स्त्रियां शूद्रांस आचार । पुराणोक्त हा निर्धार । भ. र. ६८ × २१

स्त्रियांसि अमन्त्रता काळविधि प्रकार । भ र. ६८ × २२

स्त्रिया शूद्र अनुपनीत विधि । ७० × ५४

स्त्रीशूद्रासमीप वेद पढे । तो अनुक्रमें नरकीं चढे । भ. र. ७५×९५

श्री. दुर्गारामांस स्त्रियांच्या पापयोनित्वाबद्दल आणखी प्रमाणें पाहिजे असल्यास त्यांनीं भक्तिरहस्य चाळावें.

वदन्ति केचिद्विद्वांसः स्त्रीणां शूद्रसमानताम्

या वचनाकडेहि त्यांनीं लक्ष द्यावें.

तुष्यतु दुर्जन न्यायानें श्री. दुर्गाराम यांचें ह्मणणें मान्य करुन सुद्धां त्यांस आह्मी विचारतों कीं 'पतिरेव गुरुस्त्रीणां' या वचनाविरुद्ध त्यांनीं केलेलें समर्थन जातें, याची वाट ते कशी लावतात ?

श्री. दुर्गारामांनीं आमच्या लेखावर जे आक्षेप काढले होते, त्यांचें परीक्षण आह्मी वरील लेखांत केलें आहे. त्यावरुन श्रीसमर्थांना त्यांनीं आपल्या मताप्रमाणें सनातनी ठरविण्याचा जो प्रयत्न केला, तो कितीसा फलद्रूप झाला आहे हें चिकित्सक वाचकांचे निदर्शनास येईल. श्री. दुर्गाराम व इतर विद्वान यांस आमची नम्र प्रार्थना आहे कीं, त्यांनीं आमच्या मूळच्या लेखांतील या व इतर राहिलेल्या मुद्यांचा विचार करुन त्यांस यथाकाल उत्तर द्यावें, तसेंच प्रस्तुत लेखाचाहि परामर्श घ्यावा.

श्री. दुर्गारामांनीं आपल्या लेखांत आह्मांस 'सुधारक' ह्मटलें आहे; तें कोणत्या अर्थानें म्हटलें आहे, हें त्यांचें त्यांस च माहीत. तो लेख लिहिण्याचा आमचा उद्देश एक च; व तो ह्मणजे श्रीसमर्थांच्या प्रत्येक लहान मोठ्या कृतीची व विचारांची योग्य चिकित्सा व्हावी. कारण श्रीसमर्थांच्या प्रत्येक विचारामागें व कृतीमागें कांहीं तरी विशिष्ट हेतु होता, अशी त्यांच्या वाङ्मयावरुन प्रस्तुत लेखकाची भावना झालेली आहे. तेव्हां त्याची चर्चा या चिकित्सेच्या युगांत झाल्यास श्रीसमर्थांचें वाङ्मय नव्या रुपांत, अधिक उज्वलतेनें, भविष्यत्कालीं व सध्यां सुद्धां, जनतेस मार्गदर्शक होईल असा दृढ भरंवसा आहे.

अगा ये प्रचीतीचे लोक हो । प्रचित नस्तां अवघा शोक हो ।
रघुनाथकृपेनें राहो । प्रत्यय निश्चयाचा ॥ १० × १० × ६८



( १६ )

॥ श्रीरामसमर्थ ॥

# श्रीसमर्थ व सनातनधर्म

## या पहिल्या सुमनहारांतील लेखाचा

### श्री. गणेश गोविंद ऊर्फ काका कारखानीस बी. ए.

## यांनीं घेतलेल्या परामर्शाचा विचार *

( लेखक — रा. दुर्गाराम बाल हरिदास रामदासी, मंगळूर )

श्रीसमर्थचरित्रेषु व्यंग्याम्याकल्य गर्जताम् ।
कार्येषु द्विजकाकानामेतद्धि शमनं परम् ॥

### सुरवातीचे दोन शब्द

सहा वर्षांपूर्वीची गोष्ट. त्या वेळीं प्रसिद्ध होत असलेल्या नवशक्ति नामक दैनिकांत "श्रीसमर्थांचें आचारस्वातंत्र्य, व विचारस्वातंत्र्य" अशा गोंडस मथळ्याखालीं, एक लांबलचक लेख प्रसिद्ध झाला होता; तो अंक माझ्या एका मित्राकडून मला वाचावयास मिळाला; तो वाचून पाहतां, सुरवातीस श्रीसमर्थांच्या अवताराची थोरवी गाऊन, नंतर श्रींच्या वर्तनावर गोड शब्दांत शिंतोडे उडविलेले पाहून मला अत्यंत खेद झाला.

तदनंतरचे त्या दैनिकाचे बरेचसे अंक आणवून पाहिले. परंतु, त्यांत त्या वरील लेखास कोणीहि उत्तर दिलेलें आढळलें नाहीं.

इतक्यांत सत्कार्योत्तेजक सभेकडून धुळें येथें झालेल्या श्रीसमर्थव.देवता-मंदिराच्या उद्घाटनसमारंभसमयीं वाचण्याकरिता, एखादा निबंध मी लिहावा, असें श्रीसमर्थभक्त श्री. शंकर श्रीकृष्ण ऊर्फ नानासाहेब देव यांचें कृपापत्र मला मिळालें. त्यांत त्यांनीं सुचविलेल्या मथळ्यांपैकीं "श्रीसमर्थ व सनातन धर्म" हा

---

* टीप—पृष्ठांक ९० वरील टीप पहावी.

मथळा मला आवडला आणि वर निर्दिष्ट लेखांतील श्रीसमर्थचरित्रावरील शंकारूपी *शिंतोड्यांचें* संमार्जन करावेंसें वाटलें. परंतु, मी नवशक्तीचा ग्राहक नसल्यामुळें मूळ लेखाचा अंक मजकडे नव्हता. ग्राहक मित्राकडे हुडकला असतां तो दुकानदाराकडे साखरपुडा बांधण्यास गेल्याचें समजलें. त्यामुळें माझ्या आठवणीवरच *विसंबून, निबंध लिहिणें भाग पडलें. त्या निबंधांत मूळ लेखांतील कांहीं विधानांचीं* उत्तरें देण्याचें राहिलें. निरुपाय !

मूळ लेखकांनीं आपल्या लेखांत अपेक्षिल्याप्रमाणें मी उत्तरादाखल *लिहिलेल्या लेखास आक्षेप ठरवून, ( माझें त्यांच्या आक्षेपांस उत्तर होतें )* त्या लेखाचा परामर्श केलेला हस्तलिखित लेख,-आणि मूळ नवशक्तींत प्रसिद्ध झालेला लेख, असे दोनही लेख रा. काका कारखानीस यांनीं आज्ञा दिल्याप्रमाणें श्रीयुत देवांच्या दयेनें मजकडे आले आहेत.

मी निबंध लिहिल्यास आज सहा वर्षे लोटलीं. आणि तो लेख " श्रीसमर्थ-वाग्देवतेच्या चरणीं अर्पिलेला पहिला सुमनहार " नांवाच्या पुस्तकांत प्रसिद्ध होऊन ५ वर्षे झालीं. सुमनहारांत प्रसिद्ध झालेल्या प्रत्येक लेखाविषयीं, केसरीच्या तत्कालीन अंकांतील " परिचय-परामर्श " मथळ्याखालीं विचार प्रसिद्ध झाला असून देखील श्रीसमर्थवाङ्मयाचा बारकाईनें आणि पसून विचार करणाऱ्या रा. काकाना पहिला सुमनहार पांच वर्षेपर्यंत वाचावयास मिळूं नये, ही आश्चर्याची गोष्ट होय ! त्यांत हि माझा लेख समोर असून देखील त्यांतील वाक्यांचा विपर्यास करणे ही याहून आश्चर्याची गोष्ट आहे.

## श्रीसमर्थांचा आश्रम कोणता ?

रा. काका श्रीसमर्थांच्या आश्रमाविषयक माझ्या विचारांतील, " विद्यास्नातक ब्रह्मचारी " या शब्दप्रयोगावर च वरचेवर अकांडतांडव करीत आहेत. वास्तविक ब्रह्मचारी हा शब्द काकांनीं च आपल्या मूळ लेखांत श्रीसमर्थांना लावलेला आहे. *त्या शब्दास, विद्यास्नातक शब्द मीं जोडला आहे. ब्रह्मचारी हा शब्द रा. काकांना* नको असल्यास त्याचा त्यांना मी परत द्यावयास तयार आहे. इतकें च नव्हे, तर, कोणत्याहि शब्दच्छलांत मी विनाकारण पडावयास तयार नाहीं. कोणाला उमेद असेल तर, चारचौघां शास्त्रज्ञांसमोर शब्दपांडित्य लढविणें झाल्यास त्यासंबंधीं अवश्य त्यावेळीं विचार करण्यास प्रत्यवाय नाहीं. असो.

फक्त या ठिकाणीं जी श्रीसमर्थांची स्थिति, ह्मणजे समावर्तनानंतर विवाह न करतां आजन्म त्या स्थितींत राहणें ती स्थिति शास्त्राला सोडून नाहीं, एवढें च मला सांगावयाचें होतें. आणि तें मीं माझ्या सुमनहारांतील लेखांत शास्त्रशुद्ध रीतीनें मांडलें आहे. त्याचें खंडन रा. काकांनीं यत्किंचित् हि केलेलें नाहीं. कांहीं वाक्याचा विपर्यास केला आहे, तर कांहीं ठिकाणीं टीकाकारांचें पुजगावणें

दाखविलें आहे. ज्या ठिकाणीं कांहीं च करतां आलें नाहीं, त्या ठिकाणीं तो ग्रंथ मजजवळ नाहीं, परंतु त्या वाक्यांचा अर्थ माझ्या मताप्रमाणें च असूं शकेल, वगैरे विधानें केलीं आहेत.

यावरून च निश्चित होतें कीं, रा. काकांना समर्पक खंडन करतां आलें नाहीं आणि तें करतां हि पण येणें शक्य नाहीं. असो.

आतां काकांनीं जो, श्रीसमर्थांचे जे वडील बंधु स्वामी रामदास ( श्रेष्ठ ) त्यांना आपल्या मताकडे ओढण्याचा, त्यांचा ग्रंथाधार दाखवून, प्रयत्न केला आहे, त्याविषयीं मला जास्त लिहावयाचें नाहीं. कारण, श्रीसमर्थांवर जो विवाह-प्रसंग लादला गेला, त्याला श्रेष्ठांचे च प्रयत्न जास्त कारणीभूत झाले, हें जगद्विख्यात आहे. श्रेष्ठ हे आदर्श गृहस्थाश्रमी होते, आणि त्यांच्या वाङ्मयांतून आपल्या आश्रमधर्माचें उत्तम प्रतिपादन केलेलें आहे. म्हणून कांहीं श्रीसमर्थांनीं श्रेष्ठांच्याच मताप्रमाणें वागलें पाहिजे, असा कांहीं त्याचा अर्थ होत नाहीं.

रा. काकांनीं मी दिलेल्या आश्वलायन गृह्यसूत्रांतील सूत्रांच्या गार्ग्य-नारायणीयवृत्तीच्या आधारें, " स्नातक " म्हणजे गृहस्थ असें प्रतिपादन करण्याचा बालिश प्रयत्न केला आहे.

रा. काका म्हणतात, स्नातक म्हणजे विवाहार्थी ( विवाह करून घेऊं इच्छिणारा ) आणि स्नातक म्हणजे गृहस्थ ( विवाह करून घेतला ) हे दोघे एक आहेत. तेव्हां याचा समन्वय किती हि अकाडतांडव केलें असतां कसा होईल, हें वाचकांनीं ठरवावें.

रा. काकांनीं मीं दिलेल्या गौतमधर्म सूत्राधारांचा परामर्श घेतांना, कांहीं पूर्व प्रकरणांतील सूत्रें देऊन, स्नातक म्हणजे गृहस्थ म्हणून प्रतिपादण्याचा प्रयत्न केला आहे आणि सांगितलें आहे काय, तर, " स्नानम्, सहधर्मचारिणीसंयोगः " त्याच्या वरील हरदत्तांची टीका " स्नानं, समावर्तनं, सहधर्मचारिणीसंयोगः, विवाहः " अशी आहे.

माझ्या लेखांत समावर्तिताला स्नातक नव्हे, असें मी कोठें म्हटलें आहे ? तसेंच, विवाहिताला गृहस्थ नव्हे, असें तरी कोठें प्रतिपादन केलें आहे ? आमचे श्रीसमर्थ मात्र विवाहित नाहींत, एवढें मला सांगावयाचें आहे.

आणि जोंपर्यंत रा. काकांना श्रीसमर्थ हे विवाहित आहेत, असें सिद्ध करितां आलें नाहीं, तोंपर्यंत स्नातक म्हणजे गृहस्थ असें सिद्ध करण्याकरितां वडाची साल काढून पिंपळास नव्हे, तर कुव्यास लावली असता देखील सिद्ध होणार नाहीं.

---

( १ ) आश्वलायन स्मृतिरत्न वे. के. वेंकटेशभट्ट, सरदार कांतराजे अरसि नवरदेवस्थान हळे अग्रहार, मैसूर, या पत्यावर मिळेल.

मला शब्दांची काथ्याकूट करण्याची इच्छा नव्हती, परंतु रा. काकांच्या प्रतिपादनांतील एक दोन शब्दांचे मासले दाखविल्याशिवाय राहवलें नाहीं.

रा. काकांनीं गौतमधर्मसूत्रांतील, मी आधारास घेतलेल्या नवमाध्यायांतील, कांहीं स्त्रीसंभोगविषयक सूत्रें देऊन, तीं मला पाहावयास सांगितलें आहे.

मी काकांना असें नम्रतेनें सांगतों कीं, मीं तीं सूत्रें नव्हेत, तर सबंध गौतमधर्मसूत्रांचें अध्ययन केलें आहे. इतकें च नव्हे, तर माझ्याकडून कित्येकांस अध्यापन देखील घडलें आहे, निरनिराळ्या टीकादि वाचल्या आहेत, " पूर्णग्रंथ पाहिल्याविण । उगा च ठेवी जो दूषण । " अशी स्थिति माझी नाहीं.

रा. काकांनीं जर उक्त नवमाध्यायाच्या पहिल्या सूत्रावरील, मस्करीय भाष्य वाचलें असतें, तर श्रीसमर्थांविरुद्ध लिहावयास त्यांनीं हातांत लेखणी च धरली नसती.

रा. काकांना अत्याग्रहानें मी सांगतों कीं, सदर अध्यायावरील मस्करीय भाष्य *आणि हरदत्तांची टीका, या दोन तरी आमूलाग्र वाचाव्या, मधलीं मधलीं सूत्रें* देऊन वाचकांची दिशाभूल करण्यांत अर्थ नाहीं.

" स्नातकः " या द्वितीय सूत्रावरील आपण आधारास घेतलेली हरदत्तांची टीका वाचली असतां, स्नातक व गृहस्थ अशा उभयतांस हि सांगितलेलीं तीं मतें असल्यामुळें, आपण *दिलेलीं सूत्रें तीं गृहस्थाकरितां आहेत*, असें आपल्याला आढळेल.

आणि पहिलें व दुसरें या उभय सूत्रांवरील मस्करीय भाष्य वाचलें असतां श्रीसमर्थांच्या आश्रमविषयक मुख्य शंकेचें साहजिक निरसन होईल.

भाष्यकर्त्या मस्करींनीं सर्व तऱ्हेचे वाद उपस्थित करून अखेरीस, समावर्तनानंतर अविवाहित स्थितींत ( स्नातक ) आजन्म राहतां येतें असें ठरवून,

इमानि वक्ष्यमाणानि व्रतानि अनुकर्षेत्, यावज्जीवं, कुर्यात्

असें सांगितलें असून, अंतिमसूत्राचा ( जें मीं पूर्व लेखांत उद्धृत केलें आहे ) संबंध दाखविला आहे.

आपण दिलेल्या आधारांतील स्मृतिकारांनीं स्नातकास गृहस्थ कां म्हटलें, त्याचा उलगडा " अकृत विवाहेऽपि गृहस्थ शब्दः प्रयुक्तः " वगैरे मस्करीच्या प्रतिपादनावरून समाधान होईल.

" *अनाश्रमी न तिष्ठेत्* " हा श्लोक समावर्तित अविवाहिताकरितां नसून ज्याची बायको मेली आहे, अशा विधुराकरितां आहे. हें " अनाश्रमी न तिष्ठेत्तुदिनमेकमपिद्विजः, इति दक्षवचनस्य विधुरविषयत्वं द्रष्टव्यम् " या वाक्यावरून दिसेल.

याशिवाय बोधायन गृह्य आणि धर्मसूत्रांत दिलेले स्नातकधर्म वाचले असतां, आपला जर उद्देश " शंका व कल्पना तज्ज्ञ वाचकांसमोर मांडून त्या निरसन करून घ्याव्यात, एवढा च " असेल, तर समाधान होईल.

" अथ स्नातकस्य " बोधायन धर्मसूत्र अ. ३ सू. १, टीका, प्राक् पाणिग्रहणात् इतिशेषः " पासून " एतेन विधिना प्रजापतेः परमेष्ठिनः परमर्षयः परमां काष्ठां गच्छंति " अ. ३ सू. १३

अर्थः— नंतर, स्नातकाचे ह्मणजे पाणिग्रहणाच्या पूर्वी आचरण करण्याचे धर्म यापुढे सांगितले जातात, असें आरंभ करून १३ व्या अध्यायाच्या अखेरच्या सूत्रांत याप्रमाणें आचरण करणारा स्नातक प्रजापतेः ह्मणजे अखिल प्रजापति असा जो परमेष्ठी त्याच्याकडे जातात, असा आहे.

या दुसऱ्या ह्मणजे भिक्षेच्या शंकेनें तर, काकांनीं रामदासीयांवर भीक नको ह्मणण्याचा प्रसंग आणला आहे. या दिव्यांतून रामदासीय कितपत टिकतात तें पाहूं.

या ठिकाणीं देखील रा. काकांनीं मी पूर्व लेखांत दिलेल्या प्रमाणाचें खंडन करतां येत नसल्यामुळें, बाळंभट्टी ऊहापोहाकडे बोट दाखवून, रागाच्या भरांत " त्यांस असें विचारावेंसें वाटतें कीं, रामदासी ब्रह्मचाऱ्यांचा हा आपत्काल गेलीं तिनशें वर्षें चालूच आहे काय ? " अशी थट्टा केली आहे.

श्रीसमर्थकालीन आपत्काल कशा तऱ्हेचा होता, हें आपणास पाहावयाचें असल्यास, दासबोध दशक १४ समास ७, आणि दशक १५ समास २ वाचला असतां, समाधान मिळेल. आणि तीनशें वर्षांची परंपरा कशा तऱ्हेची आहे हें, रा. काकांस ज्या संस्थेच्या कार्य दर्दीत्वांत गौरव वाटतो, तिकडे पाहिलें असतां, समाधान होईल.

वाचकांस माझी विनंति कीं, मी पहिल्या सुमनहारांत ३३५ पानावर केलेला भिक्षेचा खुलासा, मोघम आहे कीं काय ? पाहावें.

मी ज्या समर्थांना स्नातक म्हटलें आहे, त्या अविवाहित समर्थांनीं कोराच भिक्षाच मागावी, असें, " तस्यवृत्तिः, ( बो. धर्मसूत्र अ. २ सू. ८ ) टीका–तस्य स्नातकस्य, " प्राक्पाणि ग्रहणात् " इत्युक्तस्य, " वृत्तिः " यात्रा = जीवनोपायः वक्ष्यते, असें सांगून ९ व्या सूत्रांत " ब्राह्मण राजन्य वैश्य रथकारेभ्यामं लिप्सेत " टीका – आमग्रहणात् पक्वप्रतिषेधः बोधायन धर्मसूत्रांत सांगितलें आहे. त्यावरून श्रीसमर्थांनीं केलेला कोराच भिक्षेचा संप्रदाय योग्य आहे.

गृहस्थानें भिक्षा मागण्यास हरकत नाहीं हें माझ्या पूर्व लेखांतील प्रतिपादन रा. काकांस मान्य झाल्यामुळें, पुनः लिहिणें जरूर नाहीं.

रा. काकांनीं ह्मटलें आहे कीं, " श्रीसमर्थांच्या संप्रदायांत चतुर्थाश्रमास मुळींच अवकाश नाहीं.

परामर्शाच्या चवथ्या मथळ्यांत रा. काका-ह्मणतात कीं, संन्यासाश्रमाविषयींचें " आमचें ह्मणणें काय आहे तें आह्मी त्या लेखांत दिलेंच आहे. " परंतु त्यांच्या मूळ लेखांत " श्रीसमर्थसंप्रदायांत चतुर्थाश्रमास मुळींच अवकाश नाहीं," " संन्यास निषेध " या दोन वाक्यांपलीकडे कांहींच नाहीं. याचें समाधान मीं पहिल्या सुमनहारांत लिहिल्याप्रमाणें " हें प्रतिपादन निराधार आहे " एवढे च पुरें आहे.

राहिला प्रश्न काय तो, हुर्मुजीवस्त्रें, कुबडी, व मेखळेचा.

श्रीसमर्थ संप्रदायाच्या लक्षणांपैकीं मुख्य लक्षणें, त्याग व निस्पृहता हीं आहेत. त्यांना राजकारण साधावयाचें होतें, हें " दुसरें तें राजकारण " या समर्थवाक्येंकरून च सर्वांस ठाऊक आहे. त्यागाचा मुख्य निदर्शक रंग गैरीक, ह्मणजे गेरूनामक मातीनें रंगविलेला, ज्या रंगाचीं वस्त्रें संन्यासी वापरतात. ज्याला व्यवहारांत काषायवस्त्र ह्मणतात. तीं शास्त्रानें नग्नत्वदर्शक मानल्यानें संन्यासीतर आश्रमीयांना वर्ज्य आहेत. आणि, श्रीसमर्थसंप्रदायांत सर्व आश्रमीयांना स्थान आहे. तेव्हां सर्वहि आश्रमीयांना वापरतां यावा, त्यागाचा निदर्शकहि तो असावा, राजकारणहि त्यांत साधावें, ( या विषयीं उहापोह जास्त करण्याचें हें स्थल नसल्यामुळें राजकारण श्रीसमर्थसंप्रदायांत होतें हें दर्शविण्यास हा शब्द घातला आहे ) याकरितां गैरिकाजवळचा जो हुर्मुजी रंग, शास्त्रानें मात्र ज्याचा निषेध केला नाहीं, अशा तऱ्हेचा रंग पंथदर्शक पोषाखांत दाखविला आहे.

या माझ्या विधानाचा निर्वाह चाफळ दप्तरांतील खालील श्लोकार्धानें होतो.

काषायांबर नग्न शास्त्रवचनें जाणोनियां वर्मुजी ॥
रामाज्ञेस्तव दास तो बहुगुणी वस्त्रें धरी हुर्मुजी ॥

कुबडीस योगदंड ह्मणतात. बहुतेक योगी तो दंड वापरतात. नाथसंप्रदायांत त्याला प्रामुख्य आहे. श्रीसमर्थांचे योगमार्गाचे गुरु श्रीदत्त यांनीं झोळीबरोबर कुबडी दिल्याचें श्रीसमर्थचरित्रांत रा. काकांनीं वाचलें असेलच. ती कुबडी श्रीसमर्थसंप्रदायांत प्रचारास आली.

श्रीसमर्थसांप्रदायिक मेखळा ( उपनीत ब्रह्मचाऱ्यानें धारण करण्याची मुंज ) धारण करीत नसतात. तर मेखळा, ( ज्यांत शिंप्याचें काम जास्त नसतें, असें डोकीवरून खालीं उतरण्याकरितां मधोमध फाटलेलें वस्त्र ) धारण करितात. हा साधा पोषाक आहे.

स्त्रिया पापयोनि नव्हेत, याविषयीं मीं दिलेल्या मनूच्या आधारास रा. काकांनीं अप्रस्तुत म्हटल्यानें त्याचें खंडन होत नाहीं. रा. काकांचा भर काय तो श्रीभगवद्गीतेच्या

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ॥
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परांगतिम् ॥

या श्लोकावरील श्रीमत्शंकराचार्यांच्या टीकेवर आहे. त्या श्लोकाचा अर्थ ( श्रीमध्व-रामानुजादि आचार्यांनीं तसा केला नाहीं. ) तसा केला असतां श्रुतीस विरोध येतो.

तद्य इह रमणीयचरणा अभ्याशोह यत्ते रमणीयां योनिमापद्येरन्, ब्राह्मणयोनिं वा, क्षत्रिययोनिं वा, वैश्ययोनिं वा, अथ य इह कपूयचरणाः अभ्याशोह यत्ते कपूयांयोनिमापद्येरन्, श्वयोनिं वा, सूकरयोनिं वा, चांडालयोनिं वा

छांदोग्योपनिषद् अध्याय ५ खंड १० मंत्र ७ यावरील श्रीशांकरभाष्य

ये इह लोके रमणीयं चरणं शीलं येषां ते रमणीयचरणाः,
रमणीय चरणेनोपलक्षितः शोभनोऽनुशयः येषां ते
रमणीय चरणा उच्यन्ते तद्विपरीताः कपूयचरणाः ।

असें देऊन, पुण्ययोनि म्हणजे

ब्राह्मणयोनिं वा क्षत्रिययोनिं वा वैश्ययोनिं वा

आणि तद्विपरीत कपूय ( पाप ) योनि =

श्वयोनिं वा, सूकरयोनिं वा, चांडालयोनिं वा

असें स्पष्ट म्हटलें आहे. यावरून, पापयोनि म्हणजे कुत्रीं, डुकर व चांडाल हे ठरत असून, ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे पुण्ययोनि ठरतात, या मालेंत स्त्रिया गोवलेल्या नाहींत.

आणि रा. कावांनीं दर्शविलेल्या श्रीभगवद्गीतेच्या शांकरभाष्यांत, स्त्रियांबरोबर वैश्यांस देखील पापयोनि ठरविलें आहे. श्रीशंकराचार्यांच्या च मतानें श्रुतींत जर, स्त्रियांबरोबरचे वैश्य पुण्ययोनि ठरतात तर, स्त्रिया तेवढ्या पापयोनि कशा होतील ? एतदर्थ,

श्रुतिस्मृतिविरोधे तु श्रुतिरेव गरीयसी

या न्यायानें श्रुतीला विरोध न होईल असा मी सांगतों त्या प्रमाणें च अर्थ केला पाहिजे. तो असा—

हे अर्जुना ! जे योणी पापयोनि म्हणजे श्वान, सूकर, चांडाल वगैरे योनि असतील, तसेंच स्त्रिया, वैश्य व शूद्र तेहि माझ्या आश्रयानें उत्तम गतीतें पावतात. असो.

यांत " पापयोनयः " हें पद विशेषण नव्हे. विशेष्यच आहे.

मनुस्मृति अ. ४ श्लोक १६६ च्या श्लोकाच्या टीकेंत कुल्लूक भट्टांनीं देखील "पापयोनिषु " म्हणजे " कुक्कुरादि योनिषु " असा, पूर्वोक्त श्रुतीला अनुसरूनच, अर्थ केला आहे.

श्रीमध्व रामानुजादि आचार्यांस द्वैत विशिष्टाद्वैतादि मतकार म्हणून सोडून देऊन, श्रीशंकराचार्यांप्रमाणें अद्वैतमतानुयायी प्राकृत टीकाकार, श्रीसमर्थपूर्वकालीन, समकालीन व उत्तरकालीन, ज्ञानेश्वर, वामनपंडित, रमावल्लभदास, मोरोपंत, इतके च नव्हेत तर लोकमान्य टिळक, पंडित सातवळेकरदेखील मी केलेल्या अर्थाप्रमाणें च म्हणजे पापयोनि शब्द विशेष्य गणूनच अर्थ करतात. स्त्रियांच्या पापयोनित्व शंकेच्या निवारणार्थ रा. काकांना हा पुरावा पुरे काय ?

*स्त्रियांना ब्रह्मज्ञानप्राप्त्यर्थ शास्त्राचा प्रतिबंध गार्गी, मैत्रेयी इत्यादि ब्रह्मवादिनींच्या कालाप्रमाणें आजहि पण नाहीं.*

स्त्रियांचा स्वभाव देव, गुरु, पितर, पति, व अपत्य, यांची सेवाशुश्रूषा करणें वगैरे शूद्रकर्मसदृश असल्यामुळें कित्येक विद्वानांनीं त्यांस शूद्रसादृश्य दिलें आहे.

' तुष्यतु दुर्जनः ' या न्यायानें माझे पूर्व लेखांतील म्हणणें मान्य करून सुद्धां सज्जन काकांनीं विचारलेल्या प्रश्नाची वाट अशी मी लावतों.

रा. काकांच्या मूळ लेखाच्या ६ व्या सदरांत मन्वादिस्मृतिकारांच्या कंठरवाकडे निवळ बोट दाखवून भारतांतील आश्वमेधिक पर्वाच्या एका श्लोकामधला च चरण देऊन जी वाचकांची दिशाभूल करण्याचा प्रयत्न केला आहे, तो च शिळा धार परामर्शांत पुनः माझ्यावर सोडला आहे. तो मूळ श्लोक असा,

यतिर्गुरुर्द्विजातीनां वर्णानां ब्राह्मणो गुरुः ।

पतिरेव गुरुः स्त्रीणां सर्वेषां पार्थिवो गुरुः ॥ आश्वमेधिकपर्व अ. १०८

याचा सरळ अर्थ—संन्यासी त्रैवर्णिकांचा गुरु. म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांना पूज्य. सर्व वर्णांचा गुरु ब्राह्मण. स्त्रियांना पति हा ( यतिब्राह्मणादिकांप्रमाणें ) पूज्य च. आणि सर्वांना राजा गुरु ह्मा. पूज्य.

*रा. काकांच्या च आधारानें स्त्रियांना येथें चार गुरु मिळाले !*

रा. काकांनीं पूर्वलेखांत दिलेले इतर आधार स्त्रियांनीं पतिशुश्रूषा करावी याविषयींचे आहेत. आणि आमचेंहि मत तसें च असल्याचें वरील स्त्रियांच्या शूद्रसमानत्वाच्या विवेचनांत मीं दिलें च आहे.

शास्त्रांत औषधें असतात म्हणून कांहीं वेद, स्मृति, किंवा उपनिषदें धुंडाळल्यानें भागणार नाहीं. त्याला वैद्यशास्त्र च पाहिलें पाहिजे.

---

( १ ) मह गुरुर्महत्यांगिरसे इति हैमः । मह पूजायाम् ॥

त्याचप्रमाणें, मनुस्मृति आणि याज्ञवल्क्यस्मृतींत मूर्तिप्रतिष्ठा आणि पूजा वगैरे उपासनाविधि नाहींत, म्हणून आसेतुहिमालयापावेतों, पसरलेल्या देवालयांना अशास्त्रीय म्हणून काढून टाकतां येणें शक्य नाहीं. तर प्रतिष्ठा पूजा वगैरे उपासनाविधि ज्या ग्रंथांत आहेत, अशा तऱ्हेच्या आगम म्हणजे तंत्रग्रंथाचें अवलोकन केलें पाहिजे. तद्वत च, उपासनेशीं संबंधित दीक्षा, दानग्रहणादि विधींशीं ज्या गुरुशिष्याधिकारत्वाचा संबंध येतो तें जाणण्यास स्मृतींची उलटापालट करून भागवयाचें नाहीं.

त्याकरितां आगमग्रंथाचें च अवलोकन करावें लागेल. आणि ते वाचले असतां स्त्रियांना मोक्षसाधनार्थ पतिव्यतिरिक्त दुसरा गुरु करितां येतो किंवा नाहीं, तसें च त्यांना आणि द्विजेतरांना महंत होतां येतें किंवा नाहीं, वगैरे या रा. काकांच्या शंका फिटतील.

पंचरात्रागम या तंत्रग्रंथांतर्गत व्योमसंहितेंत काय म्हटलें आहे, तें पाहा—

त्रैवर्णिकानां वेदोक्ते सम्यग्भक्तिमतांहरौ ॥
आहुरप्युत्तमस्त्रीणामधिकारं तु वैदिके ॥
ययोर्वशी यमी चैव शच्याद्याश्च तथाऽपराः ॥
स्त्रीशूद्रब्रह्मबंधूनां तंत्रज्ञानेऽधिकारिता ॥

त्याचप्रमाणें विष्णुरहस्यांतहि ब्रह्मोवाच—

दीक्षाप्रदाने भगवन् के के स्युरधिकारिणः ॥
गौणमुख्यप्रभेदेन वद तद्दयया मम ॥

असा ब्रह्मदेवानें प्रश्न केल्यावेळीं, श्रीहयग्रीव उवाच—

प्रतिलोमानुलोमानां वर्णानामपि सर्वशः ॥
ब्राह्मणोहि गुरुर्मुख्यो गौणाः पित्रादयः स्मृताः ॥

या श्लोकानें गुरु कोण होतात, हें सांगावयास सुरवात करून शिष्यत्वाधिकारि वर्गांची गणना करताना

द्विजस्त्रीभिरुपास्याःस्युः तयाद्यालयः शांता विष्णुभक्तिपरायणाः ।
पतितादीन्श्वपाकांताननुगृण्हंति दीक्षिणः ॥
अनुगृण्हंति दृष्ट्वैव तत्तज्जात्यधिकानपि ॥
आज्ञाप्य तत्तज्जातीयं दीक्षयंत्यव्यवाहिते ॥

असें सांगितलें आहे.

विस्तारभयास्तव विष्णुरहस्यांतील मधलीं मधलीं प्रमाणास हवीं असलेलीं वाक्यें दिलीं आहेत, अवश्य त्यांनीं मूळ ग्रंथ समग्र पाहिल्याविना राहूं नये.

या ग्रंथांत या विषयावर दोन अध्याय खर्ची घातले आहेत. पैकीं पहिला अध्याय गुरु कोण कोण होतात, या विषयींचा असून दुसरा शिष्यप्रशिष्यांविषयींचा आहे. प्रशिष्य ह्मणजे शिष्याचा शिष्य.

याचा सारांश—व्योमसंहिताधारें त्रैवर्णिकांबरोबर उत्तम स्त्रियांनाही, वेदाधिकार असल्याचें सिद्ध होत असून, तंत्रज्ञानाचाही अधिकार असल्याचें ठरतें, आणि शूद्र व ब्रह्मबंधु यांना तंत्रशास्त्राचा अधिकार असल्याचें निश्चित होतें.

विष्णुरहस्य ग्रंथांत गुरु, शिष्य, प्रशिष्य, कोण कोण असावेत, कसे असावेत कोणी कोणास उपदेशावें, हें विस्तारानें सांगितलें आहे.

दीक्षा देण्यास कोण कोण मुख्यामुख्यत्वानें अधिकारी होतात, या ब्रह्मदेवाच्या प्रश्नास उत्तर देतांना, श्रीहयग्रीवरुपी श्रीनारायण ह्मणतात— सर्व वर्णांपासून प्रतिलोमानुलोमजाती आणि चांडालादिकांपर्यंत, प्रत्येकाचे गुरु ब्राह्मण होऊं शकतात आणि ज्याचे त्याचे पितर ह्मणजे बाप, आजा वगैरे, तसेंच मामा, सासरा हे व वरिष्ठ देखील मंत्रोपदेश करण्यास अधिकारी होतात.

परिव्राजक सर्वाश्रमीयांना दीक्षा देऊं शकतात; गृहस्थ हे परिव्राजक, वानप्रस्थ आणि नैष्ठिक ब्रह्मचारी यांव्यतिरिक्त ह्मणजे ब्रह्मचारी स्नातक आणि गृहस्थ यांस दीक्षा देण्यास अधिकारी होत, ब्राह्मणाचा दीक्षादाता ज्ञानाधिक ब्राह्मणच असला पाहिजे; अवर वर्णास उच्चवर्णीय, दीक्षा देण्यास अधिकारी असतो; वगैरे वगैरे बराच विस्तार आहे.

वरील मालिकेंतील दीक्षादात्यांत, बाप, चुलता, बंधु, मामा, सासरा यांचीं नांवें गोवलीं असून देखील नवऱ्याचें मात्र नांव नाहीं. ही गोष्ट रा. वाकानीं लक्षांत ठेवण्यासारखी आहे! दीक्षार्ह कोण? हें सांगतांना

द्विजस्त्री भिरुपास्याःस्युः

या वाक्यें करून द्विजांबरोबर त्याच्या स्त्रियांना देखील स्थान दिलें आहे. इतकें च नव्हे तर,

पतिता ये द्विजातीनां प्रायश्चित्तविवर्जिताः ।

पश्चात्तापेनसंतप्ताः निवृत्तास्तेऽपिसंस्कार्योद्विजस्त्रीदयालुभिः ।

इत्यादि वाक्येंकरून स्ववर्णापासून च्युत झालेले द्विज प्रायश्चित्तविहीन असे पश्चात्ताप पावून, दुष्कर्मापासून निवृत्त झाले असतां, द्विज आणि त्यांच्या स्त्रियांप्रमाणें दयालु अशा गुरूंनीं दीक्षादानानें पावन करावें, असें सांगितलें आहे.

हे आधार स्त्रियांना पतिव्यतिरिक्त मोक्षगुरु करण्याचा अधिकार असल्याचें सिद्ध होण्यास पुरे असें वाटतें.

---

(१) या ठिकाणीं गुरु शब्द मंत्रोपदेष्टा या अर्थी असल्याचें निराळें सांगावयास नकोच, कारण, हा ग्रंथ त्याच विषयाचा आहे.

राहिला प्रश्न काय तो, स्त्रियांना आणि द्विजेतरांना श्रीसमर्थांनी महंती दिली त्याचा

अनुगृण्हंति दृष्ट्वैव तत्तज्जात्सधिकानपि ।
आज्ञाप्य तत्त ज्जातीयं दीक्षयंत्यथवाहिते ॥

अर्थः—सद्गुरु हे त्या त्या जातींतील श्रेष्ठ अशांना पाहून च त्यांवर अनुग्रह करितात, तसें च, त्यांस आज्ञा देऊन त्यांवरून इतर तज्जातीयांना दीक्षा देवबितात, अथवा स्वतः हि देतात.

एवढ्यानें महंतीचा निर्वाह होतो असें मला वाटतें.

स्त्रियांना परोपदेशाचा अधिकार असल्याविषयीं स्वतंत्र पुरावा हवा असल्यास बहुतेकांच्या कंठगत असलेल्या अध्यात्मरामायणांतील रामहृदयांमधील,

रामः सीतामुवाचेदं ब्रूहि तत्त्वं हनूमते ।
निष्कल्मषोऽयं ज्ञानस्य पात्रं नौ नित्यभक्तिमान् ॥
तथेति जानकी प्राह तत्त्वं रामस्य निश्चितम् ।
हनूमते प्रपन्नाय सीतालोकविमोहिनी ॥

या श्लोकांवरून मिळेल.

रा. काकांना मी सुधारक ह्मणण्याचें कारण, त्यांनीं आपल्या लेखांत सनातनीयांस उद्देशून प्रश्न केले असून, आपल्या मूळ लेखाच्या ६ व्या कलमांत "ही सामाजिक सुधारणा समाजाच्या गळीं उतरविली होती," "एक सामाजिक सुधारणेचा, नवापाठ" वगैरे वाक्यांनीं श्रीसमर्थांवर आरोप केले होते, ते पाहून, रा. काका सुधारक असतील, अशी माझी समजूत झाली, पण, रा. काकांनीं लिहिलेला परामर्श वाचल्यावर ती माझी समजूत चुकीची ठरली, कारण, सुधारक वितंडवादी नसतात, त्यांना फक्त समाधान हवें असतें, असा त्यांचा लौकिक आहे. करितां रा. काकांवर मी गैरसमजुतीनें केलेला सुधारकत्वाचा आरोप परत घेऊन त्यांची मी कृपा याचितों.

राहिले प्रश्न काय ते, (१) श्रीसमर्थांचें शास्त्रविरुद्ध नांव, (२) कृष्णप्पा न्हाव्याची गोष्ट, (३) श्रीसमर्थांचा आणि आत्माराम महाराजांचा मतभेद (४) "मोक्ष गुरु ब्राह्मण च असावा, मग तो क्रियाहीन असला तरी चालेल" असें श्रीसमर्थांनीं म्हटलें आहे, असा त्यांच्यावरील आरोप, (५) श्रीसमर्थांनीं ब्राह्मणेतर सर्वांस शूद्रांत गणलें आहे, (६) ब्राह्मणेतर संतांना आपल्या संतनामावळींत नमस्कार केला, हें त्यांच्या इतर वाङ्मयांतील मतास विरुद्ध आहे, वगैरे.

म्हणोनि ज्ञान, वैराग्य, आणि भजन । स्वधर्म कर्म आणि साधन ।
कथा निरूपण श्रवण मनन । नीति न्याय मर्यादा ॥
या मध्यें एक उणें असे । तेणें तें विलक्षण दिसे ।

असें म्हणून क्रियाहीनत्वाचा निषेध केला आहे. इतकें च नव्हे, तर पुढें त्या च समासांत

आचार उपासना सोडिती । ते भ्रष्ट अभक्त दिसती ।
जळो तयांची महंती । कोण पुसे ॥

असें स्पष्ट सांगितलें आहे. या च दशकाच्या पहिल्या समासात ६ ते १२ ओवीपर्यंत जी ब्राह्मणाची थोरवी गाइली आहे, त्या ओव्यांचे मधले मधले चरण घेऊन श्रीसमर्थमतें क्रियाहीन ब्राह्मण देखील गुरुस्थानीं येऊं शकतात, असें भासविण्याचा प्रयत्न रा. काकानीं केला आहे.

श्रीसमर्थांनीं इतर संतास नमन केलें आहे, तें

" नमो महद्भ्यो नमो अर्भकेभ्यो० ऋ १-२-२४

या वैदिकन्यायानें आहे काकानीं दिलेल्या जातींचीं च नावें हवीं तर,

नमः क्षुल्लकेभ्यः, रथिभ्य., क्षत्तृभ्यः, तक्षभ्यः, रथकारेभ्यः,
कुलालेभ्यः, निषादेभ्यः, श्वभ्य., श्वपतिभ्यः

वगैरे रुद्राध्यायातील नमक पाहा.

रा. काका आपल्या मूळ लेखाच्या आठव्या कलमात अंत करणाच्या फळवळ्यानें ह्मणतात, " सर्वांचीं अंत करणें आपल्या हातीं धरणारा व इतरास तसें करा असा उपदेश करणारा हा योगी, व्यवहारात का होईना, अशी भेदनीति का शिकवितो हें कळत नाहीं." हा च समर्थांच्या चरित्रात इतर साधुसंताहून विशेष.

बहुतेक साधुसंत प्रपंच सोडण्यास जर उपदेश करितात, तर श्रीसमर्थ " आधीं प्रपंच करावा नेटका " असें ह्मणतात. इतर साधुसंत हरिकथानिरूपण करितात, तर श्रीसमर्थ हरिकथेबरोबर सावधानेतेनें राजकारण साधतात, हें आमचे रा. काका अवतरणात दिलेला त्यांचा आरोप करते वेळीं विसरतात. तरी श्रीसमर्थांच्या सावधानतेची प्रचीति येऊन रा काकाची शंकावृत्ती जावो, अशी श्रीचरणीं प्रार्थना करून खालील श्लोकानें समारोप करितों.

श्रीरामदासभगवत्सुचरित्रधेनोरङ्गे क्षतानि निजलेखनिकोग्रचञ्च्वा ।
कृत्वा नदन्ति नितरां द्विजभूतकाका एषामिदं सुशमनं श्रुतिशास्त्रवाक्यैः ॥

ज्येष्ठ शुद्ध ७ सोमवार १८६३

( १७ )

॥ श्रीरामसमर्थ ॥

# श्री. दुर्गादास रामदासी यांच्या ‘ परामर्श–विचार ’ लेखाचें परीक्षण

( लेखक – रा. ग. गो. कारखानीस, बी. ए.,
गौरव कार्यदर्शी, ह. से. संघ, विजापुर )

( १ ) आपल्या ‘ परामर्शाचा विचार ’ या लेखाच्या प्रारंभीं, श्री. दुर्गारामानीं आपलें मत आम्हाविषयीं विनाकारण कलुषित करून घेऊन, आम्हास आपल्या स्वकृत श्लोकात अहेर केला आहे व नंतर आपल्या लेखाच्या विषय–प्रस्तावनेंत " श्रींच्या वर्तनावर गोड शब्दात शितोडे उडविलेले पाहून " ह्या वाक्यानें आमच्यावर अप्रामाणिकपणाचा हि आरोप करण्यास ते धजले आहेत. श्रीसमर्थांबद्दल आमची काय भावना आहे, त्याबद्दल पू. नानासाहेब देव यांनीं गेल्या अंकात पृष्ठ ९० वर टीपेंत आपले विचार प्रगट केले आहेत. यापेक्षां जास्त आम्हीं स्वत बद्दल च लिहिलें तर त्यात कदाचित् आत्मश्लाघेचा दोष येईल. तो दोष आम्हीं चुकून सुद्धा आमच्या माथीं घेऊं इच्छित नाहीं. तरीपण श्री दुर्गारामास एवढें च नम्रपणें कळवितों कीं, गेल्या तीसबत्तीस वर्षांत श्रीसमर्थांच्या कोणत्या तरी एका ग्रंथांतील प्रत्यहीं निदान दहावीस ओंव्या ग्रंथ जवळ असताना आह्माकडून वाचल्या गेल्या नाहींत, असें क्वचित् घडलें आहे. ज्या क्वचित् प्रसंगीं असें घडलें आहे, त्याला कारण त्या त्या वेळीं बहुत करून कारागृहावरील अधिकारी वर्ग झाला आहे. पण अशा प्रसंगीं, केलेल्या किंवा झालेल्या पाठांतरानें प्रत्यहीं वाचनाचा नेम न चुकविण्याचें ध्येय घेतलें आहे. यावरून श्री. दुर्गारामानीं आह्माविषयीं काय तें समजून घ्यावें.

गेल्या कित्येक वर्षांत श्रीसमर्थांच्या ग्रंथाचें आमच्या शक्त्यनुसार आम्ही परिशीलन केलें आहे, तत्संबंधीं अनेकांच्या लेखाचें वाचन व व्याख्यानादि श्रवण केलीं आहेत, त्याच्या ग्रंथातील तत्वें समजून घेऊन तीं स्वत.च्या मगदुराप्रमाणें

आचरण्यात आणण्याचा प्रयत्न चालू आहे व त्यातील पुष्कळ प्रश्नावर विद्वान् व स्नेही मंडळींशीं चर्चा केली आहे. तरीपण कांहीं शंकाचा परिहार झाला नाहीं. त्या च शंका आह्मी उघडपणें व प्रामाणिकपणें या मासिकाच्या द्वारें विद्वानाच्या पुढ माडल्या. यात अस्वाभाविक असें काहीं च नसताना श्री. दुर्गारामास आह्मा " थींचीं व्यगें काढलीं व थींवर शितोडे उडविले " असें का वाटावें हें कळत नाहीं. ज्या गोष्टी आमच्या ध्यानीं, मनीं व स्वप्नीं हि आल्या नाहींत, त्याबद्दल भलती च समजूत करून घेऊन आह्मास त्यानीं आपल्या दुसऱ्या लेखाच्या प्रारंभींच्या श्लोकात कठोर बोलावें हें दुर्दैव होय. या श्लोकाप्रमाणें च लेखात हि एक दोन ठिकाणीं ते वाहवलेले आहेत. जशास तसें आह्मास हि करिता येईल. पण हा शिष्टाचार होणार नाहीं.

मासिकाच्या विद्वान वाचकास नम्रपणाची विनति ही कीं त्यानीं शुद्धान्त करणानें मुळीं च विकारवश न होता, आमचे दोन लेख व त्यास श्री. दुर्गारामानीं दिलेलीं दोन उत्तरें, त्या च प्रमाणें प्रस्तुत लेख, याचें शातपणानें मनन करावें, आह्मीं उभयतानीं ज्या ज्या ग्रथातील जीं जीं प्रमाणें आपापल्या विधानाच्या पुष्ट्यर्थ दिलीं आहेत ते ते ग्रथ निदान त्या त्या प्रमाणापुरते तरी वाचावे व मग शब्दार्थाची, पूर्वापार सदर्भाची ओढाताण करून वाचकाची दिशाभूल करण्याचा प्रयत्न कोणी कसा केला आहे, तें आपल्या मनाशीं च ठरवावें. त्याची भूमिका न्यायाधिशाची असावी अशी सूचना त्यास मासिकाच्या सपादकानीं देऊन ठेविली च आहे. सत्यान्वेषणात पक्षाभिनिवेशास स्थान नसावें एवढें मागणें आहे.

' पहिला सुमनहार ' पाच वर्षे आह्मास वाचावयास मिळाला नाहीं याबद्दल हेतुगर्भ आश्चर्य श्री. दुर्गाराम प्रगट करीत आहेत. तो दोष आमचा नसून आमच्या सापत्तिक परिस्थितीचा आहे आह्मी मासिकाचे वर्गणीदार अगदीं त्याच्या प्रारंभापासूनचे आहोंत त्यात प्रसिद्ध झालेले यच्चयावत् ग्रथ आह्माकडे आहेत. हल्ला मासिक आह्मीं केवळ कर्तव्य ह्मणून घत आहोंत. ' पहिला सुमनहार ' हा त्यात प्रसिद्ध झालेला ग्रथ नाहीं. तो स्वतन्त्र रीतीनें छापला गेलेला आहे तो विकत घेणें आह्मास शक्य नव्हतें विजापुरात तो कोणाकडे हि मिळणें शक्य नव्हतें. जेव्हा तो मिळाला तेव्हा तो वाचला. असा त्याचा इतिहास आहे. दुसरें आश्चर्य ते प्रगट करीत आहेत कीं, आपला ग्रथ समोर असताना सुद्धा आह्मीं त्याच्या लेखातील कांहीं वाक्याचा मुद्दाम विपर्यास केला आहे विपर्यास कोणी केला आहे तें आता वाचक च ठरवितील.

निरुपायानें प्रस्तावना लाबली. पण तसें करणें भाग पडलें. वाचकानीं उदारान्त करणानें क्षमा करावी अशी याचना करतों. आता श्री दुर्गारामाच्या एक एक मुद्याकडे वळतों.

( २ ) रामदास हें नांवः—न्यायासनापुढें आल्यावेळीं लौकिक गोष्टींचा च विचार करणें योग्य असतें. अलौकिक गोष्टींचा विचार करणें व्यवहार्य ठरत नाहीं. श्रीसमर्थांचें नांव ' रामदास ' असें त्यांच्या गुरूनीं – श्रीरामांनीं – ठेविलें हा पुरावा चिकित्सक युगात उपयोगाचा नाहीं. आह्मीं आमच्या पहिल्या लेखांत श्रीसमर्थांनीं आपणांस ' रामदास ' हें नांव स्वतः च ठेऊन घेतल्याचें लिहिलें आहे. त्यास ' दासविश्रामधाम ' काराचा पाठिंबा आहे. श्रींचीं नावें अनेक असल्याचें ते लिहितात. तेव्हां श्रींनीं शास्त्रनिषिद्ध असें नांव कां धारण केलें ही आमची शंका. श्री. दुर्गारामांचा अलौकिक पुरावा येथें उपयोगाचा नाहीं.

भारतभागवतादि ग्रंथांतील कांहीं नांवें त्यांनीं आमच्या विरुद्ध पुराव्यासाठीं पुढें आणलीं आहेत. ऐतिहासिक कालांतील श्रीभानुदासांचें नांव हि त्यांनीं दिलें आहे. श्री भानुदासांनीं आपणास तें नाव स्वतः च ठेऊन घेतल्याचें इतिहास सांगत नाहीं. तो च प्रकार भारत भागवतांतील नामाचा. मातापितरांनीं आपल्या मुलांचें नांव ठेवणें व स्वतः नांव ठेऊन घेणें यांत अंतर आहे. शास्त्रनिषिद्ध नांव मुलाचें आईबापांनीं ठेविल्यास तो दोष नांव ठेवणारांचा आहे, मुलाचा नव्हे, श्रीसमर्थांच्या बाबतींत तसें घडलेलें नाहीं. म्हणून तर आमची शंका.

श्रीपुरंदरदास प्रभृति कर्नाटकांतील दासकूटांतील संतांचीं नांवें श्री. दुर्गारामांनीं पुरावा म्हणून आम्हांस सादर केलीं आहेत. यावद्दल येवढें च लिहितों कीं, या कर्नाटकी संतांस श्रीसमर्थांप्रमाणें आपल्या मताप्रमाणें सनातनी धर्मविचारा श्री. दुर्गारामांचा कोणी समानधर्मा पुढें आल्यास मग च त्याचें उत्तर देऊं. आमच्या मताप्रमाणें हे सर्व च संत पूर्ण नवमतवादी होते. तेव्हां श्री. दुर्गारामांचें म्हणणें फोल आहे.

( ३ ) क्षुद्र शंकाः— श्रीसमर्थांच्या नांवाबद्दलची ही आमची शंका व इतर कांहीं शंका श्री. दुर्गारामांच्या दृष्टीनें अत्यंत क्षुद्र आहेत व असल्या क्षुद्र शंका काढणाराची मनोवृत्ति हि तशी च असावी असा जातां जातां त्यानीं आह्मांस आपल्या दुसऱ्या लेखांत टोमणा मारला आहे. त्यांच्या दृष्टीनें आमच्या शंका क्षुद्र असतील. आह्मांस तसें वाटत नाहीं. आह्मी श्रीसमर्थांस आमचा आदर्श पुरुष ( Hero ) समजतों. तेव्हां त्यांच्या अगदीं लहान सहान गोष्टी सुद्धां आह्मांस कौतुकास्पद वाटतात. त्यांच्या साध्या गोष्टींत हि आह्मांस कांहीं महत्त्वाचा हेतु आहे असें वाटतें. तो काय असावा हें पाहण्यासाठीं तर आमची धडपड. ' The Hero is hero from all points of view. ' ह्मणजे आदर्श पुरुष सर्व बाजूंनीं आदर्शभूत असतो अशी आमची दृढ भावना. ही च दृष्टी ' प्रताप ' कारांची आहे. ह्मणून आह्मीं त्यांस कौतुकानें श्रीसमर्थांचे ' बॉस्वेल् ' ह्मणतों. बॉस्वेलनें जसें डॉ. जॉनसनचें वर्णन केलें आहे, तसें च गिरिधरांनीं, अल्प प्रमाणांत

यां होईना, श्रींचें ' प्रतापां ' त केलें आहे. श्रीसमर्थ कसे चालत, त्यांचें बोलणें कसें असे, ते काय खात, किती खात, त्यांची दृष्टी ( पहाणें ) कोठें असे, ते निजत केव्हा, किती निजत, कशावर निजत, विडा खात काय इ. वगैरे क्षुद्र दिसणाऱ्या गोष्टींत सुद्धा आह्मांस मोठा अर्थ भरलेला दिसतो. याला अनुसरून आम्ही त्या विभूतीकडे पहातों. तेव्हां कांहीं ठिकाणीं त्या पुरुषाचें वागणें आह्मास अगम्य व चमत्कारिक भासतें, त्यामुळें कांहीं शंका उद्‌भवतात. त्या आह्मी पुढें मांडतों. पण त्या, कांहीं नाजुक प्रकृतींच्या लोकास, मानवत नाहीं. त्यास धक्का बसतो. तशी स्थिति श्री. दुर्गारामाची दिसते. नाहीं तर ते आमच्यावर घसरते ना व आमच्यावर नसते आरोप करून आमच्या शुद्ध हेतूंबद्दल शंका घेते ना !

( ४ ) खोटा आरोपः—या च प्रकरणीं " इतिहासाकडे इतकें च नव्हे, प्रत्यक्ष व्यवहाराकडे देखील डोळेझाक " आह्मी करीत आहोंत, असा त्यांचा आमच्यावर आरोप आहे. आह्मास तर याच्या उलट म्हणावयाचें आहे. श्री. दुर्गारामांसारखे तथा कथित सनातनी श्रीसमर्थांस–देशकाल वर्तमान पाहून वागणाऱ्या चाणाक्ष संतास–भिन्न परिस्थितींत शेंकडों वर्षांपूर्वी लिहिल्या गेलेल्या शास्त्राप्रमाणें तंतोतंत वागणारा ठरवितात, तेव्हा ते च इतिहासाकडे व व्यवहाराकडे पूर्ण दुर्लक्ष करीत आहेत असें आह्मास म्हणावयाचें आहे. ' ऐतिहासिक दृष्टीनें शास्त्राकडे पाहूं या ' ही च तर आमची–नवमतवादी सनातन्याची मुख्य–ओरड व मागणी. तिकडे तर श्री. दुर्गारामांसारखे सनातनी लक्ष देण्यास अत्यंत अनुत्सुक, म्हणून तर हे तंटे. श्री. दुर्गारामांस एक च प्रश्न नम्रपणें विचारतों कीं, श्रीसमर्थांसारखा चिकित्सक, धोरणी पुरुष १०००।१५०० वर्षांपूर्वीच्या जुन्या काळांत, कीं ज्या काळीं देशांत एकीएक आर्यसंस्कृति च नांदत होती, त्या दूरच्या काळातील शास्त्रें, आपल्या वेळेच्या बदललेल्या काळात, कीं ज्या काळी परकीय व सर्वस्वीं भिन्न अशा एका अवैदिक दुष्ट संस्कृतीनें आर्यसंस्कृतीचीं पाळेंमुळें खणून काढण्याचा व तिचीं शकलें पाडण्याचा चंग बांधून भगीरथ प्रयत्न चालविला होता, जशींच्या तशींच आचरणांत आणण्यास योग्य होतीं असें समजेल ? युगऱ्हासानुरूपतः धर्मात, चालींत, रूढींत व समाजाच्या एकंदर जीवनात अंतर पडत जातें, हें श्रीसमर्थांस काय माहीत नसेल ? श्रीसमर्थांसारखा डोळस पुढारी इतकें अंधानुकरण करील काय ? हें च तर आमच्या मतें श्रींचें वैशिष्ट्य.

( ५ ) एक ऐतिहासिक चूकः—श्री भानुदासांसंबंधीं एक चूक थोड्याशा अनवधानत्वामुळें श्री. दुर्गारामाकडून घडली गेली आहे. प्रस्तुत प्रकरणीं त्याचा कांहीं संबंध नाहीं खरा. पण ती सुधारली पाहिजे. पंढरपुरच्या श्री पांडुरंगाची मूर्ति विजापुरात नेली गेली होती, ती पंढरपुरास परत श्री भानुदासांनीं आणली असें त्यांनीं म्हटलें आहे तें इतिहासास धरून नाहीं. ती मूर्ति अनागोंदीस–हंपीस–विजयानगरास– नेली गेली होती. विजापुरास नव्हे. येथून विजयानगर–

हंपीचा हंपी-दोन अडीचशें कोस दूर आहे. विजापूर व विजयानगर या नाम सादृश्यामुळें हा घोंटाळा झाला.

( ६ ) **एक सूचना** —श्री. दुर्गारामास येथें एक सूचना द्यावीशी वाटते कीं, त्यांनीं श्री समर्थांच्या वार्वीचा विचार करतेवेळीं वारकरी संत मध्यें न आणल्यास बरें श्रीसमर्थांच्या संबंधींचीं ते करीत असलेलीं विधानें, वारकरी संतास हि ते लागू करीत असतील तर मग मज्जें काहीं ह्मणणें नाहीं. मला ती इष्टापत्ती च आहे. माझा मार्ग ते अशानें वरा च सुलभ करीत आहेत. त्यानीं तसें ह्मणावें. नंतर च मी काय लिहावयाचें तें लिहीन.

( ७ ) **हुर्मुजी वस्त्रें** —वर म्हटलें च आहे कीं, न्यायासनासमोर आल्यावर लौकिक गोष्टींचा तेवढा च केवळ विचारकर्तव्य असतो. त्यांत दैवी चमत्कार, ' ऐकतला आवाज ' असल्या गोष्टींची भानगड असणें व्यवहारास धरून नाहीं. कागदोपत्रीं असलेले ह्मणजे ज्यास पूर्वशास्त्राची संमति आहे असें एतत्सदृश पुरावे च पुढें आणणें योग्य आहे. हा शास्त्रसंमत मार्ग आहे असें असताना श्री. दुर्गाराम या गोष्टीस शास्त्राचा आधार न दाखवितां अलौकिक गोष्टींचा दाखवीत आहेत. यास काय ह्मणावें तें समजत नाहीं. हुर्मुजी वस्त्रें श्रीरामआज्ञेनें श्रींनीं धारण केलीं, कुबडी श्रींचे योगमार्गांतील जे गुरु श्रीदत्त यानीं त्याना दिली, श्रीगुर्वाज्ञेनें – श्रीरामाज्ञेनें – मेखळा त्यांनीं गळ्यात घातली, असला अलौकिक पुरावा श्री समर्थांस कट्टर सनातनी ठरविण्यास उपयोगाचा नाहीं. ज्या श्लोकात ह्या गोष्टी वर्णिल्या आहेत ते श्लोक माझ्या दृष्टीसमोर गेलीं कित्येक वर्षें आहेत त्यांचा मी विचार केला आहे पण ते श्लोक ह्मणजे कांहीं शास्त्र नव्हत. कोणी तरी केलेल्या असल्या श्लोकांच्या आधारें श्रीसमर्थांना सनातनी ठरविण्याचा प्रयत्न करणें ह्मणजे स्मॉल कॉजेस कोर्टाच्या निवाड्यानें हायकोर्टाचा निर्णय फिरविण्या-सारखें हास्यास्पद होय !

शास्त्रात सांगितल्याप्रमाणें विद्यास्नातक श्रीसमर्थ होते. त्याचा वेषसुद्धां त्यात सांगितल्याप्रमाणें होता, हें सिद्ध करण्यासाठीं ' धारयेद् वैणवीं यष्टिम् ' इ. श्लोक ते आधार म्हणून देतात. यावर आह्मी त्यास विचारतों कीं, स्नातकानें शुभ्र च वस्त्र धारण करावींत ( हुर्मुजी नव्हेत ), तीं दोन च असावींत ( मेखला नव्हे ), जटा व दाढी राखू नयेत इ. जें ह्मटलें आहे त्या प्रमाणें श्रींचें वागणें होतें काय ? ' वैणवीं धारयेद् यष्टिं ' हा आपणास अनुकूल वाटलेला ( पण तो तसा नाहीं ) श्लोक मात्र घ्यावयाचा व त्यानें श्रींस कट्टर सनातनी ठरविण्याचा प्रयत्न करावयाचा व आह्मी मात्र ' *शुक्लाम्बरधरो नीच केशश्मश्रुनख शुचि* ' ह्या श्लोकाप्रमाणें श्रींचें वर्तन नसल्याचा प्रश्न विचारल्याबरोबर आमच्यावर घाणेरडे आरोप करण्यास प्रवृत्त व्हावयाचें ! हा सासा न्याय !

घापाय वस्त्र त्यागाचें निदर्शक असल्याचें शास्त्रानें ठरविलें असेल व आहे हि. पण हुर्मुजी वस्त्र किंवा रंग त्यागनिदर्शक असल्याचें कोणत्या शास्त्रांत आहे? यास आधार काय? श्रीसमर्थांनीं त्या रंगास सनाथ करण्यापूर्वी तो त्यागाचा दर्शक म्हणून दुसऱ्या कोणी सनातन्यानें अस्तित्वांत आणल्याचें सनातनी शास्त्रकार सांगतात काय?

( ८ ) **संन्यासनिषेधः**—संन्यासाश्रमाचा निषेध श्रीसांप्रदायांत नसता तर वर उल्लेखिलेलीं बाह्यचिन्हें-कुबडी, मेखला, हुर्मुजी वस्त्रें, दाढी जटा इ. *श्रीसांप्रदायांत आलीं कशीं? संन्यास सांप्रदायाची अवश्यकता भासली नाहीं* म्हणून ना! ही आवश्यकता भासली असती तर इतर सांप्रदायांप्रमाणें, श्री समर्थांनीं आपणांस संन्यासी सांप्रदायाच्या चार संप्रदायां पैकीं कोणत्या तरी एकाद्या सांप्रदायाचें म्हणवून घेतलें असतें. श्री ज्ञानेश्वर आपणांस 'प्रकाश' सांप्रदायी म्हणवीत, श्री तुकाराम आपणांस 'चैतन्य' सांप्रदायी म्हणवीत इ. माहिती श्री. दुर्गारामांनीं ज्या लेखांतून (सां. वि. वि. भा. १ ला, ले. ३७) 'कापायांवर नग्न तें श्रुति मतें' इ. श्लोक उद्धृत केला आहे त्यांत राजवाड्यांनीं सविस्तर प्रतिपादिलेलें त्यांनीं पाहिलें आहे. त्या लेखांकांतून ध्वन्यर्थ काय निघतो? श्री सांप्रदायांत संन्यासाश्रमाचा निषेध आहे किंवा स्वीकार आहे? हें श्री. दुर्गारामांनीं च आपल्याशीं ठरवावें. श्रीसमर्थांचें यांत त्यांना आचार व विचारस्वातन्त्र्य दिसत नाहीं काय?

*आपल्या पहिल्या लेखांत श्री. दुर्गारामांनीं 'श्री समर्थ सांप्रदायांत* संन्यासाचा निषेध आहे' या आमच्या विधानास 'नाहीं' असें उत्तर देतांना "संन्यासी म्हणजे शडन्यासी। विचारवंत सर्व सन्यासी। दा. १५×१०" असें जें वचन दिलें आहे, तें चाललेल्या प्रकरणास धरून आहे काय? वाद चालला आहे बाह्य चिन्हांबद्दल-कुबडी मेखला इ. बद्दल व हें उत्तर देत आहेत मानस शास्त्राच्या दृष्टीनें! शास्त्रीय वादाची ही पद्धति काय?

त्याग व निस्पृहता हे गुण कांहीं, श्री. दुर्गाराम समजतात त्या प्रमाणें, (त्यांचा दुसरा लेख) श्री समर्थ सांप्रदायाचे च तेवढे मुख्य आहेत असें नव्हे. *कोणत्या हि संत सांप्रदायाचे ते मुख्य गुण असले च पाहिजेत.* या च दोन गुणांत श्रीसांप्रदायाचे वैशिष्ट्य नाहीं. श्रीसांप्रदाय इतर सांप्रदायापेक्षां विशेष उठून दिसतो (हल्लीं नव्हे हो! हल्लीं सर्व च सांप्रदाय एका च पातळीवर आले आहेत.) तो त्याच्या सावधानता-प्रपंच व परमार्थ या दोन हि बाबतींत-या गुणामुळें. पारमार्थिक गोष्टींस अवश्य असलेली सावधानता एकजात सर्व च महाराष्ट्रीय संतांनीं कंठरवानें सांगितली आहे. पण प्रापंचिक-देशकालवर्तमान-सावधानतेबद्दल श्री समर्थांनीं जसें खडखडून सांगितलें आहे,

तसें इतरांनीं सांगितलेलें नाहीं व सांगितलें आहे तें अगदीं अल्प व वळणावळणांनीं. हें च आमच्या मतें श्रींचें वैशिष्ट्य. राजकारणाशिवाय केलेली इतर धडपड-प्रपंच, तो प्रपंच च नव्हे असें श्री समर्थांनीं अगदीं ठसून सांगितलें आहे. पण असल्या प्रपंचाचा-राजकारणाचा संबंध श्री. दुर्गाराम श्री समर्थांच्या हुर्मुजी वाण्याकडे कसा चिकटवितात हें त्यांचें त्यांसच माहीत! हा उघड दूरान्वय दिसतो. आमचें मत असें कीं, हुर्मुजी वस्त्रें हीं श्रींच्या शास्त्रोक्त आचारांचें किंवा त्यांच्या राजकारणाचें लिंग नसून त्यांच्या स्वतंत्र आचारविचाराचीं द्योतक होत.

**( ९ ) ब्राह्मणेतर संतांची महती:**—जरी ज्ञान जालें जनीं नीच याती। तरी तो नव्हे वंद्य कांहीं महंती॥ करुणाष्टकें १३४ × ८७॥ या श्रीसमर्थवचनाविरुद्ध म्हणून आम्ही 'दासविश्रामधाम' कारांस साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत आमच्यावतीचे साक्षीदार म्हणून उभे केलें होतें व त्यांच्या तोंडून कृष्णाप्पा न्हाव्याची गोष्ट वदविली होती, पण ती सत्यकथा नसून आख्यायिका असावी असा श्री. दुर्गारामांचा अभिप्राय पडला व त्यांनीं धामकारांस विनभरंवशाचा अतएव अविश्वसनीय साक्षीदार ठरविला व "श्रीसमर्थांच्या मताविरुद्ध इतरांचीं म्हणजे त्यांच्या अनुयायांचीं च कां होईनात मतें असल्यास तीं ग्राह्य नाहींत," असा शेरा हि पण त्यांनीं ठोकला आहे. 'दासविश्रामधाम' कारांस श्रीसांप्रदायांत श्रीसमर्थांचे अवतार मानण्यांत येतें. या गोष्टीवर आमचा विश्वास असो वा नसो त्यांचें महत्त्व किती समजण्यांत येतें येवढें च दाखविण्याकरितां या आख्यायिकेचा येथें उल्लेख आम्हीं केला आहे. दासविश्रामधामास पू. नानासाहेब 'एनसायक्लोपीडिआ रामदासिका' असें मोठ्या अभिमानानें व कौतुकानें संबोधितात. 'धामां' तील कांहीं गोष्टी मासिकाच्या वाचकांस वेळोवेळीं त्यांनीं सादर केल्या आहेत. तेव्हां या श्री. दुर्गारामांच्या विधानाचें सत्यासत्य त्यांनीं च वाचकांनीं च ठरवावें.

**( १० ) ब्राह्मणेतर सर्व शूद्र:**—' तया ब्राह्मण देहास पाहो। अधिकार वेदीं॥ दा. १० × २ × १७॥ या वाक्याधारें ब्राह्मणेतर सर्व शूद्र आहेत असें श्रीसमर्थांचें मत असावें अशी आमची शंका आपल्या लेखांत आम्ही मांडली होती. श्री. दुर्गारामास तसें वाटत नाहीं. त्यांनीं असें उत्तर दिलें आहे कीं, "ब्राह्मणास वेदाधिकार आहे असें म्हटल्यानें इतर द्विजांस तो नाहीं असें म्हटल्याचें ठरत नाहीं." मराठी भाषेचें आमचें जें अल्पज्ञान आहे, त्याप्रमाणें आम्ही वरील वाक्याचा अर्थ केला. मासिकाच्या विद्वान वाचकांनीं श्रीसमर्थांच्या वरील वाक्याचा सरळ अर्थ काय होतो, तो आपल्याशीं ठरवून व ऐतिहासिक दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहून मग च दिशाभूल व शब्दच्छल कोणी केला आहे तें ठरवावें.

ऐतिहासिक दृष्टीनें या प्रश्नाकडे वाचकानीं पहावें असें मुद्दाम च आम्हीं वर म्हटलें आहे. पंडितवर्य गागाभट्टाकरवीं श्रीशिवछत्रपतींस वेदमन्त्रानीं राज्याभिषेक झाल्याचा आम्ही उल्लेख आमच्या पहिल्या लेखात केला आहे. तो केवळ ' तया ब्राह्मण देहास पाहो । अधिकार वेदीं ॥ ' या वचनान्वयें आमच्या मतें श्री ब्राह्मणेतरास शूद्र लेखतात, असें असून राज्याभिषेक प्रसंगीं गागाकरवीं वेदोक्त मंत्रानीं तें कार्य करवितात या दोन कृतींत विसंवादित्व का दिसतें ह्या आमच्या शंकेस्तव, आमचें हें शंकास्त्र च घेऊन तें आमच्यावर उलटविण्याचा प्रयत्न श्री. दुर्गाराम करीत आहेत. पण तो त्याचा प्रयत्न साधत नाहीं. त्यास म्हणावयाचें आहे कीं, ज्या अर्थी ब्राह्मणेतर द्विजास श्रींच्या मतें वेदाधिकार होता म्हणून आमचें मत-श्रीसमर्थ सर्व ब्राह्मणेतरांस शूद्र समजतात हें-चूक. पण हें ऐतिहासिक दृष्टीनें चूक आहे. ' भोंसल्याचें क्षत्रियत्व ' सा. वि. वि. ले. ३४ या लेखांत राजवाड्यानीं सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. राजवाड्यानीं हि त्रैवर्णिकास वेदाधिकार ( विशिष्ट बाबतींत तरी ) होता असें त्या लेखात प्रतिपादलें आहे. श्री. दुर्गाराम हि आपल्या लेखांत द्विज असा शब्द वापरतात. ( पण राजवाडे व श्री. दुर्गाराम हें विसरतात कीं सनातनीमतें कलीमध्यें केवळ दोन च वर्ण शिल्लक आहेत -ब्राह्मणा क्षत्रिया वैश्या शूद्रवर्णास्त्रयो द्विजा. । युगे युगे स्थिता. सर्वे, कलावाद्यंतयोः स्थिति ॥ तेव्हा ब्राह्मणेतर द्विज यानीं आणलें कोठून ? इतिहास याची साक्ष देत नाहीं. राजवाड्यानीं प्रतिपादिलेले ब्राह्मणेतर द्विजाचें विशिष्ट वेदाधिकार गेल्या साडेतीनशें वर्षांत रामदासी साम्प्रदायातील ब्राह्मणेतर द्विजात चालू असल्याचें दिसत नाहीं. राजवाडे ( ले. ३४ ) म्हणतात कीं, रामदासी साम्प्रदायात त्रैवर्णिक च असत, इतर नसत. येथें शंका अशी येते कीं, ब्राह्मणेतर द्विज ओळखण्याचें त्या कालीं काहीं गमक होतें काय ? आमच्या समजुतीप्रमाणें नव्हतें. सध्या जसें अमुक माणूस मराठा क्षत्रिय किंवा मराठा कुणबी असें निश्चित सागणें कठीण आहे, तो च प्रकार शिवकालीन होता. तेव्हा शिवकालीं रामदासी साम्प्रदायात शास्त्राच्या व्याख्येप्रमाणें असणारे द्विज होते व त्यास मर्यादित का होईनात पण काहीं वेदाधिकार होते व ते साम्प्रदायिक शिष्य व इतर हि बाहेरचे उपभोगित होते असें इतिहास सागत नाहीं. बाळाजी आवजी प्रभू श्रीसाम्प्रदायिक होते, तेव्हा राजवाड्याच्या म्हणण्या-प्रमाणें त्यास त्यानीं ठरविलेला वेदाधिकार असणार च. परंतु याच्या च घराण्यातील एका मुलाच्या मुंजीच्या बाबत केवढें रण माजलें होतें तें इतिहासज्ञास माहीत आहे च. तेव्हा ब्राह्मणेतर द्विजास काहीं वेदाधिकार होता हें राजवाड्याचें म्हणणें बरोबर नाहीं व तो तसा काहीं घराण्यात चालत आलेला दिसून येत नाहीं. प्रत्यक्ष छत्रपतींच्या घराण्यांत तो चालत आलेला दिसत नाहीं. तसें असतें तर कोल्हापूरचें

वेदोक्त प्रकरण माजलें च नसतें. शिवछत्रपतींचा वेदोक्त मन्त्रांनीं राज्याभिषेक ही केवळ अपवादात्मक घटना होती. तिच्या पाठीमागें प्रचंड राजकारण शिजत होतें. ह्मणून श्रीसमर्थांनीं तें घडवून आणलें ही गोष्ट खरी. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, श्रीसमर्थमतें ब्राह्मणेतर ( शूद्र वगळून ) द्विज होते. तेव्हा ' तया ब्राह्मण देहास पाहो । अधिकार वेदीं ' या श्रीवचनान्वयें सर्व ब्राह्मणेतर शूद्र च असावेत असें ठरतें.

राजवाड्यांनीं सां. वि. वि. भा. १ ले. ४४ यांत असें प्रतिपादन केलें आहे कीं, श्रीसांप्रदायांत एक हि विधर्मी नाहीं. "समर्थांच्या रामोपासनेंत असलेल्या विधर्म्यांचा गंध हि नाहीं." पण हें हि ह्मणणें चूक आहे. सां. वि. वि. भाग १ ला लेखांत ५० यांत श्री कल्याण स्वामींच्या महंतांची जी यादी प्रसिद्ध झालेली आहे तींत ४२ वे महंत वली महमद नांदणजकर यांचें नांव आहे. तेव्हां त्यांनीं जें प्रतिपादन केलें आहे कीं, श्रीसांप्रदायांत केवळ त्रैवर्णिक च असत व त्यांस वेदोक्त कांहीं अधिकार असत हें सर्व प्रतिपादन लंगडें पडतें. राजवाड्याचें प्रतिपादन गृहीत धरल्यास कशी आपत्ति ओढवते हें वरील प्रतिपादनावरून वाचकांच्या ध्यानीं आलें असेल च.

हें च प्रतिपादन श्री. दुर्गारामांच्या शंकेस उत्तर म्हणून आम्ही देतों. पण एवढ्यावर च त्याचें काम संपत नाहीं. त्यांनीं " ब्राह्मणांस वेदाधिकार आहे असें म्हटल्यानें इतर द्विजास तो नाहीं असें म्हटल्याचें ठरत नाहीं " या वाक्यानें आपणांवर केवढी जबाबदारी ओढवून घेतली आहे याची त्यांस जाणीव आहे काय ? सनातनी म्हणवून घेणाऱ्या त्यांच्या इतर समानधर्मीयांस हें त्यांचें मत मान्य आहे काय ? ब्राह्मणाप्रमाणें च इतरास निदान दोन वर्णांस ( हल्लीं हे दोन वर्ण त्यांच्या मतें शिल्लक असल्यास ) वेदाध्ययनाचा अधिकार आहे असें त्यांचें प्रामाणिक मत असल्यास व त्याप्रमाणें ते वागण्यास सिद्ध असल्यास मी माझीं बहुतेक सर्व विधानें मागें घेण्यास सिद्ध आहे हें त्यांनीं ध्यानीं धरावें. वरीलप्रमाणें विधान केल्यानें वैदिककालाच्या पद्धतीचे अनुयायी ते ठरत आहेत. पण आमच्या समजुतीनें अशा करण्यानें ते ' वदतो व्याघात ' दोष आपण होऊन च आपल्या माथीं घेत आहेत. कसें तें पहा. उपनिषदांकडे पाहिल्यास ब्रह्मविद्येचा उपदेश करण्यांत पुष्कळ वेळां क्षत्रिय च ब्राह्मणाचे गुरु झालेले आहेत असें त्यास दिसून येईल. परंतु आपल्या दुसऱ्या लेखात श्री. दुर्गाराम सर्व लोकाचे गुरु होण्यास ब्राह्मण च योग्य असें म्हणत आहेत, त्याची वाट कशी लावावयाची ? ब्राह्मणांनीं इतर वर्णांतील योग्य पुरुष पाहून त्यांस अनुग्रह द्यावा व त्यांच्याकडून तत्तज्जातीयांस देववावा इत्यादि जें त्यांनीं लिहिलें आहे तें कशाला ? आमच्या पहिल्या लेखातील आमची शंका अशी कीं, ब्राह्मणेतर हा ब्राह्मणाचा गुरु–पारमार्थिक गुरु होऊं शकत च नाहीं असें श्रीसमर्थमत हि दिसतें. तिचें उत्तर आपल्या दुसऱ्या लेखांत श्री. दुर्गाराम

देतात कीं, ब्राह्मणांकडून उपदेश घेऊन ब्राह्मणेतरांनीं आपापल्या जातीमध्यें महंती करावी, यास शास्त्राधार आहे व तो आधार आगम व तन्त्र ग्रंथ यांत आहे असें ते प्रतिपादित आहेत. याच्या उलट वेदाधिकार ब्राह्मणेतर द्विजांस आहे असें ते म्हणत आहेत. सर्वांस निदान त्रैवर्णिकांस वेदाधिकार होता त्या वेळीं, अमक्यानें अमक्याकडून च ब्रह्मविद्येचा उपदेश घ्यावा असा कडक निर्बन्ध व उच्चनीच भाव आधुनिक किंवा ऐतिहासिक कालाप्रमाणें नव्हता. श्री. दुर्गाराम उदारान्तःकरणानें तो अधिकार पूर्वीं प्रमाणें च निदान त्रैवर्णिकांस तरी देत आहेत. पण असें करण्यांत बाजू आपणावर च उलटत आहे हें त्यांच्या लक्षात आलें नाहींसें दिसतें. नाहीं. तर तन्त्रागम ग्रंथाधारें स्त्रिया व ब्राह्मणेतर यांच्या महंतींचें मंडण करण्यास ते उद्युक्त झाले च नसते. चिकित्सक वाचकांनीं याचा विचार करावा.

( १० ) **भिन्नकालीन प्रमाणें**:—आमची विवादवस्तु कलीयुगांतील. स्त्रिया व शूद्रादि यास गेलीं हजारों वर्षें समानतेनें निदान माणुसकीनें वागविण्यांत आलेलें नाहीं असें आमचें मत, तें चूक आहे हें सिद्ध करण्याचा प्रयत्न श्री. दुर्गाराम करीत आहेत वेद कालांतील आधारानें. यास काय म्हणावें हें च कळत नाहीं ! ब्राह्मणेतर किती हि पूज्य असला तरी तो ब्राह्मणांस वंद्य नव्हे असें आम्हीं " जरी ज्ञान जालें जनीं नीच याती " या करुणाष्टकांतील आधारानें म्हटलें आहे. श्रींचें हें म्हणणें त्यांनीं च केलेल्या संतनामावलीला विरुद्ध जात आहे. असें विरुद्धसें दिसणारें वर्तन श्रींचें कां असावें अशी आमची शंका. सनातनी कडून असें वर्तन केल्याचें आज हि दिसून येत नाहीं. तेव्हां असल्या सनातन्यांच्या मतें सनातनी असलेल्या श्रीसमर्थांनीं असें कां करावें असा प्रश्न. श्रींचें हें वर्तन आपल्या च वचनाविरुद्ध व शास्त्राविरुद्ध आहे. या आमच्या शंकेचें समाधान सनातनी शास्त्राधारें न करितां ऋग्वेदाच्या आधारें ( ऋ. १-२-२४ ) श्री. दुर्गाराम करीत आहेत. हें कितपत युक्त आहे हें तज्ज्ञांनीं च सांगावें. ही च चूक पुढें हि ते करीत आहेत. प्रसंगानें तें पुढें वाचकासमोर येत आहे च. आमचा सनातनी बांधवास कंठरवानें आग्रह असा कीं, ' चला परत वैदिक कालाकडे. पुरे झाला हा नाना मतांचा गलबला व हें खोट्या उच्चनीच भावांचें भांडण. ' पण लक्षांत कोण घेतो ?

( ११ ) **पतिरेव गुरुस्त्रीणाम्**:—पतिव्यतिरिक्त इतर गुरु स्त्रियांस करतां येत नाहीं व तें करणें इष्ट नाहीं, असा आमचा पूर्व पक्ष. हें आम्ही मागें च साधार सिद्ध केलें आहे. श्रीसमर्थांनीं हें शास्त्रविरुद्ध आचरण कां केलें ! श्री. दुर्गारामानीं याचें उत्तर पुढील प्रकारें दिलें आहेः—" यातिर्गुरु द्विजातीना वर्णानां ब्राह्मणो गुरुः । पतिरेव गुरुः स्त्रीणा सर्वेषा पार्थिवोगुरुः ॥ " असा आश्वमेधिक पर्वांतील ( अ. १०८ ) म्हणून श्लोक दिला आहे व म्हटलें आहे

थीं, " या श्लोकांतील एक च चरण देऊन धाकांनी वाचकांची दिशाभूल करण्याचा प्रयत्न केला आहे, पण या च श्लोकात स्त्रियास चार गुरु मिळाले." श्री. दुर्गारामांस आम्ही एक श्लोक सादर करतों —" गुरुरग्निर्द्विजातीनां वर्णानां ब्राह्मणोगुरुः । पतिरेको गुरु स्त्रीणां सर्वत्राभ्यागतो गुरुः ॥ " त्याच्या प्रमाणें वरील श्लोकाचा अर्थ केल्यास त्यानीं धरलेले चार व आमच्या श्लोकातील पण त्याच्या श्लोकात नसलेले नवे दोन, मिळून स्त्रियास एकंदर सहा गुरु झाले. त्यानीं दिलेला अर्थ बरोबर आहे किंवा कसें हें तज्ज्ञानीं पहावें. तसें च आम्ही आमच्या पहिल्या लेखात दिलेलीं स्मार्त प्रमाणें अधिक बलवत्तर कीं श्री. दुर्गारामाचें प्रमाण अधिक सबल, याचा हि त्यानीं विचार करावा. श्री. दुर्गारामानीं दिलेला अर्थ खरा मानून सुद्धा त्यास असें विचारावेसें वाटतें कीं, हे चार गुरु ( पतिव्यतिरिक्त ) आम्हीं ज्या अर्थानें ' पतिरेव गुरुस्त्रीणाम् ' असें सिद्ध केलें आहे, त्या अर्थानें स्त्रीचे गुरु होतात काय ? ऐहिक व पारमार्थिक, विशेषतः पारमार्थिक दृष्टीनें हे स्त्रियाचे गुरु होतात काय ? आपण केलेला अर्थ सदसद्‌विवेक बुद्धीस पटेल असा आहे काय ? वाचकांनीं याचा विचार करा.

दासबोधात श्रीसमर्थांनीं ५ × २ मध्यें अनेक गुरुंचें वर्णन केलें आहे. श्री. दुर्गारामास तें माहीत असून हि त्यानीं या ठिकाणीं वळें च आडरान घेतलें आहे. गुरु व सद्‌गुरु यांतील भेद ते जाणतात. वर जे दोन श्लोकात सागितले गेले आहेत ते गुरु आहेत. शास्त्रकारांनीं स्त्रियास सद्‌गुरु केवळ पति हा च सागितला आहे. आपल्या आश्वमेधिक श्लोकाचा अर्थ करताना शब्दच्छलाचा अवलंब त्यानीं कसा केला आहे तें वाचकांनीं पहावें.

" पतिरेव गुरु स्त्रीणाम् " या आमच्या आधाराचें समर्पक खंडण करण्या-सारखे आधार मनुयाज्ञवल्क्यादिस्मृति ग्रंथांत मिळत नाहींत असें पाहून श्री. दुर्गारामानीं तन्त्रागम ग्रंथांकडे धाव घेतली आहे व असें करण्याचें कारण ते हें देतात कीं, उपदेश, दीक्षा, गुरु इ. चें विवेचन करण्याचें स्थल स्मार्त ग्रंथ नसून आगमादि ग्रंथ होत. वाचकास हें म्हणणें पटत असल्यास आमचें कांहीं म्हणणें नाहीं.

आम्ही आमच्या विधानाच्या पुष्ट्यर्थ श्री श्रेष्ठाच्या ग्रंथाकडे धाव घेणार आहोंत. श्रेष्ठाची येोळवण आमच्या या रामदासी मित्रानीं कशी केली आहे तें वाचकानीं ११७ व्या पानावर पाहिलें च आहे. कौतुक वाटतें तें यांचें कीं, बाळंभट्ट धर्मसिद्धंकार, आत्माराम महाराज व श्रेष्ठ याचे जे जे म्हणून आधार आम्हीं दिलेले आहेत ते शास्त्रीय दृष्टीनें चुकीचे आहेत असें न ठरवितां श्री. दुर्गाराम आपण दिलेले आधार च प्रमाणभूत मानण्याचा आग्रह धरतात त्याचें ! बाकी श्रीमदाद्यशंकराचार्यांचा अर्थ चुकीचा ठरविणारे हे आमचे रामदासी मित्र असल्या मंडळीस थोडी च भीक घालणार म्हणा ! तरी पण आम्ही श्रीश्रेष्ठाचें

म्हणणें पुढें ठेवणार आहोंत. तन्त्रागमोक्त प्रमाण बलवत्तर कीं श्रेष्ठादि संतांचें तें वाचकांनीं ठरवावें. 'सुगमोपाय' नावाच्या त्याच्या ग्रंथांतील दुसऱ्या प्रकरणात श्रेष्ठ काय म्हणतात तें महाराष्ट्र संतवाङ्मयात सतत डुंबत राहणाऱ्या श्री पांगारकराच्या अधिकारी व तेजस्वी वाणीनें आपण ऐकू या —" चित्रींची कामिनी ही पाहों नये" तेथें एकात करणें हें काय । अनुग्रह कीं अधोगति ? स्त्रियावर अनुग्रह उर्फ उपदेश करावयाला जाणें हें अधोगतीचें लक्षण आहे । कोणी 'उच्छृंखळ' म्हणतील कीं, आम्ही स्त्रीपुरुष भेद जाणत नाहीं तर श्रेष्ठ विचारतात कीं, तुम्ही कलीचे दुर्बळ लोक वसिष्ठपराशराहून अधिक समर्थ व जितेंद्रिय आहात काय ? हा अपभ्रंशाचा म्हणजे पतनाचा मार्ग आहे. पतिव्रता स्त्रिया आपल्या पातिव्रत्य धर्मानें च उद्धरून जातात. त्याना पति हा च गुरु आहे. 'पतीदेव गुरुभर्ता' हें सतीचें लक्षण आहे. तिनें दुसरा गुरु करणें म्हणजे खोड्यात पडणें आहे । पूर्वापार आत्मज्ञानी आहेत व सुशील स्त्रिया हि आहेत पण 'परस्त्री प्रबोधपरंपरा ही कोणी कानीं ऐकिली हि नसेल । श्रेष्ठ म्हणतात का, क्वचित् एकाद्या जितेंद्रिय साधु पुरुषानें 'अनाथ व विरक्त विधवा स्त्रीला रामभजनाच्या मार्गाला लावलें च तर श्रीराम क्षमा करतो ! रामभजनानें गतभर्तृका तरल्याचें पुराणातरी आम्ही ऐकतों, पण सभर्तृका स्त्रिया आणि त्या हि पतिसेवेखेरीज अन्य मार्गानें तरल्या असें कोठें च ऐकिलें नाहीं. तात्पर्य, परस्त्रीला उपदेश करू नये.' यापुढें श्री. पांगारकरानीं "सांडूनि पति ईश्वरु । आणिक महानुभाव करी गुरु ।" तिला मुकेश्वरानीं सौरी म्हटल्याचें वचन दिलें आहे. ( म. वा. इतिहास भा. २ पा. २११ ) हा उतारा व श्री दुर्गारामानीं दिलेला आगमोक्त उतारा यातील तारतम्य पाहून वाचकानीं आपला निर्णय ठरवावा.

श्रीसमर्थ सांप्रदायात शेंकडों नव्हेत तर हजारों स्त्रिया होत्या असें वर्णन गिरिधरानीं 'प्रतापा' त केलें आहे. 'सहस्त्रावधि चालती वधुजनें ।' ( प्र. २० × ३९ ) यांत सुवासिनी आहेत व विधवा हि आहेत. वाचकांनीं तीं श्रीसमर्थचरित्रांत पहावींत.

**( १२ ) स्त्रियांची महंतीः—** आतां स्त्रियांची महंती, म्ह. स्त्रीपुरुषांस अध्यात्माचा उपदेश करून त्याचे गुरु व्हावें किंवा नाहीं, या बद्दल लिहूं इतरास ज्ञानोपदेश करून गुरु होण्याचा अधिकार स्मृति ग्रंथात दिसून येत नाहीं. श्रीसमर्थानीं तसा अधिकार आपल्या स्त्रीमहंतांस कमा दिला । हें शास्त्रविहित आहे काय ? ही आमची शंका. तन्त्रागमग्रन्थाधारें श्री. दुर्गाराम तो देता येतो असें "सद्गुरु हे त्या त्या जातींत श्रेष्ठ अधाना पाहून च त्यांवर अनुग्रह करितात, तसें च, त्यास अनुज्ञा देऊन त्यांकडून इतर तज्जातीयाना दीक्षा देववितात अथवा स्वत हि देतात, एका आगमोक्त श्लोकाधारें म्हणतात पण या श्लोकात एक गोष्ट स्पष्ट नाहीं, ती ही कीं, 'तत्तज्जातीय' याचा अर्थ स्त्रियानीं स्त्रियाना च केवळ उपदेश द्यावा

किंवा आपल्या जातींतील पुरुषाना सुद्धां, ही गोष्ट स्पष्टपणें कळत नाहीं हें झालें श्री दुर्गारामाचें मत आता मन्वादि अष्टादश स्मृतींचें अध्ययन झालेले श्रेष्ठ यासंबधीं आपल्या सुगमोपायाच्या दुसऱ्या प्रकरणाच्या प्रारंभीं पुढील ओवीनें " *स्त्रिया आणि हीन वर्ण । तेथें गुरुत्व चि नाहीं ॥* " असा आपला स्पष्ट अभिप्राय देतात तो वाचकांनीं आपल्याशीं च पडताळावा.

स्त्रियाना कोणाचे हि गुरु होता येतें याबद्दल श्री दुर्गारामानीं अध्यात्म-रामायणातील ' रामहृदया ' तील श्लोक उद्धृत केले आहेत व त्यात श्रीसीता देवींनीं श्रीमारुतिरायास उपदेश केल्याचें ते सागत आहेत उपदेश श्रीसीतादेवींनीं केला असेल, आम्हीं नाहीं कोठें म्हणतों पण तो पारमार्थिक गुरुशिष्य या नात्यानें केला आहे काय ? श्री मारुतिरायाचे गुरु श्री रामचन्द्र असें साप्रदायात प्रसिद्ध आहे ना । का श्री सीतादेवी ?

श्री दुर्गादासाच्या समजुतीसाठीं त्यांचें म्हणणें क्षणभर मान्य करूनसुद्धा वाचकास आम्ही सागतों कीं, ' स्त्रियांसुद्धा गुरु होऊं शकतात ' या त्याच्या विधानाच्या पाठींराखीसाठीं उदाहरण धुंडण्यास त्यास कलियुग सोडून पुराकल्पांत उड्डाण मारावें लागलें आहे. श्री दुर्गारामांनीं कलीयुगातील ऐतिहासिक कालातील एक तरी उदाहरण (स्त्री गुरु असल्याचें) सनातनी समजल्या गेलेल्या साम्प्रदायातल या संबधींचें दाखवावें. ' आहुरप्युत्तम स्त्रीणामधिकार तु वैदिके ' या स्थानीं उद्धृत केलेल्या वचनानुसार स्त्रियांस वेदविद्येचा अधिकार दिला गेल्याचीं कितीशीं उदाहरणें त्यास या युगात आढळलीं येतें ? पण कृत युगींचा हा पोवाडा श्रीसमर्थांनीं या कलियुगीं आपल्या सामर्थ्यानें वर्तविला भगवान् श्रीकृष्णानतर श्रीसमर्थांशिवाय स्त्रियांच्या उद्धाराचें हें असलें अचाट कृत्य दुसरें कोणी केलेंतें श्री. दुर्गारामानीं आम्हास दाखवावें म्हणून आम्ही आपल्या पहिल्या लेखात श्रीसमर्थांनीं ही समाजात अभूतपूर्व सुधारणा केली व ती समाजाच्या गळीं उतरविली असें म्हटलें यात काय बिघडलें येतें ? स्वामी विवेकानन्दानीं हिंदुस्थानातील दोन अनिष्ट गोष्टींचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे —In India, there are two great evils, Trampling *on the women and grinding the poor through* caste-restrictions. म्हणजे हिंदुस्थानात दोन अत्यत वाईट गोष्टी आहेत. एक स्त्रियांस पायांखालीं तुडविणें व दुसरी गरीबास जातिनिर्बंधाखालीं भरडणें, या दोन श्रीसमर्थकालीं ही च परिस्थिति होती त्यानीं सुधारण्याचा विश्वप्रयत्न केला. म्हणून आम्ही म्हणतों कीं, त्यांनीं कलीचें कृतयुग केलें तें कसें केलें हा आमच्या आवडी एक नियमाचा विषय होय. विषयातर होईल म्हणून आवरतें घेतों. शेवटी या कृत्यास कलीयुगास लागू असणाऱ्या शास्त्राचा पाठिंबा नव्हता. तरी त्यांनीं तें केलें. तें शास्त्रविरुद्ध झालें नाहीं काय ?

( १३ ) स्त्रियांचें पापयोनित्वः— शास्त्रकारांनीं स्त्रियांस ' पापयोनि ' म्हटलें असें आम्हीं गीतेच्या व त्यावरील शांकर भाष्याच्या आधारें आमच्या दुसऱ्या लेखांत सिद्ध केलें आहे. श्री. दुर्गारामांचें मत असें कीं स्त्रियांचें पापयोनित्व शास्त्रसंमत नाहीं. भाष्यकार श्रीशंकराचार्यांचा अर्थ श्रुतीस विरुद्ध जातो अतएव तो चूक आहे व आपण केलेला अर्थ बरोबर आहे. तसें च आपल्या अर्थाप्रमाणें च श्री ज्ञानेश्वर, श्री रमावल्लभदास, वामन पंडित, तसें च आधुनिकांपैकीं लो. टिळक, सातवळेकर प्रभृतींनीं हि अर्थ केला आहे, असें त्यांचें म्हणणें आहे. तेव्हां त्यांचा अर्थ व त्यांनीं केलेलीं विधानें शास्त्र, युक्ति व सत्य यांस कितपत धरून आहेत हें पंहावयाचें आहे. ज्या श्लोकांत तो ' पापयोनि ' शब्द आला आहे तो असाः— मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपिस्युः पापयोनयः । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपियान्ति परांगतिम् ॥ गी. ९ × ३२ भाष्यकारांचा अर्थः— हे पार्था, आश्रय या नात्यानें माझें अवलंबन करून रहाणारे पापयोनीमध्यें जरी जन्माला आलेले असले तरी त्यांना हि उत्कृष्ट गति प्राप्त होते; पापयोनीमध्यें जन्मास येऊन उत्कृष्ट गतीला जाणारे कोण ही शंका येऊं नये म्हणून स्त्रियोवैश्यास्तथाशूद्राः असें म्हटलें आहे.

*श्री. दुर्गारामांचा अर्थः— हे अर्जुना ! जे कोणी पापयोनि म्हणजे श्वान,* डुकर, चांडाल वगैरे योनि असतील, तसें च स्त्रिया, वैश्य व शूद्र ते हि माझ्या आश्रयानें उत्तम गतीतें पावतात.

श्रीमदाचार्यांनीं ' पापयोनयः ' हें पद स्त्रियोवैश्याः इ. चें विशेषण घेतलें आहे, तर श्री. दुर्गाराम तें विशेष्य समजून व तें स्वतन्त्र पद घेऊन त्याचा अर्थ कुत्रीं, डुकर व चाण्डाळ इ. घेतात व त्यास श्रुतीचा आधार आहे अशी कल्पना करतात. ती श्रुति ' *तद्य इह रमणीयचरणा अभ्याशोह यत्ते रमणीयां योनिमापद्येरन् ब्राह्मण योनिं वा, क्षत्रिय योनिं वा वैश्य योनिं वा, अथ य इह कपूयचरणाः अभ्याशोह यत्ते कपूय योनिमापद्येरन् श्वयोनिं वा, सूकरयोनिं वा, चांडालयोनिं वा ॥ ' छां. ५×१०×७ ॥* ही होय. या श्रुतीमध्यें पुण्याचरणानें पुण्ययोनि प्राप्त होत असून पापाचरणानें पापयोनि प्राप्त होते असें सांगितलें आहे. तेव्हां उत्कृष्टत्व *पुण्यमूलक असून निकृष्टत्व पापमूलक होय या विषयीं शंका नाहीं. अशा दृष्टीनें* पाहिल्यास ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या अपेक्षेनें स्त्रियादिकांची गणना पापयोनींत केली जाणें यांत कांहीं-च दोष नाहीं. ( श्रीसमर्थांच्या ' *जरी ज्ञान जालें जनीं नीच याती* ' या ओळींत हा च अर्थ अभिप्रेत आहे ). प्राक्तनकर्म व उपनयनादींचा अभाव हीं च स्त्रियादिकांच्या पापयोनित्वाचीं कारणें होत. म्हणून च ' पापयोनयः ' या पदाचा संबंध ' स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः ' या पदांकडे आचार्यांनीं लावून दाखविला आहे व तो तसा च असणें योग्य आहे. श्री. दुर्गाराम यांनीं ' पापयोनिः ' पदाचा अर्थ श्वान सूकरादि केला आहे. पण तो चुकीचा आहे. कारण ' पापयोनयः '

या पदाचा संबंध स्त्रियादिकांकडे नसून चांडाळ अथवा पशू इत्यादिकडे असा असेल तर ' स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः ' हा चरण च व्यर्थ होऊं लागेल. कारण, पापयोनीमध्यें जन्मास आलेले पशुप्रभृति प्राणी हि जर माझ्या आश्रयानें उत्कृष्ट गतीला जातात तर पुण्ययोनीमध्यें जन्माला आलेल्या ब्राह्मणादिकांची गोष्ट कशाला पाहिजे इतकें झाल्यानें च निर्वाह होत आहे. ' स्त्रियो वैश्यास्तथाशूद्राः ' या चरणाची आवश्यकता च नाहीं. तेव्हां श्लोकपादवैयर्थ्य हा दोष या ठिकाणीं येत असल्यानें श्री. दुर्गारामांचा अर्थ ग्राह्य धरतां येत नाहीं. व्याकरणदृष्ट्या हि त्यांचा अर्थ दुष्ट आहे. कसा तो पहा. ' ये पापयोनयः तेऽपि परांगतिंयान्ति किंपुनः पुण्याः ब्राह्मणाः च भक्ताः राजर्षयः ' म्हणजे जे पापयोनि ते परगतीला जातात. मग पुण्यवान् ब्राह्मण व भक्त क्षत्रिय या विषयीं काय सांगावें ? इतका अर्थ स्पष्ट असल्यावर पापयोनि कोण हें उघड होतें, शिवाय यत् व तत् या सर्वनामांचा नित्य संबंध असतो. तेव्हा ' ये ' पदाचें स्पष्टीकरण ' स्त्रियो वैश्यास्तथाशूद्राः ' या शब्दानीं केलें आहे. असा सरळ अर्थ वरील श्लोकाचा होत आहे. श्री. दुर्गारामाचा अर्थ चूक आहे. आम्हीं वर गृहीत धरलेल्या अर्थास पोषक असें प्रमाण आश्वमेधिक पर्वांत आहे. त्यात वरील श्लोक अगदीं थोड्या शब्द फरकानें आला आहे. त्यात ' पापयोनिः ' कोण हें स्पष्ट च सांगितलें आहे.

श्री. दुर्गारामांचा अर्थ स्वीकारण्यात आणखी एक अडचण उपस्थित होते, ती अशी कीं, भगवद्‌भक्तीच्या प्रभावामुळें कुत्री, डुकरें इ. पशु हि उत्कृष्ट गतीला जातात असें जें ते प्रतिपादितात त्यावरून उत्कृष्ट भक्ति करण्याचें ज्ञान श्वान-शूकरादिकाना आहे असें ते गृहीत धरीत आहेत. असें जर असेल तर नरजन्माचे इतके पोवाडे गाण्याचें कारण ब्रह्मवेत्त्याना का पडलें ? श्री. दुर्गारामांच्या डोळ्यांपुढें ग्रंथराजाचा १ × १० हा समास आहे ना ? त्यात श्रीसमर्थांनीं नरदेहाच्या अपूर्वतेस धन्यवाद देऊन ' वरकड देहे ( पशुपक्ष्यादि ) वावाड । नरदेहे मोठें घवाड । ' असें म्हटलें आहे ना ! भगवान मनूंना हि ' भूतानां प्राणिनः श्रेष्ठा. प्राणिना बुद्धिजीविनः बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठाः ' इ. लिहिण्याचें कारण तरी काय होतें ? श्रीसमर्थांनीं तरी ' पशुदेहीं नाहीं गति । ऐसें सर्वत्र बोलती । ' दा. १० × २१ हें तरी कशाला लिहिलें ? याचा विचार श्री. दुर्गारामानीं करावयास नको काय ? पशुपक्ष्यांस विचार करून साधन-भक्ति करण्याचें सामर्थ्य असतें तर श्रीभगवंतांनीं ' मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ' या ऐवजीं ' प्राणिनां हि सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ' असें म्हटलें असतें. सारासार विचार करण्याची शक्ति व पात्रता हा च नरदेहाचा विशेष. तें सामर्थ्य तिर्यग्योनीमध्यें नाहीं. म्हणून तर पुरुषार्थ साधून देणाऱ्या या नरदेहाला ' दुर्लभं मानुषं जन्म । किंवा दुर्लभो मानुषो देहो देहिनां

क्षणभङ्गुरः।' अथवा श्री समर्थांनीं ग्रंथराजांत उद्धृत केलेलें नृदेहमाद्यं सुलभंसुदुर्लभम् इ. वचन तसें च लिब्ध्वा सुदुर्लभमिदंबहुसंभवान्ते। मानुष्यमर्थदमनित्यपीह धीरः॥ इ. वाक्यानीं भागवतकारानीं गौरविलें आहे, तें यथार्थ च आहे. महाभारतकाराना तर भागवतकाराच्या पुढें जाऊन ओव्हर बाउंडरी च मारली आहे श्रुतीचा आधार देऊन 'पापयोनिः' म्हणून श्री. दुर्गारामानीं ज्या चाण्डाल योनीचा उल्लेख केला आहे, त्या योनीमध्यें सुद्धां जन्म घेणें बरें, पण मानुष्य मिळालें पाहिजे, असा महाभारतकाराचा अभिप्राय आहे — 'चण्डालत्वेऽपि मानुष्यं सर्वथा तात शोभनम् १२×२७×३१' यावर कदाचित् श्री. दुर्गाराम श्री समर्थांचीं 'अहिल्या शिळा राघवें मुक्त केली।' अथवा 'नामें पाषाण तरले।' असलीं वाक्यें आमच्या वरील प्रतिपादनास विरुद्ध जातात म्हणून पुढें आणतील. पण ते असलें साहस करणार नाहींत असें वाटतें. ते जाडे संस्कृतज्ञ आहेत. तेव्हां शास्त्रीय प्रणालीप्रमाणें असल्या वाक्याचा अर्थ काय करावयाचा हें ते जाणतात च अशी आमची खात्री आहे.

वरील विवेचनावरून श्री. दुर्गारामाचा 'मा हि पार्थ' इ. श्लोकाचा अर्थ कसा चूक आहे व भाष्यकार च कसे बरोबर आहेत तसें च स्त्रियाचें 'पापयोनित्व' हें त्याच्या प्राक्तनामुळें अनुपनीतत्वमूलक वेदाभ्यासाच्या अनधिकारत्वामुळें प्राप्त झालेलें आहे, हें हि वाचकाच्या लक्षात येईल.

यावर अशी शंका येण्याचा संभव आहे कीं, स्त्रिया 'पापयोनि' आहेत हें मान्य. पण मग त्याच्या जोडीला त्या च श्लोकात वैश्य का बसविले गेले! वैश्य त्रैवर्णिकापैकी असल्यानें ते ब्रह्मविद्येचे अधिकारी आहेत ना! अशी शंका प्रतिपक्षीयाकडून येणें अगदीं संभवनीय आहे. यास उत्तर श्री. दुर्गारामानीं उद्धृत केलेल्या श्लोकार्धांत च आहे. 'आहुरप्युत्तमस्त्रीणामधिकारं तु वैदिके' हा तो श्लोकार्ध होय. याचा अर्थ 'श्रेष्ठ स्त्रियास प्राचीन काळीं वेदाधिकार होता' असा आहे. पद्मपुराणात हि हा च श्लोक आलेला आहे. वृद्ध मनूचें म्हणून एतत्संबंधीं पुढील वचन आढळतें:—

पुरा कल्पेतु नारीणा मौञ्जीबंधनमिष्यते। म्हणजे 'पूर्वीच्या युगात स्त्रियाचें मौञ्जीबंधनादि संस्कार असत.' यात वरील वेदाधिकार स्त्रियास सर्रास होता असें म्हटलें आहे. हारीताचें मत स्त्रियास सरसकट वेदाधिकार — मौञ्जीबंधन, होमहवन, वेदाध्ययन इ. — होता असें आहे —'द्विविधाः स्त्रियो ब्रह्मवादिन्यः सद्योवध्वश्च। तत्र ब्रह्मवादिनीनामुपनयनमग्नीन्धनं वेदाध्ययनं स्वगृहे भिक्षाचर्येति। सद्योवधूना तूपस्थिते विवाहे कथंचिदुपनयनमात्रं कृत्वा विवाहः कार्यः।' या सर्व वचनाचें तात्पर्य हें कीं, स्त्रियास सुद्धा त्रैवर्णिकाप्रमाणें वेदविद्येचें अध्ययन करिता येत होतें. पण हा त्याचा अधिकार गीताकाळीं किंवा तत्पूर्वी हिरावून घेण्यात आला असावा. तसा च तो गीता काळीं वैश्याचा हि काढून घेण्यांत आला असला

पाहिजे, हें गीतेच्या ' मां हि पार्थ ' इ. श्लोकावरून स्पष्ट आहे. म्हणून च स्त्रियांबरोबर त्यांना हि ब्राह्मणक्षत्रियांच्या सापेक्षतेनें ' पापयोनि ' गणलें गेलें असलें पाहिजे हे उघड सिद्ध होत आहे. आमच्या या मतासारखें च कै. गीतावाचस्पति सदाशिव शास्त्री भिडे यांचें हि मत आहे. श्री. दुर्गारामानीं त्यांची ' गीतार्थ-रहस्य-दीपिका ' पहावा.

शूद्रांना हि एके काळीं ब्रह्मविद्येचा अधिकार होता याबद्दलचीं वचनें श्रुतिस्मृतींत सांपडतात. पण प्रस्तुत प्रकरणीं त्याचा संबंध नसल्यानें आम्ही तिकडे वळत नाहीं. जाता जातां श्री. दुर्गारामांस विनवितों कीं, त्यांनीं पुढे केलेल्या श्रुतींतील 'चाण्डालयोनी' चा अर्थ, आमचे एका काळीं विश्वविद्यालयातील संस्कृतचे अध्यापक पूज्य श्री महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक यानीं आपल्या ' अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ ' या पुस्तकाच्या पांचव्या प्रकरणीं काय केला आहे तेवढा कृपा करून वाचावा.

आतांपर्यंत ' पापयोनय ' हें पद विशेषण धरावें कीं विशेष्य धरावें, विशेष्य धरल्यास तें कसें चूक आहे व त्याचा अर्थ श्वानरासभादि केल्यास अर्थाचा अनर्थ कसा होतो याचें विवरण झालें. आता श्री. दुर्गारामानीं ' पापयोनय ' या पदाच्या आपल्या अर्थाच्या पुष्टीकरणासाठीं श्रीज्ञानेश्वरादि ऐतिहासिक कालातील टीकाकार व लो. टिळकादि आधुनिक कालातील टीकाकार, याचा जो हवाला दिला आहे, त्याचा परामर्श घेऊ प्रथमत च अगदीं प्रांजलपणें श्री. दुर्गारामांस सांगतों कीं, 'पापयोनय ' या पदाचा अर्थ त्यांच्यासारखा सर्वस्वीं मधुसूदन सरस्वती, श्रीधरस्वामी यानीं कसा आहे. श्रीज्ञानेश्वर, रमावल्लभ हे ' पापयोनीं ' त पशुपक्ष्यादिकांची तशीच स्त्रिया-दिकांची गणना करतात. लोकमान्य इ. ' पापयोनय ' हे स्वतन्त्र विशेष्य मानून अर्थ करतात हें जरी खरें आहे, तरी हे आधुनिक टीकाकार त्या पदाचा अर्थ पशुपक्ष्यादि असा कोणीहि करीत नाहींत तेव्हा त्यांनीं केलेलें विधान, आमच्या अर्थाप्रमाणेंच श्रीज्ञानेश्वरादि व लोकमान्यादि टीकाकारानीं अर्थ केला आहे हें सर्वस्वीं सत्यास धरून नाहीं. कसें तें आपण पाहू या प्रथम श्री ज्ञानेश्वराकडे वळू या ठिकाणीं श्री. दुर्गारामांस अत्यंत विनयानें सांगावेसें वाटतें कीं, मस्करीय माझ्या सबंधींच्या अध्ययनाध्यापनाच्या संबंधात त्यानीं जे आत्मविश्वासाचे शब्द काढले आहेत तेच शब्द आम्ही ज्ञानेश्वरांच्या ग्रंथसबंधीं काढू शकतों ज्ञानेश्वरी आम्हांस बरीचशी कंठगत आहे तिच्याशीं आमचा गाढ परिचय आहे. आमचें या ग्रंथाचें अध्ययनाध्यापन सतत चालू असतें. तेव्हां ' पापयोनय ' या पदाचा अर्थ त्यांनीं काय केला आहे हें मला पूर्ण माहीत आहे पहा बरें! महाराज या श्लोकावरील आपल्या भाष्यात काय म्हणतात तेः—

' अगा नांवें घेतां वोरटीं । जे आघवे या अधमाचिये शेवटीं ।
तिये पाप योनीं हि किरीटी । जन्मले जे ॥ ९×४०३
पां स १९

ते पापयोनी मूढ । मूर्ख जैसे कां दगड ।
परि माझ्या ठायीं दृढ । सर्व भावें ॥

जयांचिये वाचे माझे आलाप । दृष्टी भोगी माझें विरूप
जयांचे मन संकल्प । माझा चि वाहे ॥

... ... ... ... ... ...
... ... ... ... ... ...

जैसे तंव चि वहाळ वोहळ । जंव न पवती गंगाजळ ।
मग होऊन ठाकती केवळ । गंगारूप ॥ ९ × ४५८

... ... ... ... ... ...

तैसे क्षत्रिय वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ।
जाति तंव चि वेगळिया । जंव न पविती मातें ॥ ९ × ४६०

वाचकांनीं या श्लोकावरील महाराजांचें सर्व भाष्य फार काळजीपूर्वक वाचावें व मग ठरवावें कीं, 'पापयोनयः' याचा अर्थ श्री. दुर्गाराम समजतात तसा आहे कीं, आम्ही म्हणतों त्याप्रमाणें आहे. श्री. दुर्गारामांचें लक्ष वरील शेवटच्या ओंवीकडे आम्ही वेधूं इच्छितों. ती त्यांनीं ध्यानपूर्वक पहावी. त्यांत ' क्षत्रिय ' शब्द आला आहे. त्याला महाराजांनीं वैश्य, स्त्रिया, शूद्र, अंत्यजादिकांच्या पंक्तीस बसविलें आहे, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. ब्राह्मणांचा उल्लेख या ओंवींत नाहीं, हें हि लक्षांत घेण्याजोगें आहे. ' मां हि पार्थ ' इ. श्लोकावरील या ओंव्या होत. या श्लोकांत ' क्षत्रिय ' शब्द नाहीं. या श्लोकाच्या पुढील श्लोकांत पुण्यवान् ब्राह्मण व भक्त क्षत्रिय यांचा स्पष्ट निर्देश गीताकारांनीं केला असतांना सुद्धां व ज्ञानेश्वरांनीं आपल्या भाष्यांत त्यांचा गौरवपूर्व उल्लेख केला असतांना सुद्धां, वरील ओंवींत ( ९×४६० ) क्षत्रियांचा मात्र तेवढा उल्लेख करून त्यांस स्त्रीशूद्रादिकांच्या पंक्तीस ओढलें आहे व ब्राह्मण मात्र वगळले आहेत. यांतील रहस्य काय असावें? विचार करणारांस तें सहज कळून येईल इतकें तें ' प्रगट गुप्त ' आहे. श्री. दुर्गारामांनीं दिलेल्या ' आहुरप्युत्तमस्त्रीणामधिकारंतु वैदिके ' याचें व आम्ही हि वर वृद्धमनु व हारीत यांच्या वचनांचें वाचकांस स्मरण देतों. प्रथम स्त्रियांस ब्रह्मविद्येचे अनधिकारी ठरविलें गेलें, नंतर वैश्यांस ती बंदी झाली. त्यानंतर ज्ञानेश्वरकालापर्यंत क्षत्रिय हि ब्रह्मविद्येचे अनधिकारी समजले गेले असले पाहिजेत असें ओंवी ९×४६० ही दाखविते. आपमतलबी अधिकारारूढ मंडळींनीं–शास्त्रकारांनीं–पहिला जुलूम अन्त्यजांवर ( शूद्रांवर ) केला, नंतर त्यांची दृष्टि स्त्रियांकडे वळली, मग वैश्य त्यांच्या तडाख्यांत सांपडले, शेवटीं तर ' नन्दान्तं क्षत्रियकुलं ' या वटहुकुमानें त्यांनीं क्षत्रियांची वाट लावली व शेवटीं भस्मासुराप्रमाणें आपली गत

करून घेतली. असो. " पापयोनय " या पदाचा अर्थ व परंपरा आपण ज्ञानेश्वरांच्या शब्दात पाहिली व निष्कर्ष हि बघितला.

' भावार्थ दीपिका ' कारानंतर आतां आपण ' यथार्थ दीपिका ' कार वामन पंडित यांच्या पांडित्याकडे वळू व ते श्री. दुर्गाराम यांस कितपत साहाय्य देतात तें पाहू " मां हि पार्थ " इ. श्लोकाच्या आधींच्या श्लोकाच्या भाष्याच्या शेवटीं पंडित ह्मणतात

" दुराचार सत्कुल प्रसूत । त्या भक्ताचे विषयीं ऐसें बोलला देवकीसुत ।
आतां कुळें करून नीच बहुत । ते हि स्वभक्तीनें तरती ह्मणतो या श्लोकीं ॥
य दी. ९X१७७१

या श्लोकीं ह्मणजे ' मां हि पार्थ ' इ श्लोकीं. याच्यावरील पुढील ओंव्या पहा —

' अर्जुना जे असती पापयोनी । ते हि माझ्या आश्रयें करूनी ।
परम गतीतें पावती या वरूनी । पाहें अधिकार माझ्या भजनाचा ॥
चांडाळादि अधम जाती । जरी माझाच आश्रय धरिती ।
कीं तारक आह्मास एक श्रीपती । तरी ते हि परमगती पावती अर्जुना ॥
तैशाच गा अर्जुना स्त्रिया । सत्कुल प्रसूता हि मूर्तिमंत माया ।
असत्य–साहस–अतिलोभादि धनंजया । दुर्गुण जयांचे माहेर ॥
दुर्गुण पुरुषास हि असती । परि स्त्रिया खाणी च दुर्गुणाच्या दिसती ॥
पति पुत्र पिताहि वंचिती । सहज कनिष्ठ स्वभाव स्त्रियांचा ॥
स्त्रिया ऐशा वाईट परी । इ इ.

पंडिताच्या भाष्यांतील ' सत्कुलप्रसूता हि ' या विशेषणाकडे पूर्ण ध्यान देऊन सुद्धा आह्मी श्री दुर्गारामांस विचारतों कीं, पंडित कोणाच्या मताचे ठरतात ?

' पापयोनि ' या पदाचा असा च विचार, श्री. दुर्गारामांनीं आपल्या बाजूचे ह्मणून दिलेल्या प्रत्येक ग्रंथकाराच्या आधारें लिहू लागलों तर, विस्तार अतिशय च होईल. ' स्थालीपुलाकन्याया ' नें वाचकांनीं काय तें समजावें. त्यांच्या मताचे कोण व किती आहेत व त्यांचीं मतें कोठवर मान्य धरतां येईल, याचें विवेचन वर केलें च आहे.

द्वैतमतवाद्यांनी सुद्धा आपणां सारखा च ' पापयोनय ' या पदाचा अर्थ केल्याचे श्री. दुर्गाराम वाचकांस भासवीत आहेत, त्याचा थोडा समाचार घेऊ व तें त्यांचें विधान कसें धाडसाचें व कितपत सत्यास धरून आहे तें पाहू ? द्वैतमतप्रस्थापक श्रीमन्मध्वाचार्य आपल्या ' तात्पर्य निर्णय ' नामक गीतेच्या टीकेंत ' मां हि पार्थ ' इ श्लोकासंबधीं आपल्या मताप्रमाणें प्रथम पुष्कळ ऊहापोह करून शेवटीं असें ह्मणतात कीं, " ये पापादियोनयो ऽस्वाभाविका स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रा ब्राह्मणा राजर्षयश्च ते ऽपि यान्ति परां गतिम् इ । " या ठिकाणीं या आचार्यांनीं ' पापयोनय. ' हें विशेषण च घेतलेलें आहे हे दिसून येईल.

आतां श्रीमध्वाचार्यांच्या खालोखाल या संप्रदायांत ज्यास मान आहे त्या श्रीराघवेन्द्र यतींच्या 'गीता विवृतींतील' या श्लोकावरची टीका पहा:—

हे पार्थ! पापयोनयः स्वयमुत्तमवर्णाः अपि पापहेतुका योनिर्जन्म येषां ते पापयोनयः। ते क इत्यत उक्तं स्त्रिय इत्यादिना। या टीकेंतील 'स्वयमुत्तमवर्णाः' हें पद गाळलें कीं, बाकीचें भाष्य श्रीशांकरभाष्याशीं किती जुळतें आहे, तें वाचकांनीं पहावें. यांतहि 'पापयोनयः' हें पद विशेषणच घेतलें गेलें आहे.

आतां या द्वैती सांप्रदायिकांनीं या श्लोकाचा जो अर्थ केला आहे तो पाहिल्यास श्री. दुर्गारामांस असें आढळून येईल कीं, त्यांच्यांत व आपल्या अर्थांत, थोडें थोडकें नव्हे, तर आकाशपाताळाचें अंतर आहे. त्यांस द्वैतमतवादी आपल्या बाजूचे आहेत असें वाचकांस भासविण्याची अवदसा कां आठवली कोण जाणें!

इतकें विवेचन 'पापयोनयः' या पदाच्या अर्थासंबंधीं झाल्यानंतर पुनः आमच्या बाजूच्या टीकाकारांचीं आणखी कांहीं नांवें पुढें आणण्याची आवश्यकता उरली नाहीं. तरी पण आधुनिकांपैकीं दोन तीन नांवें देतों. प्रो. भानु, महाभारताचे भाषांतरकार (चिपळूणकर प्रत) सर्वस्वीं आमच्याच मताचे आहेत. श्री. पांगारकरांचें मत त्यांच्या च शब्दांत देतों. भगवद्भक्त कान्होपात्रा हिच्याबद्दल लिहितांना ते म्हणतात, "वेश्येची मुलगी म्हणून समाजानें तिची हेळणा केली नाहीं. तिच्या गुणांचा गौरव करून तिला मंदिरांत स्थान दिलें व भक्तमंडळांत तिची गणना केली. माझा आश्रय करणारे पापयोनि असले तरी ते परमगति पावतात, ह्या भगवंताच्या उक्तीची (गी. ९ × ३२) येथें सार्थकता झाली. 'आचवेया अधमाचे शेवटीं पापयोनी' मूढ असले पण माझ्या ठायीं दृढ राहून 'सर्वभावें भरले' म्हणजे तरतात, 'भक्ति गा येथ सरे। जाति अप्रमाण' इ. (म. वा. इ. भा. २ पा. ९२) श्री. दुर्गारामांचें या विस्तृत विवेचनावरून 'पापयोनयः' कोण याबद्दलचें समाधान होईल काय?

**(१४) स्त्रियांना ब्रह्मविद्येचा अधिकार आहे किंवा नाहीं:**—या प्रश्नाचें उत्तर सनातनी शास्त्राधारें स्त्रियास तो अधिकार नाहीं, श्री समर्थांनीं तो दिला होता, हें त्यांचें करणें शास्त्रास विरुद्ध जातें व श्रीसमर्थ तर सनातनीमतें कट्टर सनातनी, तेव्हां हें असें कां, ही आमची शंका. यावर आपल्या दुसऱ्या लेखांत श्री. दुर्गाराम उत्तर देतात कीं, "स्त्रियांना ब्रह्मज्ञानप्राप्त्यर्थ शास्त्रांचा प्रतिबंध गार्गी, मैत्रेयी इ. ब्रह्मवादिनींच्या काळाप्रमाणें आज हि पण नाहीं." पुनरुक्तिदोष पत्करून पुनः याबद्दल येथें थोडें लिहितों. श्री. दुर्गारामांचें हें वाक्य वाचून आह्मांस झालेला आनंद वर्णनातीत आहे. निधड्या छातीनें त्यांनीं हें सांगितलेलें पाहून त्यांचें करावें तेवढें कौतुक थोडें च होणार आहे. वर "ब्राह्मणांस वेदाधिकार आहे, असें ह्मटल्यानें इतर द्विजांस तो नाहीं असें ह्मटल्याचें ठरत नाहीं" असें त्यांचें वाक्य येऊन गेलें आहेच. यांत वरील स्त्रियासंबंधीचें वाक्य घातल्यानें पुढील अर्थ विशद

होतो तो हा कीं, श्री. दुर्गाराममतें स्त्रिया व ब्राह्मणेतर द्विज यांस आज हि प्राचीन वैदिककाल किंवा सत्ययुग, पुराकल्प, ज्यास ह्मणतात त्यामध्यें जसा होता, तसा आहे वर एके ठिकाणीं जें लिहिलें आहे, तें च पुन लिहितों. श्री. दुर्गारामाचें प्रामाणिक मत असें असल्यास मी माझा वरीलचर्शी विधानें परत घेतों. पण हें त्याचें तत्व इतर सनातनींस मान्य आहे काय ?

आह्मीं लिहीत आहोंत कलीयुगातील गोष्टींसंबंधीं त्यातील आमच्या शंकांचें समाधान श्री. दुर्गाराम करीत आहेत सत्ययुगातील पुराव्यानें व प्रमाणानीं. ते कलीयुगातून श्रीमारुतिरायाप्रमाणें एकदम उड्डाण मारतात सत्ययुगात. येथें तर आमच्या सारख्या अल्पशक्ताची तिरपीट उडते आमचा खास प्रश्न असा कीं, गार्गी, मैत्रेयी, सुलभा इ. ब्रह्मवादिनी ज्या काळात होत्या त्या कालाप्रमाणें आपण स्त्रियाचे उपनयनादि संस्कार करण्यास, त्यास वेदाध्यापनादि करण्यास सिद्ध आहात काय ? तसेंच ज्या कालात असल्या स्त्रिया उत्पन्न झाल्या त्या नंतर, शास्त्रकाराची स्त्रियास ब्रह्मज्ञान प्रीत्यर्थ अनुज्ञा श्री. दुर्गारामाच्या मतें असतां, त्याच्या तोडीच्या स्त्रिया श्रीसमर्थकालापर्यंत उत्पन्न का झाल्या नाहींत ? झाल्या असल्या तर त्याचा एक दोन नावें तरी सांगा कीं, ज्यानीं काहीं कार्य करुन दाखविलें आहे ? आपल्या सिद्धान्ताच्या पुष्ट्यर्थ त्यानीं त्या स्त्रियाचीं नांवें न देतां कृतत्रेतातील ब्रह्मवादीनाचा आश्रय का करावा ? श्रीसमर्थकालींच गार्गीमैत्रेयीच्या तोडीच्या स्त्रिया का उत्पन्न झाल्या ? आह्मी श्रीवेणुबाई, आक्का, बयाबाई या श्रीसमर्थांच्या पारमार्थिक कन्यकास गार्गीमैत्रेयींपेक्षा तिळभर हि कमी लेखत नाहीं. श्री. दुर्गारामानीं याचें उत्तर द्यावें. आह्मी स्वामी विवेकानन्दांचें एक वाक्य वर दिलें आहे. त्यात वर्णिल्याप्रमाणें मनुष्यत्वाचे साधे हक्क, बुद्धीच्या वाढीला योग्य असणारें स्वातंत्र्य, थोडक्यात सांगावयाचें म्हणजे बहुजन समाजाच्या वाढीचीं व त्याच्या सर्वांगीण उन्नतीचीं ऐहिक व पारमार्थिक साधनें याचीं 'कलिवर्ज्य, शूद्रकमलाकर' व तत्सदृश इतर दूरदृष्टीशून्य प्रकरणानीं शास्त्राच्या गोड नावाखालीं, वाढ खुटविली गेली. त्यामुळें हिंदु समाजाचीं शेंकडों वर्षें अवनतीच होत गेली. तेव्हा शास्त्रें त्रिकालाबाधित न समजतां श्रीसमर्थांनीं त्यातलें चागलें तेवढें उचललें, वाईट टाकून दिलें, तसेंच हितकर व समाजास पोषक असें नवें उत्पन्न केलें व प्रचंड आंदोलन उत्पन्न करुन तें यशस्वी करुन दाखविलें. प्रचलित शास्त्रांतील काहीं भाग त्याज्य वाटला तो त्यानीं डावलला, असें आमचे स्पष्ट मत आहे. असे श्रीसमर्थ पूर्णपणें कट्टर सनातनी होते असें ह्मणणें ह्मणजे पक्षपातेचें लक्षण होय.

" The Smritis and the Puranas are productions of of men of limited intelligence and are full of fallacies, errors, the feelings of class and malice. Only parts of

them breathing broadness of spirit and love, are acceptable, the rest to be rejected." ह्मणजे " स्मृति व पुराणें हीं साधारण बुद्धीच्या माणसांनीं लिहिलीं आहेत. त्यांमध्यें परस्परविरोध, घोडचुका, उचनीचत्वाची भावना व असूया हीं भरलीं आहेत. त्यांतील अन्तःकरणाचा मोठेपणा व भूतमात्रावर दया दाखविणारे जेवढे भाग आहेत तेवढेच ग्राह्य होत व बाकीचे त्याज्य होत." स्वामी विवेकानन्दांचें हें वाक्य आहे. विवेकानन्द स्पष्ट बोलले आहेत, श्रीसमर्थांनीं बोलून न दाखवितां हेंच केलें आहे. आणि आमचे श्री. दुर्गाराम निघाले आहेत त्यांना सनातनी ठरविण्याला ?

( १५ ) **श्रीसमर्थांचा आश्रमः—** श्रीसमर्थांच्या आश्रमा संबंधींचा आतां विचार कर्तव्य आहे. या प्रश्नाचा पूर्वपक्ष व उत्तर पक्ष थोडक्यांत पुढील प्रमाणें आहे. आमचें मत असें कीं, श्री 'अनाश्रमी' आहेत. श्री. दुर्गाराम म्हणतात कीं, तें चूक आहे, श्री आश्रमी आहेत व त्यांचा आश्रम 'विद्यास्नातक ब्रह्मचारी' हा होय. यावर आमचें म्हणणें असें कीं, 'विद्यास्नातक ब्रह्मचारी हा शब्दप्रयोग चुकीचा आहे व श्री. दुर्गारामांनीं या विद्यास्नातकाचें वर्णन श्रीसमर्थांचें म्हणून दिलें आहे तें गृहस्थाश्रम्याचें वर्णन आहे असें त्यांनीं दिलेल्या आधारांनींच आमच्या दुसऱ्या लेखांत आम्हीं सिद्ध केलें आहे. यावर त्यांनीं आपल्या दुसऱ्या लेखान्वयें म्हटलें आहे तें असें कीं, 'आपण 'विद्यास्नातक' या शब्दापुढें ब्रह्मचारी हा शब्द जोडला तो आह्मीं आपल्या पहिल्या लेखांत उपयोगिला असल्यानें लाविला, वास्तविक रीतीनें आपणांस ( दुर्गारामांस ) केवळ 'विद्यास्नातक' शब्द च योजावयाचा होता. ( आह्मी आमच्या पहिल्या लेखांत श्रीसमर्थांस ब्रह्मचारी शब्द कोणत्या अर्थानें लाविला आहे, हें वाचकांनीं गेल्या अंकाच्या ( २३२ ) पृष्ठ ९२ च्या पानावर पहावें. ) बाकी आपणांस ( श्री. दुर्गारामांस ) श्रीसमर्थ 'अविवाहित' आहेत येवढेंच 'विद्यास्नातक' या शब्दानें दर्शवावयाचें आहे व दासाठीं त्यांनीं आह्मांस गौतमसूत्रांवरील हरदत्तांची टीका विशेषतः मस्करीय भाष्य वाचून, 'स्नातक' हा अविवाहित स्थितींत यावज्जीव असणें शास्त्रसंमत आहे, याबद्दल खात्री करून घेण्यास मोठ्या आग्रहानें सांगितलें आहे. त्यांच्यामतें गौतमसूत्राच्या ९व्या अध्यायांतील पहिल्या व दुसऱ्या सूत्रांवरील भाष्यांत हरदत्त व मस्करीयांनीं समावर्तनानंतर अविवाहित स्थितींत ( स्नातक ) आजन्म राहतां येतें व त्या अध्यायांत सांगितलेलीं मतें गृहस्थाश्रमी व स्नातक यांस सारखीं च लागू आहेत. आतां याचा विचार करूं.

श्री. दुर्गारामांनीं आपल्या पहिल्या लेखांत ( प. सु. हार, पुष्प ३३ ) यांत 'स्नातक' शब्दाचा काय अर्थ केला आहे तो त्यांच्या च शब्दांत पाहूं याः—
" त्रयः स्नातकाः भवन्ति । विद्यास्नातको व्रतस्नातको विद्याव्रतस्नातकश्च " हारीत ॥ यांतील 'विद्यास्नातक' याचा अर्थ 'विद्याध्ययन पूर्ण

करून ब्रह्मचर्यव्रतानें राहणारा ' तो ' विद्यास्नातक '. हारीतांनीं ' विद्यास्नातक ' याचा अर्थ ' य समाप्य वेदानसमाप्य व्रतानि समावर्तते स विद्यास्नातक ' असा दिला आहे बापटशास्त्र्यांनीं याचा अर्थ ' वेद संपवून व्रतें न संपवितां जो गुरुकुलातून परत येतो तो विद्यास्नातक ' असा केला आहे. ' व्रतस्नातक ' याचा अर्थ श्री. दुर्गारामांच्या मतें ' अध्ययन पूर्ण होण्यापूर्वी गुरूची आज्ञा घेऊन विवाह करूनहि अध्ययन करणारा तो व्रतस्नातक ' आतां हारीतांनीं या पदाचें विवरण कसें केलें आहे तें पहा य समाप्य व्रतान्यसमाप्य वेदान् समावर्तते स व्रतस्नातक । बापट याचें भाषांतर ' जो व्रतें संपवून विद्या न संपवितां परत येतो तो व्रतस्नातक, असें करितात. ' विद्या व्रतस्नातक ' याचा अर्थ श्री. दुर्गाराम देतात तो असा कीं, ' विद्या पूर्ण करून ब्रह्मचर्यहि पूर्ण करून गुरुकुलातून परत आलेला तो विद्याव्रतस्नातक-उभयव्रत स्नातक ' उभय समाप्य य समावर्तते स विद्याव्रतस्नातक ' असें हारीतांचें ' विद्याव्रतस्नातक ' या पदाचें विवरण आहे व याचा अर्थ ' जो व्रतें आणि वेद हीं दोन्हीं संपवून परत येतो तो विद्याव्रतस्नातक ' असा बापटांनीं केला आहे तिसऱ्या स्नातकास ' उभयस्नातक ' अशी हि संज्ञा आहे ' समावर्तते ' हें पद तीन हि स्नातकांत कायम असतांना श्री दुर्गाराम व हारीतांच्या आधारें बापट यांच्या अर्थांत किती अंतर पडत आहे व त्यांत कोण बरोबर हें वाचक समजून घेतील च. वाचकांनीं विशेषत श्री दुर्गारामांच्या ' विद्यास्नातक ' पदाच्या अर्थाकडे अवधान द्यावें

या स्नातकत्रयी पैकीं पहिला व दुसरा हे सारख्या योग्यतेचे व शेवटचा श्रेष्ठ असें गोभिलांचें मत असल्याचें ' संस्कारमयूख ' कारांनीं म्हटलें आहे ' तेषामन्त्य श्रेष्ठ । उभौ तुल्यौ । ' श्रीसमर्थ ' विद्यास्नातक ' होते असें श्री. दुर्गाराम म्हणतात.

या तीन स्नातकांचा श्री दुर्गारामांनीं जो अर्थ केला आहे, त्यावरून पहिला तेवढा ब्रह्मचारी दिसतो व बाकीचे दोन गृहस्थाश्रमी आहेत असें स्पष्ट दिसतें तेव्हा त्यांनीं आपल्या दुसऱ्या लेखांत मस्करीय भाष्याच्या आधारें सांगितलेला " समावर्तनानंतर अविवाहित स्थितींत ( स्नातक ) आजन्म राहतां येतें " असा त्यांचा ' विद्यास्नातक ' ठरतो व त्यांच्या मतें श्रीसमर्थांचा आश्रम ' विद्यास्नातक ! '

आता या गृहस्थाचें त्यांच्या पहिल्या लेखांतील ( प्र सु हार पु ३३ ) पुढील वाक्य पहा. " उभयस्नातकांचीं कर्तव्यें शास्त्रांत पुष्कळ वर्णिलीं आहेत " असें म्हणून या आपल्या त्या लेखांत पान ३३२, ३३३, ३३४ व ३३५ यांत या ' उभयस्नातका ' चें वर्णन गौतमसूत्रें, आश्वलायन सूत्र व स्मृति, मनुस्मृति व याज्ञवल्क्य स्मृति याच्या आधारें त्यांनीं केलें आहे, व त श्रीसमर्थांचें आहे म्हणून तें सांगत आहेत श्रीसमर्थ ' विद्यास्नातक ' असल्याचें ते च सांगतात व वर्णन

करतात 'उभयस्नातकाचें'. तेव्हां ही काय लीला आहे कळत नाहीं! 'विद्यास्नातक' व 'उभयस्नातक' एक च समजावयाचें काय! असा आमचा त्यास सवाल आहे.

मस्करीय भाष्याच्या आधारें स्नातक आजन्म अविवाहित असूं शकतो असें ते सांगतात मस्करींना तो, हारीतानीं वर्णिलेल्या तीन स्नातकांपैकीं, नेमका कोणता याचा निर्देश केला आहे काय ? असा आमचा त्यांस दुसरा सवाल आहे.

उभयस्नातकाची त्यानीं जी व्याख्या केली आहे त्यावरून तो गृहस्थाश्रमी दिसतो व त्याचेंच वर्णन त्यानीं पुढें श्रीसमर्थांचें वर्णन म्हणून दिलें आहे. श्रीसमर्थ तर त्यांच्याच मतें 'विद्यास्नातक – म्हणजे विद्याध्ययन पूर्ण करून ब्रह्मचर्य व्रतानें राहणारा.' तेव्हां या परस्परविरोधी वर्णनाची एकवाक्यता कशी करावयाची ? हें त्यांनीं सांगावें.

आपल्या दुसऱ्या लेखांत 'अकृतविवाहेऽपि गृहस्थ शब्द प्रयुक्त" असें मस्करीय भाष्याच्या आधारें म्हणून, 'स्मृतिकारानी स्नातकास गृहस्थ का म्हटलें आहे' या आमच्या दुसऱ्या लेखांतील शंकेस उत्तर देण्याचा प्रयत्न त्यानीं केला आहे. पण या मस्करीय भाष्याच्या विरुद्ध बोधायनाचें "आजायासद्गामात्स्नातका भवन्त्यतऊर्ध्वं गृहस्था" हें सूत्र ( बो. गृ परिभाषा १ × ५ × १० ) जात आहे, त्याची श्री. दुर्गाराम संगति कशी लावतात तें त्यांनीं सांगावें. असेंच बोधायनाच्या मतें, श्री. दुर्गारामानीं कल्पिलेली अविवाहित स्नातक ही स्थिति अस्तित्वात नाहीं आणि त्यांचा विद्यास्नातक तर अविवाहित, या विरुद्ध गोष्टींचा मेळ ते कसा घालणार!

स्नातकत्रयीचा अर्थ श्री. दुर्गारामानी जो केला आहे तो स्वतंत्र रीतीनें आहे असें दिसतें. हारीतानीं जें त्याचें स्पष्टीकरण केलें आहे त्यास आपला अर्थ विरुद्ध जातो किंवा नाहीं याचा त्यांनीं विचार करावा. याचकानींहि वरील गोष्टींचा विचार करावा.

आपल्या स्नातकत्रयीचें आपल्या पहिल्या लेखांत वर्णन करण्याचे वेळेस, त्यानीं आपल्या दुसऱ्या लेखांत वर्णिलेला अविवाहित स्नातक, त्यांच्या मनश्चक्षूसमोर नसावा, त्यांच्या या दुसऱ्या स्नातकाचा जन्म आमच्या दुसऱ्या लेखानंतर झाला असावा असें दिसतें. तसें नसतें तर, वर लिहिलेला परस्परविरोधी घोटाळा त्यांच्या लिहिण्यात झाला च नसता!

आम्हावर श्री. दुर्गारामांचा मोठा आरोप व रोष आहे कीं, आम्हीं पूर्वापार संदर्भ सोडून देऊन, मधलीं च कोठली तरी वचनें देऊन वाचकांची दिशाभूल करितों. आम्हीं तसें केलें नाहीं व तसें करणें आम्हांस साधत हि पण नाहीं. कारण आम्हांस केवळ आमच्या शंकांचें समाधान पाहिजे आहे आम्हीं आमच्या दुसऱ्या

लेखांत त्यांनीं आपल्या पहिल्या लेखांत जीं जीं प्रमाणें दिलीं आहेत, त्यांचा पूर्वापार संदर्भ पाहूनच उत्तरें दिलीं आहेत. होय किंवा नाहीं, तें पाहण्याचें काम वाचकांचें आहे. पुनः आतां तें च करीत आहोंत. त्याप्रमाणें प्रथम त्यांच्या स्नातकत्रयींचा विचार केला. आतां या स्नातकत्रयींच्या खालीं ( प. सु. हार पु. ३३ ) त्यांनीं दिलेल्या याज्ञवल्क्य स्मृतींतील ५१ व्या श्लोकार्ध्या उत्तरार्धाचा विचार करूं या. तो श्लोकार्ध ' वेदमतानि वा पारं नीत्वा ह्युभयमेव वा ॥ ' असा आहे. हा श्लोक विवाहप्रकरणांतील आहे. स्नातक प्रकरणांतील नव्हे. तेव्हां हा श्लोक श्रीसमर्थांस लागू होत नाहीं. तें कसें हें आम्हीं ' धर्मसिंधु ' व ' बाळंभट्टी ' या ग्रंथाधारें आमच्या दुसऱ्या लेखांत सिद्ध केलें आहे. त्यांत, स्नातकत्रयीनें समावर्तनानंतर शक्य तों लवकर विवाह करावा असें म्हटलें आहे. या विधानास आणखी एक जास्त पुरावा ' स्मृतिचंद्रिका ' कारांचा देतों. वाचकांनीं तो पुरावा या ग्रंथांतील ' समावर्तनम् ' या प्रकरणांत पहावा. तेथें त्यांनीं दक्षाचें "स्वीकरोति यदा वेदं चरद्वेदमतानिच। ब्रह्मचारी भवेत्तावदूर्ध्वं स्नातो गृहीभवेत्॥" असें वचन दिलें आहे. यावरून वर सिद्ध केलेल्या अभिप्रायास पुष्टि मिळत नाहीं काय ! तसें च ' आश्रमविकल्पो ' या त्यांच्या ' स्मृतिचंद्रिके ' च्या प्रकरणांत ' देवण भट्टांनीं स्नातकत्रयीनें ( श्री. दुर्गारामांनीं स्पष्टीकरण केलेली नव्हे हो ! हारीतांनीं केलेली ) समावर्तनानंतर शक्य तों लवकर विवाह करावा, ' अनाश्रमी ' राहूं नये असें च प्रतिपादन केलें आहे. श्री. दुर्गारामांचा ' अविवाहित स्नातक ' ही स्थिति ' स्मृतिचंद्रिका ' कारांस मान्य नाहीं हें त्यांनीं या प्रकरणांत वसिष्ठाचें जें वचन दिलें आहे त्यावरून स्पष्ट होत आहे. " आचार्येणाभ्यनुज्ञातश्चतुर्णामेकमाश्रमम्। आ विमोक्षाच्छरीरस्य सोऽनुतिष्ठेद्यथाविधि ॥ " यांतील ' आ विमोक्षात् ' या पदानें ' आश्रमिणाऽवश्यतव्यम् ' असें त्यांनीं म्हणून या विधानाच्या पुष्ट्यर्थ दक्षस्मृतीचीं तीं प्रसिद्ध वाक्यें, ' अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकमपि द्विज । ' व ' जपे होमे तथा दाने स्वाध्याये वा रत सदा । ' तसें च हारीतस्मृतींतील " अनाश्रमी व्यपेतश्च आश्रमी च निरर्थक " इ वाक्यें दिलीं आहेत.

वरील विवेचनावर वाचकांच्या लक्षांत आणखी एक गोष्ट येईल ती ही कीं, " अनाश्रमी न तिष्ठेत इ दक्षवचनं विधुरविषयत्व द्रष्टव्यम् । हें वचन समावर्तित अविवाहितांकरितां नसून ज्याची बायको मेली आहे अशा विधुरांकरितां आहे " हें मस्करीय आधारानें दिलेलें श्री. दुर्गारामांचें विधान कितपत मान्य समजावयाचें याचा वाचकांनीं विचार करावा.

तात्पर्य याज्ञवल्क्य स्मृति, तीवरील टीकाकार व उपटीकाकार म्हणजे मिताक्षरा, अपरार्क, बाळंभट्टी, स्मृतिचंद्रिका, बोधायन, गृह्य परिभाषा, संस्कार मयूखकार इत्यादींस तरी ' अविवाहित स्नातक ' ही स्थिति मान्य असल्याचें दिसून येत नाहीं.

आमच्या विधानाच्या पुष्टीकरणासाठीं आणखी एक पुरावा वाचकांपुढें ठेवितों. तो जशाचा तसा च मुद्दाम उतरून घेत आहोंत. ' प्रयोग पारिजात ' नांवाच्या ग्रंथांतील तो उतारा आहेः—

अथ स्नातकधर्माः । तत्र नित्यविधिमाह कारिकाकारः । :- ' दास्यन्ति मधुपर्कं ये तत्रैतां रजनीं वसेत् ' । इदमत्र गृह्यम् — ' यत्रैनं पूजयिष्यन्तो भवन्ति तत्रैतां रात्रिं वसेदिति । अस्यार्थः — यत्रात्मानं मधुपर्केण पूजयिष्यन्ति तत्रैतां रात्रिं वसेत् । कुत एतत् । स्नातकायोपस्थितायेति वचनान्मधुपर्केण पूजनं लब्धमिति । अत्र भगवान्:— समावृत्तमिमं यस्मिन्पूजयिष्यन्ति मानवाः । मधुपर्कप्रदानार्थं स्तद्गृहे तां निशां वसेदिति । अत्रस्मृतिरूपेण विशेषमाह आचार्यः —

स्नात्वैव विधिना काले । मासमात्रमपि द्विजः ।
अनाश्रमी न तिष्ठेत । सुस्वस्थः प्रयतात्मवान् ॥
निः स्वो रोगार्दितो भीतस्त्वापन्नोन्यैश्च कारणैः ।
नित्यदा ब्रह्मचारी स्याच्चतुर्यज्ञपरायणः ॥
जापीतीर्थरतो वा स्यात्स्नातको लौल्यवर्जितः ॥
श्राद्धे निमन्त्रितो गच्छेत्कुर्यात्पद्कर्म च द्विजः ।
येन केनाप्युपायेन व्रतचर्यां न लोपयेत् ॥
टाकलाञ्जुहुयात्प्रातस्तन्मन्त्रैः कार्यमेव च ।
कुर्याद्यज्ञान् विधिप्रोक्तान् स्नातको नतु यज्ञभाक् ॥
... ... ... ...
... ... ... ...

तत्र स्नातकेन वैश्वदेवः कार्य इत्याह शौनकः —
वैश्वदेवं गृहस्थस्य प्रातराम्भणं भवेत् ।
स्नातकेनापि तत्कार्यं पृथक्पाको गृहे यदि ॥

पुनरन्ये धर्माः कूर्मपुराणे दर्शिताः —
यज्ञोपवीतं द्वितयं सोदकं च कमण्डलुम् ।
छत्रं चोष्णीषममलं पादुके चाप्युपानहौ ॥
रौक्मे च कुण्डले वेणुं कृत्तकेशनखः शुचिः ।
स्वाध्याये नित्ययुक्तः स्याद् बहिर्माल्यं च धारयेत् ।
न जीर्णमलवद्वासा भवेत्तु विभवे सति ॥
न रक्तमुल्वणं चान्यधृतं वासो न कन्यिकाम् ॥

स्मृत्यन्तरे तु—
स्नातः समुद्वहेत्कन्यां प्रव्रजेद् वा तदिच्छतः ।
वनस्थो वा भवेद् विप्रः सुस्वस्थो विधिना शुचिः ॥

अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकमपि द्विजः ।
आश्रमेण विना तिष्ठन्प्रायश्चित्तीयते हि सः ॥"

हा एवढा लांबलचक उतारा देण्याचा मोह न आवरण्याचें कारण असें कीं, यांत श्री. दुर्गारामांच्या सर्व प्रश्नांचीं व त्यांनीं आह्माविरुद्ध काढलेल्या जवळ जवळ सर्व आक्षेपांचीं उत्तरें आलीं आहेत. श्रीसमर्थांचा आश्रम कोणता, ते अनाश्रमी ठरतात किंवा कसें, समावर्तनोत्तर स्नातकास जास्तींत जास्त अविवाहित स्थितींत किती काल राहतां येतें, तसें च यावज्जीव राहतां येतें किंवा नाहीं, 'अनाश्रमी न तिष्ठेत' हें वाक्य विधुरास च लागू आहे किंवा कसें, समावर्तन झाल्यावर कोणता तरी आश्रम ( गृहस्थ, वानप्रस्थ किंवा संन्यास ) स्वीकारणें भाग आहे काय, स्नातकाचीं वस्त्रें दुर्मुजी कीं पांढरीं, तीं किती असावींत, मेखला हें वस्त्र घालावें किंवा कसें, यज्ञोपवीत विद्यमान आहे काय, स्नातकानें दाढी जटा ठेवाव्यात कीं न ठेवाव्यात इ. गोष्टींचा सविस्तर उहापोह आहे. श्री. दुर्गारामांनीं आमच्या विरुद्ध जे जे पुरावे आपल्या पहिल्या व दुसऱ्या लेखांत आणले आहेत त्या सर्वांचीं समर्पक उत्तरें यांत आहेत. दोन हि पक्षांच्या बलाबलाचा सत्यासत्याचा निर्णय देण्याचे कामीं पुरावा म्हणून याचा फार उपयोग होणार आहे. विद्वान् वाचकांची न्यायाधीशाची भूमिका आहे. शांतपणें विचार करून त्यांनीं आपला निर्णय प्रसिद्ध करावा.

आमच्या जवळ आश्वलायन स्मृति नाहीं, तेव्हां श्री. दुर्गारामांनीं दिलेल्या त्या श्लोकाचा अर्थ ( प. सु. हा, पु. ३१ ) कोणास लागू आहे, हें नक्की आपणांस सांगतां यावयाचें नाहीं, तरीपण त्याचा अर्थ आह्मांस अनुकूल असावा असा त-हेचें विधान आह्मी आपल्या दुसऱ्या लेखांत केलें होतें. त्याबद्दल श्री. दुर्गारामांनीं आमची कुचेष्टा आपल्या दुसऱ्या लेखांत केली आहे. "स्नात्वैव विधिनाकाले" इ. श्लोक गृहस्थासंबंधींचे नसून ते विवाहेच्छूबद्दलचे तरी आहेत व ते म्हणतात त्याप्रमाणें त्यांच्या 'विद्यास्नातकाबद्दलचे ( कीं 'उभयस्नातक' ) तरी नाहींत येवढें वरील 'प्रयोग पारिजाता' तील उताऱ्यावरून निर्विवाद सिद्ध झालें हें काय थोडें झालें ! त्याचप्रमाणें आह्मी आमच्या दुसऱ्या लेखांत दिलेलीं आश्वलायन गृ. सूत्रांतील वचनें कोणा संबंधींचीं आहेत हें हि सिद्ध होत आहे.

श्री. दुर्गारामांनीं उल्लेखिलेला ( प. सु. हा. पु. ३१ ) "स्वाध्यायेन व्रतै होमै स्त्रैविद्येनेज्यया सुतैः । महायज्ञैश्च यज्ञैश्च ब्राह्मीयं क्रियते तनुः ॥ मनु २×२८" हा श्लोक श्रीसमर्थांच्या वर्णनात्मक म्हणून ते देतात. त्यातील 'सुतैः' या पदाकडे वाचकांनीं लक्ष द्यावें. हा श्लोक विशिष्ठ आश्रमदर्शक नाहीं. असें असतांना या श्लोकानें त्यांनीं श्रीसमर्थांचें वैशिष्ट्य काय दर्शविलें तें श्रीसमर्थांस च माहीत !
"वैणवीं धारयेद्यष्टिं सोदकं च कमंडलुम्। यज्ञोपवीतं वेदं च शुभे रुक्मे च कुंडले"

मनु ४ × ३६ " हा श्लोक स्नातक गृहस्थाश्रम्याच्या वर्णनपर आहे. स्नातक गृहस्थाश्रमी व साधा गृहस्थाश्रमी यांत अंतर आहे. स्नातकवृत्तीचा अवलम्ब केल्यानें गृहस्थाश्रमी पुरुषांत सत्त्वगुणांचा प्रकर्ष जास्त होतो असें मनूंनीं ४ × २५९ यांत सांगितलें आहे. सारांश श्री. दुर्गाराम सांगतात ती स्नातकाची अवस्था – अविवाहित स्नातक – मनुस्मृतीस मान्य नाहीं.

स्नातक हा गृहमेधी च गृहस्थाश्रमी च असला पाहिजे हें " वेदविद्याव्रतस्नाताञ्श्रोत्रियान्गृहमेधिनः ॥ मनु. ४ × ३१ " या श्लोकावरून स्पष्ट आहे. स्नातक हा शब्द फिरून अ. ३ × ११९ मध्यें येतोः—" राजर्त्विक्स्नातक गुरून् " त्याचा अर्थ ' स्नातको विद्याव्रताभ्याम् ' असा कुल्लूक भट्टांनीं केला आहे व त्याचें स्पष्टीकरण " ब्रह्मचारी व्रताचा ज्यानें त्याग केला आहे असा स्नातक " असें बापट शास्त्र्यांनीं केलें आहे. या पुढील ३ × १२० व्या श्लोकांत ' राजा च श्रोत्रियश्चैव ' अशी पदें आलीं आहेत, त्यांतील ' श्रोत्रियः ' पदाचा अर्थ कुल्लूकांनीं ' स्नातक ''असा केला आहे व ' श्रोत्रिय ' पदाचा अर्थ ' गृहस्थाश्रमी ' आहे असें वर मनु ४ × ३१ च्या आधारें लिहिले च आहे. मनु अ. ११ × ११२ 'या श्लोकांतील ' स्नातकस्य व्रतानि ' यांतील ' स्नातकस्य ' याचा अर्थ ' गृहस्थस्य ' असाच कुल्लूकांनीं केला आहे. " अकृतविवाहे ऽपि गृहस्थ शब्दः प्रयुक्तः " हें मस्करांचें ( श्री. दुर्गारामांच्या मतानें ) प्रतिपादन बोधायनास संमत नाहीं, हें 'आम्ही वर "आजायासन्नमा स्नातका भवन्त्यत ऊर्ध्वं गृहस्थाः " या आधारें दाखविलें च आहे. तात्पर्य मनुस्मृतींत श्री. दुर्गारामांचा ' स्नातक ' कोठें च दिसून येत नाहीं.

हरदत्तांचा स्नातकः—गौतमसूत्राच्या ९ व्या अध्यायांतील पहिल्या व दुसऱ्या सूत्रावरील हरदत्ताची टीका फार काळजीपूर्वक पहाण्यास श्री. दुर्गारामांनीं आम्हांस पुनः पुनः बजाविलें आहे व म्हटलें आहे कीं, ही टीका वाचल्यास आढळून येईल कीं, ' स्नातक ' हा अविवाहित हि असूं शकतो. या दुसऱ्या सूत्रावरील हरदत्ताचें पाण्डित्य पाहण्याचे अगोदर आम्ही त्यांस विचारतों कीं, ' स्नातकः ' या सूत्रांतील स्नातक ते कोणता घेतात ? विद्यास्नातक, व्रतस्नातक कीं उभय स्नातक ? कारण येथें स्नातक हा शब्द मोघम आहे. सूत्रांतील ' स्नातक ' या पदावरून ' स्नातकत्रय ' हि घेतां येईल. व शास्त्रीय दृष्टीनें तसा च अर्थ घेणें इष्ट व योग्य ठरेल. त्यांच्या दुसऱ्या लेखांतील प्रतिपादनावरून हि हें च दिसतें. पण यांत एक अडचण उपस्थित होत आहे. ती त्यांनीं केलेल्या स्नातक त्रयीच्या अर्थामुळें येत आहे. त्यांनीं केलेला अर्थ व हारीतांचा अर्थ यांत अंतर आहे, हें आपण वर पाहिलें च आहे. त्यांच्या ' स्नातकत्रयी ' पैकीं त्यांस अभिप्रेत असलेला व जो त्यांनीं श्री समर्थांस लाविला आहे, तो त्यांचा ' विद्यास्नातक ' – विद्याध्ययन पूर्ण करून ब्रह्मचर्यव्रतानें राहणारा – होय. बाकीचे दोन त्यांच्या च अर्थाप्रमाणें गृहस्थाश्रमी ठरतात. म्हणून ही शंका त्यांस विचारीत आहे. तिचें त्यांनीं निरसन करावें.

वाचकांस येथें पुन्हां थोडीशी सूचना द्यावीशी वाटते कीं, श्रीसमर्थांचें वर्णन म्हणून त्यांनीं जें ( प. सु श. पु. ३२ ) दिलें आहे तें विद्यास्नातकाचें नसून उभयस्नातकाचें केलें आहे.

आतां आपण हरदत्तांच्या टीकेकडे वळूं. गौतमसूत्रांच्या ९ व्या अध्याया-पैकीं पहिल्या व दुसऱ्या सूत्रावरील भाष्य वाचकाच्या व आमच्या सोयीसाठीं शब्दशः देत आहे. " स विधिपूर्वकं स्नात्वा भार्यामधिगम्य यथोक्तान् गृहस्थ-धर्मान् प्रयुञ्जान इमानि व्रतान्यनुकर्षेत् ॥ १ ॥ " या सूत्रावर त्यांनीं पुढीलप्रमाणें टीका केली आहेः— तच्छब्देन पूर्वोध्यायोक्त राजा ब्राह्मणश्च परामृश्यते । वैश्यस्य तु स्नातकविषये विशेषं वक्ष्यति । विधिपूर्वं विधिं पुरस्कृत्य स्नात्वा वेदव्रतानि पारं नीत्वा समावर्तनं कृत्वा भार्यामधिगम्य विवाहं कृत्वा तदनंतरं यथोक्तानतिथि-पूजादिगृहस्थधर्मानतुतिष्ठन्निमान्यपि वक्ष्यमाणानि व्रतान्यनुकर्षेत् । आरमानं प्रापयेदनुतिष्ठेदिति ।

दुसरें सूत्रः— स्नातक ॥ यावरील टीकाः— च लोपो द्रष्टव्यः । स्नातकश्चैतानि गृहस्थव्रतान्यनुतिष्ठेत् । ब्रह्मचर्याश्रितत्वाद् गार्हस्थ्यव्यतिरिक्ता श्रमान्तराभावाच भार्यामधिगमादूर्ध्वमिति पूर्वसूत्रं प्रारब्धम् । स्नातकस्य तु भार्याधिगमासंभवे यावज्जीवं गृहस्थधर्मा एवानुष्ठेया इति सूत्रान्तरप्रारब्धम् । एतच्च राजब्राह्मणयोरेवानुष्ठानम् । तदतिक्रमे प्रायश्चित्तं च विधीयते ।

यांतील ' स्नातकस्य तु भार्याधिगमासम्भवे यावज्जीवं गृहस्थधर्मा एवानुष्ठेयाः ' या वाक्यावर काय ती श्री. दुर्गारामांची सारी भिस्त आहे. आतां भार्याधिगमासंभवे ' या पदाचा अर्थ काय करावयाचा ! आमच्या मतें ' भार्या मिळण्याचा असम्भव अशक्यता ' असा याचा अर्थ होत आहे. असम्भवः याचा अर्थ कोशकार आपटे Improbability; Impossibility व Nonexistance असा देतात. पैकीं आम्ही वर केलेला अर्थ कोशकारांनीं दिलेल्या शब्दार्थाप्रमाणें आहे. आतां ' भार्याधिगमासंभव ' दोन प्रकारांनीं च असूं शकेल. एक वरांत रूपकुलादीचें वैगुण्य असल्यास व दुसरें वधूंत हि तसा च प्रकार असल्यास; शास्त्रकारांनीं या दोन्ही गोष्टींचा पुष्कळ उहापोह केला आहे. कुलाचें श्रेष्ठत्व कायम राखावयाचें असल्यास उत्तमांचा उत्तमांशीं च शरीरसंबंध झाला पाहिजे. जिज्ञासूंनीं याबद्दल मनु, संस्कारमयूख इ. ग्रंथांत याचें विवरण पहावें. वधुवराची परीक्षा परस्परांतील मंडळींनीं करावी हें योग्य व व्यवहारास धरून च आहे. आतां प्रश्न असा उपस्थित होतो कीं, श्रीसमर्थांच्या संबंधीं ' भार्याधिगमा संभवे ' या पदान्वयें कोणती हि अडचण उभी राहिली नव्हती हें त्यांच्या होऊं घातलेल्या विवाहावरून सिद्ध आहे. तेव्हां ' यावज्जीव स्नातकानें अविवाहित रहावें ' अशी जी परिस्थिति म्हणजे ' भार्या मिळण्याची अशक्यता ' ती निदान श्रीसमर्थांच्या बाबतींत तरी नव्हती. तेव्हां हरदत्तांचें म्हणणें ( स्नातकानें यावज्जीव अविवाहित रहावें पण तें भार्या

मिळणें अशक्य असल्यास ) मान्य करून सुद्धां श्री. दुर्गारामांस विचारावेसें वाटतें कीं, श्रीसमर्थांची स्थिति हरदत्ताच्या भाष्यांत वर्णिल्याप्रमाणें होती काय ?

यावर प्रतिपक्ष म्हणेल कीं, मातोश्रींच्या अत्याग्रहामुळें श्रीस विवाहास उभें राहणें भाग पडलें. ' न मातुः परं दैवतम् ' या पुढें त्यांस मान वांकवावी लागली. याचें उत्तर असें कीं, शास्त्र असल्या लंगड्या सबबी जाणत नाहीं. श्रुतिस्मृतींच्या प्रामाण्यापुढें मातापितरांच्या इच्छेचें स्तोम माजविणें म्हणजे वर आम्हीं एके ठिकाणीं म्हटल्या प्रमाणें हायकोर्टाचा निवाडा स्मॉलकॉजेस कोर्टाच्या निवाड्यानें फिरविण्यासारखें हास्यास्पद होय.

आतां ' असम्भव ' याचा Non-existance ह्म. अस्तित्वांत नसणें असा हि अर्थ आहे. पण प्रस्तुत प्रकरणीं तो कांहीं च उपयोगी पडत नाहीं.

आतां हरदत्ताच्या भाष्याप्रमाणें एकादें अपवादात्मक उदाहरण पुढील प्रकारचें असूं शकेल. समजा एकादा ' स्नातक ' आहे. त्याची लग्नाची इच्छा हि आहे. तो वैगुण्यहीन आहे. पण त्याला भार्या मिळत नाहीं. तेव्हां त्यानें काय करावें ? अशासाठीं हरदत्तांनीं ही सोय करून ठेविली असल्यास मग आमचें कांहीं म्हणणें नाहीं. पण यावर मग अडचण येते ती ही कीं, स्नातक प्रकरणांत स्त्रीविषयक जीं सूत्रें आलीं आहेत त्यांची या स्नातकाच्या बाबत व्यवस्था कशी लावावयाची ? अध्याय ९ मध्यें याचा उल्लेख कोठेंच नाहीं. हीं सूत्रें असल्य अपवादात्मक उदाहरणांत गाळावयास पाहिजेत असें अनुमान केल्याशिवाय त्यांची व्यवस्था लागत नाहीं. हा प्रश्न विचारार्ह आहे. वाचकांनीं याचा विचार करावा.

तात्पर्य श्रीसमर्थांचे बाबत हरदत्ताची टीका उपयोगी पडत नाहीं. श्री. दुर्गारामांचें हें शस्त्र त्यांच्यावर च उलटत आहे.

आतां राहतां राहिला प्रश्न श्री. दुर्गारामांच्या मस्करीय भाष्याचा व बोधायन धर्मसूत्रांचा. हीं पुस्तकें आह्मांस मिळालीं नाहींत. मिळतील तेव्हां त्यांचा हि विचार करण्यांत येईल, एवढें आश्वासन आह्मी श्री. दुर्गारामांस देतों. शेवटीं आमची आमच्या न्यायाधीशांस ( वाचकांस ) सविनय प्रार्थना ही कीं, ' श्री समर्थांचा आश्रम कोणता ' हें ठरविण्याच्या प्रकरणीं आम्हीं मनु, याज्ञवल्क्य, बोधायन गृह्य परिभाषा, आश्वलायन, विज्ञानेश्वर, अपरार्क, स्मृतिचंद्रिका, बाळंभट्टी, धर्मसिंधुकार, संस्कारमयूख, प्रयोगपारिजातादि ग्रंथांचा उपयोग केला आहे. तो कितपत सत्यास धरून आहे हें पहाणें आपलें काम आहे. या ग्रंथांतून, मस्करीय भाष्याच्या आधारें श्री. दुर्गाराम म्हणतात तो, म्हणजे " समावर्तनानंतर अविवाहित स्थितींत ( स्नातक ) आजन्म राहतां येतें, " असा ' स्नातक ' आहे कां हें पहावें व आपला निर्णय द्यावा. घटकाभर गृहीत धरलें कीं, मस्करीय भाष्य व बोधायन धर्म सूत्रें श्री. दुर्गारामांच्या बाजूचीं आहेत. हें ध्यानांत धरून सुद्धां, उभय पक्षांच्या

प्रामाण्याचें बलाबल ठरवून व शास्त्रीय दृष्टीनें त्यांचें तारतम्य पाहून त्यांनीं आपलें मत मासिकाच्या द्वारें प्रसिद्ध करावें.

( १६ ) भिक्षाः—श्री. दुर्गारामांनीं, ( प. सु. हा. पु. ३३ ) " भिक्षा कोणती घ्यावी याविषयीं शास्त्रांत पुष्कळ चिकित्सा केली आहे." असें म्हणून पुढील श्लोक 'वेदयज्ञैरहीनानां प्रशस्तानां स्वकर्मसु । ब्रह्मचार्याहरेद् भैक्षं गृहेभ्यः प्रयतोन्वहम् ॥ मनु २४१८' व त्याचें भाषांतर " वेद, यज्ञ व स्वकर्मरत गृहस्थांचे घरीं च भिक्षा घ्यावी. जेथें तशी परिस्थिति नाहीं तेथें शास्त्राज्ञेनें थोराण भिक्षा (श्रीसमर्थांनीं) सुरू केली" असें म्हटलें आहे. वरील श्लोक ब्रह्मचाऱ्यानें कोठें भिक्षा मागावी, या प्रकरणांतील आहे. श्लोकांत 'ब्रह्मचारी' शब्द स्पष्ट आहे. तो चिकटविला आहे त्यांनीं श्रीसमर्थांस—त्यांच्या 'विद्या स्नातकास' कीं, जो त्यांच्या मतें " विद्याध्ययन पूर्ण करून ब्रह्मचर्य व्रतानें राहणारा व ज्याला त्यांनीं मस्करीय भाष्यमतें 'समावर्तनानंतर अविवाहित स्थितींत ( स्नातक ) आजन्म राहता येतें' असा असलेला म्हटलें आहे. आतां त्यांस विचारतों कीं, 'ब्रह्मचारी' व समावर्तन झालेला पण अविवाहित स्थितींत राहणारा हे एक च आहेत काय ? का जसें आपण गृहस्थाश्रम्याचीं मतें व आपण प्रतिपादिलेल्या स्नातकाचीं मतें एक च आहेत असें सांगत आहांत तो च प्रकार येथें सांगणार आहां कीं काय ? म्हणजे शास्त्रोक्त ब्रह्मचारी व अविवाहित स्नातक यांचे हि धर्म एक च आहेत ?

आमचें स्पष्ट मत असें कीं शास्त्राधारें श्री अनाश्रमी ठरतात. तेव्हां त्यांनीं चालू केलेला थोराण भिक्षेचा सांप्रदाय शास्त्रनिषिद्ध आहे.

थोराण भिक्षेच्या समर्थनार्थ (प. सु. हा. पु. ३३) 'आमयेवाददीतास्मात्' इ. जे श्लोक त्यांनीं दिलेले आहेत, ते आपत्कालीं ब्रह्मचाऱ्यानें, श्री. दुर्गारामांच्या स्नातकानें नव्हे, भिक्षा कोठें मागावी या संबंधींचे आहेत, तेव्हां ते श्रीसमर्थांस लागू होत नाहींत. शास्त्रकारांनीं निदान आंगिरस स्मृतीनें तरी अविवाहित स्नातकांस ( ! ) ही थोरण भिक्षा सांगितलेली नाहीं. वरीलप्रमाणें भिक्षेविषयीं त्यांनीं दिलेल्या आधारानें आतां सिद्ध केलें आहे व मागील लेखांतहि केलें होतें. असें असून त्यांनीं आपल्या दुसऱ्या लेखांत पृष्ठ ११९ वर काय उद्गार काढले आहेत, ते वाचकांनीं पहावेत. आम्ही पुनः त्यांस विचारतों कीं, 'रामदासियांचा भिक्षेसंबंधींचा आपत्काल गेलीं तीनशें वर्षें चालूच आहे काय ?'

आपल्या या भिक्षेच्या समर्थनार्थ श्री. दुर्गारामांनीं " तीनशें वर्षांची परंपरा कशा तऱ्हेची आहे हें रा. धावास ज्या संस्थेच्या कार्यदर्शित्वांत गौरव वाटतो, तिकडे पाहिलें असतां, समाधान होईल, " असें सांगितलें आहे. श्रीरामदासी सांप्रदाय व हरिजन सेवक संघ यांत त्यांस काय साम्य दिसलें तें कोण जाणे. हरिजन हजारों वर्षें दारिद्र्यादि संकटांत आहेत. तसा रामदासी सांप्रदाय आहे काय ? त्यांनीं रामदासी थोराण भिक्षेच्या पादमस्त प्रथाचा हरिजन सेवक संघ या

संस्थेशीं काय संबंध लावला हें त्यांचें त्यांसच माहीत ! हें अजब तर्कशास्त्र आह्मांस तरी कळत नाहीं. वाचकांस याचा कांहीं उलगडा होतो काय ?

( १७ ) आतां किरकोळ दोन मुद्दे राहिले आहेत. पैकीं एक मनुस्मृति अ. ४ × १६६ च्या टीकेंत "कुल्लूक भट्टांनीं देखील 'पापयोनिषु' म्हणजे 'कुक्कुरादि योनिषु' असा श्रुतीला अनसरून च अर्थ केला आहे" असें श्री दुर्गारामांनीं म्हटलें आहे. आम्ही तें अमान्य करीत नाहीं. आमचें येवढें म्हणणें कीं, या श्लोकांतील 'कुक्कुरादि योनिषु' या पदांत चाण्डाल योनीचा समावेश कुल्लुकांनीं केला आहे काय ? शिवाय 'पापयोनिः' याचा अर्थ तिर्यग् प्राणि घेणें चुकीचें आहे हें आम्ही वर सांगितलें च आहे.

( १८ ) श्री. दुर्गारामांनीं श्रेष्ठांसंबंधीं एक अनैतिहासिक असें विधान केलें आहे. "श्रीसमर्थांवर जो विवाह प्रसंग लादला गेला, त्याला श्रेष्ठांचे च प्रयत्न जास्त कारणीभूत झाले" असें त्यांचें म्हणणें आहे. श्रीसमर्थ विवाहास आपल्या मातोश्रींच्या च आग्रहानें च केवळ उभे राहिले होते. श्रेष्ठांचा त्यांत कांहीं च संबंध नव्हता. श्रेष्ठांस या लोकोत्तर बाळाचे पाय पाळण्यांत च दिसले होते. त्यांची श्रींच्या विवाहसंबंधींची खटपट केवळ वरकरणी होती व ती हि मातोश्रींच्या भिडेखातर होती. श्रीसमर्थांच्या चरित्राबद्दल अत्यंत विश्वसनीय पुरावा म्हणून इतिहासज्ञ जो समजतात, त्या प्रसिद्ध शकेनिशी टिपणांतील ८ वें कलम ( सां. वि. वि. भा. १ ले. ११ ) वाचकांनीं लक्षपूर्वक वाचावें, म्हणजे त्यांस आमच्या म्हणण्याची सत्यता कळून येईल.

लेखाचा विस्तार कल्पनेच्या बाहेर झाला. पण त्याला निरुपाय होता. श्री. दुर्गारामांच्या प्रत्येक विधानाचा विचार करणें आवश्यक होतें. तरी वाचकांनीं व मासिकाच्या संपादकांनीं क्षमा करावी अशी त्यांची प्रार्थना आहे.

श्री. दुर्गारामांनीं आपल्या दुसऱ्या लेखाचा आरंभ अशिष्ट शब्दांनीं केला आहे व शेवट हि पण तशा च धाणेरड्या शब्दांनीं केला आहे. 'काका' शब्दावर अश्लील कोटी केली आहे. यामुळें त्यांस समाधान वाटत असेल, तर त्यांत आह्मांस आनंद आहे. पण सात्विक संतापाचें हें लक्षण नव्हे. आह्मांस विनोद, मार्मिकता व अश्लीलपणा यांतील अंतर कळतें. हा विद्याविनोद आहे. हा विचार-विनिमय आहे. श्रीसमर्थांची ही सेवा आहे. ते श्रीसमर्थसांप्रदायिक असतील, पण आह्मीं हि आहोंत. आह्मांजवळ सांप्रदायाचीं बाह्य चिन्हें नाहींत येवढें च काय तें अंतर. विषयाचें गांभीर्य लेखनांतील शब्द योजनेनें कमी न होऊं देण्याची काळजी प्रत्येकानें घेतली पाहिजे. परस्पर मतभेद असला म्हणून काय वर्दळीवर यावयाचें ! ही वितंडा नव्हे. हा सुखसंवाद आहे. हें त्यांनीं ध्यानीं धरावें. यापेक्षां त्यांची विनवणी काय करावी बरें !

## ( १८ )

# ज्ञानेश्वरी आणि दासबोध *

( लेखक – डॉ. शंकर दामोदर पेंडसे, नागपुर )

साधु दिसती वेगळाले । परी ते स्वरूपीं मिळाले ।
अवघे मिळोन येक चि जाले । देहातीत वस्तु ॥ ७-२-३१

समर्थ रामदास यांनीं स्थापन केलेले मठ म्हणजे छोटीं विद्यापीठें असत. या मठांत संस्कृत आणि मराठी वाङ्मयांतील उत्कृष्ट ग्रंथांचा संग्रह केलेला असे व पंथ किंवा संप्रदाय यांची संकुचित दृष्टि न ठेवितां व्यापक व उदार बुद्धीनें त्यांचा अभ्यास केला जाई. स्वतः समर्थांनीं असा अभ्यास केला होता याची साक्ष त्यांचे सर्व ग्रंथ देत आहेत. समर्थांची ही उदार परंपरा समर्थवाग्देवतामंदिरानें पुढें चालविली असून तेथें असलेला हस्तलिखितांचा संग्रह संप्रदायातीत व्यापक बुद्धीनेंच केला आहे. कारण ज्ञानाच्या क्षेत्रांत संप्रदायांना जागा नाहीं. सत्य, शिव आणि सुंदर तत्वें कोणत्याहि संप्रदायांतील असलीं तरी तीं स्वीकार्य, संग्रहणीय व अनुकरणीय च असतात. आणि या च दृष्टीनें ज्ञानेश्वरी आणि दासबोध या ग्रंथांतील तत्वज्ञान आणि व्यवहार विषयक शिकवणीची तुलना करून त्यांतील साम्यवैषम्य पहावयाचें आहे.

मराठींतील संत-वाङ्मयाचा भक्कम आणि भव्य प्रासाद ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम आणि रामदास या चार खांबांवर उभा आहे. स्वराज्याच्या अस्तकालापासून उषःकालापर्यंत पसरलेल्या पारतंत्र्याच्या काळोख्या रात्रीं स्वतः निद्रिस्त न होतां, गाढ झोपीं गेलेल्या महाराष्ट्राला जागविण्याचें महत्तम कार्य या चार संत – समर्थांच्या वाङ्मयानें केलें आहे. यांच्यापैकीं एकनाथ व तुकाराम हे गृहस्थाश्रमी होते, तर ज्ञानेश्वर आणि रामदास हे ब्रह्मचारी होते. ज्ञानेश्वरांनीं भगवद्गीतेवर मराठी टीका लिहिली तर रामदासांनीं अनेक ग्रंथांच्या संमतीनें दासबोध ग्रंथाची रचना केली.

* श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या १८६२ ज्येष्ठ शु. १३ च्या वार्षिक समारंभाचे अध्यक्ष या नात्यानें केलेलें भाषण

दोन्ही ग्रंथांचा मुख्य विषय अध्यात्म किंवा परमार्थ हा च आहे ज्ञानेश्वरीचा मुख्य आधार भगवद्गीता हा आहे, तर दासबोधाचा आधार भगवद्गीता व तिच्या अनुकरणानें झालेल्या इतर गीता आहेत. उपनिषदें, भागवत आणि वसिष्ठसार हे ग्रंथ व शिवगीता, रामगीता, गुरुगीता, गर्भगीता, उत्तरगीता, अवधूतगीता, भगवद्गीता, ब्रह्मगीता, हंसगीता, पांडवगीता, गणेशगीता, यमगीता या बारा गीता आधारार्थ घेतल्याचें समर्थांनीं सांगितलें आहे ( दा. बो १-१-१८ व १९ ). यांपैकीं गुरुगीता महेशानें पार्वतीला सांगितली, अवधूतगीता ही गोरक्षनाथाला सांगितली, हंसगीता ही विष्णूनें हंसाचें रूप घेऊन ब्रह्मदेवाला सांगितली, ब्रह्मदेवानें नारदाला चतुःश्लोकी भागवत सांगितलें, वसिष्ठानीं वसिष्ठसार रामाला सांगितलें व कृष्णानें अर्जुनाला " सप्तश्लोकी " गीता सांगितली असा खुलासा रामदासानीं केला आहे ( दा. बो. ७-५-३३ ते ३७ ) वसिष्ठसार म्हणजे योगवासिष्ठ किंवा त्याचा सारात्मक लहान ग्रंथ असला पाहिजे व गीता मुळांत सात श्लोकांची असावी किंवा ' सप्तश्लोकी ' या पाठाऐवजीं ' सप्तशतश्लोकी ' असा पाठ असावा.

रामदासानीं आधाराकरिता घेतलेल्या वरील ग्रंथांत, उपनिषदें, भागवत, योगवासिष्ठ आणि भगवद्गीता हे चार ग्रंथ प्रमुख होत ज्ञानेश्वरानीं हि आपलें तत्त्वज्ञान या च ग्रंथाच्या आधारें विशद केलें आहे उपनिषदाचें सार असलेल्या गीतेवर च त्यानीं टीका लिहिली आहे. योगवासिष्ठावर हि त्यानीं ग्रंथ लिहिला आहे. तो उपलब्ध झाला नसला तरी त्याच्या उपलब्ध ग्रंथांत योगवासिष्ठाची दाट छाया पडली आहे. भागवतांतील अनेक स्थळांशीं ज्ञानेश्वरींतील विवेचनाचें साम्य आहे * रामदासाच्या यादींत गोरक्षगीता हा ग्रंथ आहे व ज्ञानेश्वर हे नाथसांप्रदायिक होते ही गोष्ट प्रसिद्ध आहे. समर्थांचा हि नाथसंप्रदायाशीं संबंध आला असावा असें श्री. राजाभाऊ गद्रे यानीं अलिकडे एका लेखांत प्रतिपादिलें आहे. समर्थांनीं दासबोधांत आधारार्थ घेतलेल्या ग्रंथांपैकीं भगवद्गीतेचा परिणाम समर्थांच्या मनावर सर्वांत अधिक झाला असावा असें स्पष्ट दिसतें परमेश्वरवाचक शब्दांपैकीं ' भगवत ' या शब्दाचा उपयोग दासबोधांत आधिक्यानें केलेला आहे आणि निरनिराळ्या ग्रंथांतून आधाराकरिता जीं ४०–४२ स्थळें दासबोधांत उद्धृत केलीं आहेत त्यांपैकीं १८–२० म्हणजे जवळ जवळ निम्मे स्थळें एकट्या भगवद्गीतेंतील आहेत. याशिवाय

मारिता मारिता मरावें । तेणें गतीस पावावें ।
फिरोन येता भोगावें । महद्भाग्य ॥

' या समर्थांच्या सुप्रसिद्ध ओवीवर

---

* ल. रा. पांगारकरकृत मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १ पानें ५२१-२२

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं । जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ॥

या गीतेतील श्लोकार्धाची किती दाट छाया पडली आहे तें सहज लक्षांत येण्यासारखें आहे अशा रीतीनें ज्ञानेश्वर आणि रामदास यांना स्फूर्ति देणारे प्रमुख संस्कृत ग्रंथ सारखेच असल्यामुळें व ज्ञानेश्वरांनीं ज्या भगवद्गीतेवर टीका लिहिली त्या भगवद्गीतेचा परिणाम रामदासांवर आधिक्यानें झाला असल्यामुळें ज्ञानेश्वरी आणि दासबोध या दोन्हीं ग्रंथातील आध्यात्मिक आणि व्यवहारविषयक विवेचनात साम्य आढळावें हें अगदीं स्वाभाविक आहे.

दासबोधात " बहुधा अध्यात्मनिरोपण " केलें असून भक्तीमुळें देव निश्चयानें पावतो असा अभिप्राय प्रगट केला आहे ( १ १ ३, ४ ) आध्यात्मिक विचारांच्या पायावर आमच्या नीतिशास्त्राची उभारणी झालेली असल्यामुळें भारतीय संस्कृतींत अध्यात्माला श्रेष्ठ स्थान मिळालें आहे अध्यात्मामुळें च मानव जातीचें कल्याण होणार असल्यामुळें संत–वाङ्मयात त्याचें विवेचन सविस्तर केलेलें असतें मी कोण आहे ? जगाचें यथार्थ स्वरूप काय आहे ? त्यातील पदार्थ व घटना यांची खरी योग्यता काय आहे ? हें कळल्याशिवाय मी जगांत व जगाशीं कसें वागावें हें समजणें शक्य नसल्यामुळें या प्रश्नांचा विचार अध्यात्मात प्रथमत केला जातो व त्याच्या आधारें नीति आणि व्यवहाराचे नियम मग सांगितले जातात.

जगाचें अंतिम सत्य स्वरूप अद्वैती ह्मणजे च एकजिनसी आहे कीं द्वैती किंवा बहुजिनसी आहे याविषयीं अनेक मतभेद आहेत. पण ज्ञानेश्वर आणि रामदास हे दोघेही निर्गुणाद्वैती आहेत निर्गुण निराकार एकजिनसी चित्स्वरूपी परब्रह्म च सर्वत्र आहे व त्याशिवाय दुसरें कांहींही नाहीं असा दोघांचाही सिद्धान्त आहे —

जिकडे पाहावें तिकडे अपार । कोणेकडे नाहीं पार ।
येकजिनसी स्वतंत्र । दुसरें नाहीं ॥ २० २-३

वस्तुसि जरी कल्पावें । तरी ते निर्विकल्प स्वभावें ।
तेथें कल्पनेच्या नांवें । सुन्याकार ॥ ७ ५ १

तयास परब्रह्म ह्मणावें । जें उपाधीवेगळें स्वभावें ।
जेथें दृश्यमायेच्या नांवें । सुन्याकार ॥ १७ १०-८

तेथें चचळ व्यापकाच्या नांवें । सुन्याकार ॥ २० ३ ४

ज्ञानेश्वरींतील या च अर्थाच्या पुढील ओव्या पहा —

येऱ्हवि तऱ्हीं महामती । विश्वतश्चक्षु या श्रुती ।
तेयाचिये व्याप्ती । रूप केलें ॥ १३-८०६

वांचूनि हस्तनेत्रपाए। हे भाक काय तेथ आहे।
सर्व शून्याचा साहे। निष्कर्ष जें ॥ ८८०

तैसें सर्वादि जें एक। तेथें कें व्याप्यव्यापक।
परि बोलावेया नाव एक। करावें लागे ॥ ८८२

काइ बहु बोलो जेया। नाहि दूजें ॥ १५-५२३

ज्ञानेश्वरांनीं परब्रह्माचें एकत्व दृढ करण्याकरितां त्याचें वर्णन "सर्व शून्याचा साहे। निष्कर्ष जें" अशा शब्दांनीं केलें आहे. हा च अर्थ रामदासांनीं कल्पनेच्या, दृश्यमायेच्या किंवा चंचळ व्यापकाच्या नांवें तेथें शून्याकार आहे या शब्दांनीं व्यक्त केला आहे. कारण सर्वशून्य शब्दानें ज्ञानेश्वरांनाही अभाव अपेक्षित नाहीं.

एऱ्हवीं सपूरपण तेयांचें पावें। तरि शून्य चि नव्हे तें स्वभावें।
वरि गगनाचेनि पालवें। गाळूनि घेतलें ॥ ८-१५

परब्रह्म इतकें संपूर्ण आहे कीं, त्याला शून्य म्हणता येत नाहीं, पण इतकें सूक्ष्म आहे कीं, आकाशाच्या पदरातून गाळून घेतलें आहे.

उपमे म्हणों गगन। तरी गगनापरीस तें निर्गुण। १-४-१९

येथें गुरूचें वर्णन करण्याच्या मिषानें रामदासांनीं हा च अर्थ सांगितला आहे.

दोघांच्याही मतें परब्रह्म हें पुरुषप्रकृति किंवा शिवशक्ति, क्षर-अक्षर, सत्-असत् इत्यादि द्वंद्वांच्या पलीकडे आहे:—

दोनी पुरुष लोकीं असती। क्षराक्षर बोलिजेती।
सर्व भूतें क्षर म्हणती। अक्षरकूटस्त बोलिजे ॥ १०-१०-४५

उत्तम पुरुष तो आणीक। निःप्रपंच निष्कळंक।
निरंजन परमात्मा येक। निर्विकारी ॥ ४६

प्रकृतिपुरुष शिवशक्ति। अर्धनारी नटेश्वर म्हणती।
परी ते अवघी जगज्जोती। मूळ त्यासी ॥ १५-७-३

ज्ञान आणी अज्ञान। वृत्तिरूपें हें समान।
निवृत्तिरूपें विज्ञान। जाळें पाहिजे ॥ २०-१-२८

ज्ञानेश्वरींतील या च अर्थाच्या पुढील ओंव्या पहा:—

तें तरि व्यक्त ना अव्यक्त। नित्य ना नाशवंत।
येयां दोहीं भावां अतीत। अनादि सिद्ध ॥ ८-१७३

आगा तो उत्तमु पुरुषु । जो तृतीयु कां निष्कर्षु ।
दोहीं इं हूतु आणिकु । आदिला जो ॥ १५-४५५

तो गा मी निरुपाधिकु । क्षराक्षरोत्तमु एकु ॥ १५-५२४

दोघेही अद्वैती असल्यामुळें दोघांच्या मतानें परब्रह्माहून भिन्न अशी सृष्टि कधीं उत्पन्न च झालेली नाहीं याला च अजातवाद म्हणतात.

अरे जें जालें चि नाहीं । त्याची वार्ता पुससी काई ॥ ८-३-१

ही रामदासांची ओवी प्रसिद्ध च आहे

मिथ्या शब्दीं काहीं च नाहीं । तेथें केलें कोणे काई ।
कर्णे निर्गुणाचा ठाई । हें हि अघटित ॥ ८-२-५४

येथेंही अजातवाद च सांगितला आहे. ज्ञानेश्वरांची पुढील ओवी पहा —

ऐसें आदी चि जें नाहीं । तयालागि रुदसी काइ ।
तू अचोट हें पाहीं । चैतन्य येक ॥ २-१६६

पर एक अद्वैत चित्तत्वाशिवाय दुसरें कांहीं च उत्पन्न झालेलें नाहीं, तर मग जें नामरूपात्मक बहुविनसी विश्व दिसतें तें काय आहे । या प्रश्नाचें उत्तर दोघानींही माया, विवर्त व कल्पनावादानें दिलें आहे.

येके कल्पनेचे पोटीं । बोलिजेती अष्ट सृष्टि । ६-६-५०

याचें ऐसें प्रतिवचन । ब्रह्म जें कां सनातन ।
तेथें माया मिथ्याभान । विवर्तरूप भासे ॥ ८-२ २

मिथ्या तें चि जालें सत्य । सत्य तें चि जालें असत्य ।
माया विभ्रमाचें कृत्य । ऐसें असे पाहातां ॥ ७ १०-१

ज्ञानेश्वरांनी पुढील ओव्यांत हें च सांगितलें आहे —

तैसें भूतजात माझा ठाइं । कल्पिजे तरि आभासे कांहीं ।
निर्विकल्पीं मग नाहिं । तेथ मी आघवें ॥ ९ ८९

हें उपजे आणि नाशे । तें मायामय दीसें ।
पन्हंवि तत्त्वता वस्तु असे । अविनाश चि ॥ २-१०५

नामरूपात्मक दृश्य जगत् हें विनाशी असून परब्रह्म तेवढें अविनाशी आहे असें दोघांनी प्रतिपादिलें आहे —

सकळ सृष्टीची रचना । ते हे पंचभूतिक जाणा ।
परंतु हे तगेना । सर्वकाळ ॥ ६-२-७
आदिअंतीं ब्रह्म निर्गुण । ते चि शाश्वताची खूण ।
येर पंचभूतिक जाण । नासिवंत ॥ ८
जें जें रूप आणी नाम । तो तो अवघा चि भ्रम ।
नामरूपातीत वर्म । अनुभवें जाणावें ॥ १३

ज्ञानेश्वरांनीही

तैसें असतेपण आहाच । जेया नाहिं होइजे हें साच । ८-३०

असें जगाच्या स्वरूपाविषयीं वर्णन केलें आहे.

नामरूपात्मक विश्व हा आभास असून तो ज्यावर होतो तें परमात्मतत्त्व तेवढें शाश्वत आहे असा सिद्धांत केल्यावर जीवाचा आणि या परमात्मतत्त्वाचा संबंध काय असा प्रश्न उत्पन्न होतो. ज्ञानेश्वर आणि रामदास या दोघांनींही परमात्मा व जीवात्मा हे अभिन्न आहेत असा सिद्धांत केला आहे. दासबोधांत पुढील ओव्या पहा:—

मी कोण ऐसा निवाडा । पाहों जातां तत्त्वझाडा ।
विचार करितां उघडा । आपण नाहीं ॥ ४-९-८
तत्त्वें तत्त्व जेव्हां सरे । तेव्हां आपण कैंचा उरे ।
आत्मनिवेदन येणें प्रकारें । सहजे चि जालें ॥ ९
आत्मा म्हणिजे अद्वैत । जेथें नाहीं द्वैताद्वैत ।
तेथें मीपणाचा हेत । उरेल कैंचा ॥ १८
आत्मा पूर्णत्वें परिपूर्ण । जेथें नाहीं गुणागुण ।
निखळ निर्गुणीं आपण । कोण कैंचा ॥ १९

ज्ञानेश्वरानीही

जो परमात्मा चि परि दूसरा । जो अहंकार निद्रा निदसुरा । ८-३४

या ओवींत, जीव वस्तुतः परमात्मा च असतां, अज्ञानामुळें देहाच्या ठिकाणीं अहंभावना केल्यामुळें, त्याच्यापेक्षां भिन्न भासतो असें वर्णन केलें आहे. तात्पर्य, जीव, जगत् आणि जगदात्मा यांच्याविषयींचें ज्ञानेश – रामदासांचे सिद्धान्त एकरूप च आहेत. या सिद्धान्तांचें विवेचन करतांना रामदासांनीं थोडी काळजी

घेतलेली दिसते. ज्ञानेश्वरांनीं ' सर्व शून्याचा निष्कर्ष, ' ' महाशून्य, ' शून्य ' इत्यादि शब्दांनीं परब्रह्माचें निर्गुण स्वरूप निर्देशिलें आहे. रामदासांनीं तसें केलें नाहीं, कारण त्यामुळें निष्कारण गैरसमज होतो. तसें च परब्रह्मापेक्षां जगत् हें भिन्न नाहीं हें सांगतांना व्यतिरेकात्मक वर्णनाबरोबर ज्ञानेश्वरांनीं ' हें जग ब्रह्म च आहे ' किंवा ' ब्रह्मच जग आहे ' अशा अन्वयात्मक विवेचनपद्धतीचाही उपयोग केला आहे. रामदासांनीं तसा केलेला दासबोधांत आढळत नाहीं. कारण त्यामुळेंही निष्कारण गैरसमज होऊन नामरूपात्मक जड जगाला सत्यत्व येऊन जडाद्वैत सिद्ध होण्याचा प्रसंग येतो. तसें च ' विज्ञान ' शब्दाचा उपयोग ज्ञानेश्वरांपेक्षां वेगळ्या अर्थानें रामदासांनीं केलेला दिसतो ( दा. बो. १०-१-२८ ); पण हे किरकोळ भेद विवेचनपद्धतीचे आहेत, सिद्धान्तांचे नाहींत हें उघड आहे.

सच्चिदानंदस्वरूपी परमात्मतत्त्व हें जीवाचें खरें स्वरूप आहे व हें आत्मस्वरूप ओळखणें म्हणजे च नरदेहाचें सार्थक आहे. विनाशी देह म्हणजे मी अशी मिथ्या कल्पना केल्यामुळें जीवाला मृत्यूची आणि दुःखाची भीति वाटते. पण ही निष्कारण आहे. जीव म्हणजे देह नव्हे. अविनाशी परमात्मा च देहाच्या उपाधीमुळें जीवरूपानें भासतो. जीवानें हें आपलें मूळ रूप ओळखलें म्हणजे त्याची मृत्यूची व दुःखाची भीति नाहींशी होते . आणि अमरत्वाची व अविनाशी आनंदाची त्याला प्राप्ति होते. आनंदाची प्राप्ति बाह्य विषयांपासून होते ही समजूतही चुकीची आहे. बाह्य विषयांमुळें आनंदाची अभिव्यक्ति आपल्या हृदयांत च होते. तेव्हां आनंद वस्तुतः आपल्या जवळ च असून त्याकरितां बाह्य विषयांवर आपण निष्कारण अवलंबून रहातों. बाह्य विषयांवर अवलंबून असणारा आनंद विनाशी व क्षणिक असतो. आध्यात्मिक आनंद अविनाशी आणि स्वाधीन असतो. आनंदाचें मूलस्थान आपल्या हृदयांत च आहे ही गोष्ट जर जगाच्या लक्षांत येईल, तर बाह्य विषयांच्या प्राप्तीकरितां जे अमानुष प्रकार जगांत चालले आहेत ते मंद होतील. भारतीय संस्कृतीनें हें ओळखलें आहे व जगांत शांतता प्रस्थापित करावयाची असेल, तर भारतीय तत्त्वज्ञानाचा प्रसार जगभर झाला पाहिजे. सुखाच्या शोधार्थ मनुष्यजाति भलतीकडे भटकत चालली आहे. अविनाशी सुखाचा मार्ग दाखविण्याला अध्यात्मशास्त्र च समर्थ असल्यामुळें आमच्या वाङ्मयांत ' बहुधा अध्यात्मनिरोपण ' केलेलें असतें. मनुष्याला अमरत्वाची, आनंदाची, सौंदर्याची जी तहान लागली आहे, त्याचें कारण त्याचें मूळ स्वरूप अमर, सुंदर व आनंदमय आहे. सुंदर वस्तु पाहून मनुष्यास आनंद होतो याचें कारण त्याच्या स्वरूपाशीं सदृश असें स्वरूप तो पाहातो. आत्मस्वरूप हें सुंदर व शुचि असल्यामुळें सुसंस्कृत मनुष्याला सौंदर्य व शुचिता आवडते व तिची अभिव्यक्ति आपल्या शरीरांत, समाजांत, राष्ट्रांत सर्वत्र व्हावी असें तो

इच्छितो. सर्व सुधारणाविषयक चळवळींचा उगम या च प्रवृत्तींतून झाला आहे. मनुष्याच्या या नैसर्गिक प्रवृत्तींचा खरा अर्थ अध्यात्मशास्त्र सांगतें. अध्यात्मानें आमची हानि झालेली नाहीं. अध्यात्म सुटल्यामुळें आमची हानि झालेली आहे.

अमर, सुंदर व आनंदमय आत्मस्वरूपाचें ज्ञान मनुष्याचें चित्त शुद्ध व स्थिर झालें म्हणजे होतें. कर्मयोग, भक्तियोग, पातंजलयोग किंवा ध्यानयोग आणि ज्ञानयोग हीं आत्मस्वरूप ओळखण्याचीं साधनें आहेत. कारण त्यामुळें चित्त शुद्ध व स्थिर होतें. यापैकीं ज्ञानयोग हें अंतरंग साधन आहे. कारण भक्ति, कर्म, ध्यान हीं सर्व शेवटीं ज्ञानांत पर्यवसित होतात.

आत्मविषयीं आंतुवट । साधन गा आंगदट ।
ज्ञान होये हे इं स्पष्ट । चावळलों ॥ १६-४५

जे मज पुरुषोत्तमा । ज्ञानें भेटे सुवर्मा ।
तो सर्वज्ञ ते चि सीमा । भक्तिची ही ॥ ४८

असें ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे. रामदासांनीं हि दासबोधांत द. ५ स. ६ मध्यें या ज्ञानयोगाचें सविस्तर वर्णन केलें आहे. ज्ञानेश्वरांप्रमाणें, 'पंथराज' पातंजल किंवा हठयोगाचें वर्णन मात्र दासबोधांत आढळत नाहीं. तो मार्ग कठीण आहे असें ज्ञानेश्वरांनीं बाराव्या अध्यायांत म्हटलें आहे. सर्वांना सुलभ असणाऱ्या कर्म भक्तियोगाचें विवेचन मात्र दोघांनीं केलें आहे.

पाळावी वेदांची आज्ञा । कर्मकांड उपासना ।
जेणें होइजे ज्ञाना । आधिकारपात्र ॥ २-४-१०
सद्उपासना सत्कर्म । सत्क्रिया आणी स्वधर्म ।
सत्संग आणी नित्य नेम । निरंतर ॥ ५-३-१३
ज्या ज्याचा जो व्यापार । तेथें असावें खबर्दार

स्वधर्मप्राप्त म्हणजे वर्णधर्मप्राप्त अशीं कर्तव्यकर्में ज्ञानाला अधिकारी होतो. आणि आत्मज्ञान झालें तरी हि करावयाचीं असतातः—

तैसें आत्मज्ञान आलें । परी साधन
येक वेळ उदंड जेविलें । तरी सामग्री

ज्ञानेश्वरांनीं तर गीतेच्या आधारें या कर्मयोगाचें

म्हणौनि आइकें पार्था । जेया
तेयां उचित कर्म सर्वथा । त्याज्य

देखें प्राप्तार्थ जाले । जे निष्कामता पातले ।
तेयां हीं कर्तृत्व असें उरलें । लोकांतरी ॥ १५४
जें पुढुतीं पुढुतीं पार्था । हे सकळलोकसंस्था ।
रक्षणीय गा सर्वथा । म्हणौनियां ॥ १६८

आत्मज्ञानविषयक सर्व साधनांत भक्ति हें सर्वांत व सर्वांना सुलभ साधन असल्यामुळें त्याचा उपदेश रामदास व ज्ञानेश्वर या दोघांनींहि सविस्तर केला आहे. रामदास म्हणतात.—

ग्रंथा नाम दासबोध । गुरुशिष्यांचा संवाद ।
येथ बोलिला विशद । भक्तिमार्ग ॥ १ १-२
भक्तिचेन योगें देव । निश्चयें पावती मानव ।
ऐसा आहे अभिप्राव । इये ग्रंथीं ॥ ४

ज्याला अविनाशी सुखाची इच्छा असेल त्यानें प्रपंच केला तरी त्यांत आसक्त न होतां भक्तिमार्ग अनुसरला पाहिजे. बाह्य विषयांपासून अविनाशी सुख मिळणें शक्य नाहीं. आनंदघन आत्माराम जाणला तरच त्याची प्राप्ति होईल—

सांडून राम आनंदघन । ज्यांचे मनीं विषयचिंतन ।
त्यासी कैचें समाधान । लोलंगतासी ॥ ३-१०-६२
जयास वाटे सुख चि असावें । तेणें रघुनाथभजनीं लागावें ।
स्वजन सकळहि त्यागावे । दुःखमूळ जे ॥ ६३
जेथें वासना झोंबोन पडे । तेणें चि अपाय दुःख जडे ।
म्हणौनि विषयवासना मोडे । तो येक सुखी ॥ ६४
विषयजनित जें जें सुख । तेथें चि होतें परम दुःख ।
पूर्वी गोड अंतीं शोक । नेमस्त आहे ॥ ६५

या सर्व ओव्या महत्त्वाच्या आहेत. ज्ञानेश्वरांनींहि प्रपंचाच्या अनित्यतेचें वर्णन करून

तरि झडझडौनि वहिला निघ । इये भक्तीचिये वाटे लाग ।

असें च सांगितलें आहे.

या भक्तीच्या बाबतींत ज्ञानेश व रामदास या दोघांचेंहि धोरण उदारपणाचें आहे. अमुक च देवाची भक्ति केली पाहिजे असा दोघांचाहि आग्रह नाहीं. मामन

पंडितांचें धोरण असें उदार नाहीं. श्रीकृष्णाची च भक्ति केली पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे व ज्ञानेश्वरांनीं गणेश–शारदेला ग्रंथारंभीं वंदन केल्याबद्दल त्यांच्यावर पंडितांनीं कडक टीका केली आहे. गमतीची गोष्ट अशी आहे कीं, पंढरपूरच्या विठ्ठलाचें नांव, वारकरी सांप्रदायाच्या प्रमुखस्थानीं असणाऱ्या ज्ञानेश्वरींत कोठेंही नाहीं. पण रामदासांनीं अर्चनभक्तीचें वर्णन करितांना विठ्ठलमूर्तीचा उल्लेख आदरपूर्वक केला आहे:—

गणेशशारदाविठलमूर्ती । रंगनाथजगंन्नाथतांडवमूर्ती ।
श्रीरंगहनुमंतगरुडमूर्ती । देवतार्चनीं पूजाव्या ॥ ४-५-८
दिंड्या पताका निशाणें । टाळ घोळ मृदांग ॥ २०
नाना वाद्यें नाना उत्साव । नाना भक्त समुदाव ।
गाती हरिदास सद्भाव । लागला भगवंतीं ॥ २१
काया वाचा आणी मनें । चित्तें वित्तें जीवें प्राणें ।
सद्भावें भगवंत आर्चनें । या नांव आर्चनभक्ती ॥ २६

या भक्तिविषयक औदार्यापेक्षांही, कर्म आणि भक्ति यांचा समन्वय करून भक्तीला भव्य आणि व्यापक स्वरूप ज्ञानेश–रामदासांनीं दिलें आहे ही गोष्ट अधिक महत्त्वाची आहे. परमेश्वर हा फक्त घरांतील देवघरांत किंवा गांवांतील देवळांत किंवा एखाद्या तीर्थक्षेत्रांत बसलेला नाहीं. तो विश्वव्यापक आहे. त्यामुळें विश्वाला आपल्या कर्तव्यकर्मांनीं संतुष्ट करणें, जनांची सेवा करून त्यांच्यात असणाऱ्या जनार्दनाला तृप्त करणें ही खरी भक्ति किंवा उपासना आहे असें रामदासांनीं प्रतिपादिलें आहे:—

नारायेण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।
याकारणें तोषवावी । कोणीतरी काया ॥ १५-६-२५
देवास अवघें लागे करावें । त्यांत येऊं ये तितुकें घ्यावें ।
अधिकारासारिखें चालावें । म्हणिजे बरें ॥ ३२
जनीं जनार्दन म्हणोनी जना । संतुष्ट करावें ॥ १८-४-३५
जिकडे जग तिकडे जगन्नायेक । कळला पाहिजे विवेक । १९-७-१२
पृथ्वीमधें जितुकीं शरीरें । तितुकीं भगवंताचीं घरें । २०-४-४

या सर्व ओव्यांत हा च अर्थ सांगितला आहे. ज्ञानेश्वरांनींही वर्णधर्मप्राप्त सामुदायिक कर्तव्यें करणें ईश्वराला अत्यंत प्रिय आहे व हीच त्याची सर्वश्रेष्ठ अशी भक्ति आहे असें पुढील ओव्यांत प्रतिपादिलें आहे.

विहित कर्म पांडवा । आपुला अनन्यु वोलवावा ।
आणि हे चि प्रेमसेवा । सर्वात्मकाची ॥ १८-९०२

तेया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमाची वीरा ।
पूजा केली होये अपारा । तोखा लागि ॥ ९१३

अशा रीतीनें कर्म आणि भक्तीचा समुच्चय करून, निरासक्त व निर्लोभी वृत्तीनें, ईश्वरार्पणपूर्वक ब्राह्मणक्षत्रियादि वर्णांची सामाजिक कर्तव्यें करीत गेल्यानें व समाजाकरितां आपल्या सर्वस्वाचा वेंच केल्यानें व्यक्तीची चित्तशुद्धि व आध्यात्मिक उन्नति व्हावी आणि " सर्वथा रक्षणीय " अशी " लोकसंस्था " ही सुरळीत चालावी अशी योजना ज्ञानेश समर्थांच्या शिकवणुकीमध्यें आहे. यावरून संतवाङ्मय हें समाजविन्मुख नसून सर्वथा समाजसन्मुख आहे व समाजाचा व व्यक्तींचा खरा उद्धार करण्याचें सामर्थ्य त्याच्यामध्यें आहे हें लक्षांत येईल.

जीवन हा एक महान् संग्राम आहे व त्यांत अंतर्बाह्य सर्वत्र लढा सुरू आहे. सत् आणि असत्, चित् व जड, चांगलें आणि वाईट यांच्यातील सनातन विरोध या संग्रामाच्या मुळाशीं आहे. स्थूल दृष्टीच्या लोकांना फक्त बाह्य लढे दिसतात. पण ते बाहेर दिसण्यापूर्वी अंतःकरणात लढले जातात. सत्प्रवृत्ति आणि असत्प्रवृत्ति यांच्या लढ्यात सत्प्रवृत्तींचा विजय व्हावा याकरितां चित्त शुद्ध आणि समर्थ केलें पाहिजे आणि सत्प्रवृत्ति धारण करणारे लोक आणि असत्प्रवृत्ति धारण करणारे लोक यांच्या स्पर्धांत पहिला पक्ष विजयी व्हावयाचा असेल तर त्याला शारीरसामर्थ्याची, क्षात्रवृत्तीची आवश्यकता आहे. म्हणून या दोन्ही सामर्थ्यांचा पुरस्कार संत वाङ्मयानें केला असून जीवनाच्या महान् संग्रामात विजयी होण्याचा आदेश दिला आहे. संतवाङ्मय दुबळें आहे असें म्हणणाऱ्या लोकांनीं लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, मराठीं वाङ्मयांतील ज्येष्ठ व श्रेष्ठ असा ज्ञानेश्वरी हा ग्रंथ भगवद्गीतेवर टीका म्हणून रचला आहे व भगवद्गीता ही अर्जुनाला युद्धप्रवृत्त करण्याकरितां व क्षात्रवृत्तीचें राष्ट्रीय जीवनांत महत्त्व प्रतिपादण्याकरितां सांगितलेली आहे. धर्म्ययुद्ध केलेंच पाहिजे, तें करण्यांत पाप नाहीं, तें न करण्यांत मात्र पाप आहे असा गीतेचा सिद्धान्त आहे. हिंसा अहिंसेचा प्रश्न च येथें उत्पन्न होत नाहीं. कारण आत्मतत्त्व अमर असल्यामुळें त्याची हिंसा कधीं च होणें शक्य नाहीं. प्रश्न एवढा च असतो कीं, असत्प्रवृत्ति धारण करणारीं शरीरें ठेवायचीं कीं नष्ट करावयाचीं ? समाजाच्या दुःखाला कारण होणाऱ्या दुष्ट प्रवृत्ति प्रयत्न करूनहि जर नष्ट होत नसतील तर त्या प्रवृत्ति धारण करणारी शरीरें नष्ट करणें अवश्य आहे असें श्रीकृष्णाचें मत असल्यामुळें सज्जनाच्या संरक्षणाबरोबर च तें चांगल्या रीतीनें व्हावें म्हणून दुष्टांचा विनाश करण्याकरितां च अशा रीतीनें

धर्माची स्थापना करण्याकरितां तो पुनः पुनः जन्म घेतो. ज्ञानेश्वरांनींही गीतेला अनुसरूनच धर्म्य युद्धें आवश्यक आहेत असें प्रतिपादिलें आहे:—

तूं आइकें कां न विचारिसि । काइ हें चिंतितु आहासि ।
स्वधर्मु तो विसरलासि । तरावें जेणें ॥ २-१८०
अर्जुना तुझें चित्त । जऱ्ही जालें द्रविभूत ।
तऱ्ही हें अनुचित । संग्रामसमइं ॥ १८३
म्हणौनि तुं पाहीं । क्षत्रियां आणिक कांहीं ।
संग्रामुवांचूनि नाहीं । उचित जाणें ॥ १८९
अर्जुना देखें जुझ आतांचें । हें हो काज दैव तुमचें ।
किं निधान सकळ धर्माचें । प्रकटल असे ॥ १९१
म्हणौनि इये गोठी । विचारुन कीजे किरीटी ।
आतां धनुष घेउनि उठी । जूझें वेगां ॥ २२१
एथ विजयपण होईल । कीं सर्वथा देह जाईल ।
हें आदिं चि मांहिं पुढेल । चिंतावें ना ॥ २२७
आम्ही समस्त ही विचारिलें । तंव ऐसें चि हें मना आलें ।
जें न संडिजे तुआं आपुलें । विहित कर्म ॥ २६५
आतां कोदंड घेउनि हातीं । आरूढ पां इए रथीं ॥
देइं आलिंगन वीरवृत्ती । समाधानें ॥ ३-१८६
जगीं कीर्ति ते रूढवीं । स्वधर्माचा मानु वाढवीं ।
येया भारापासौनि सोडवीं । मेदिनी हे ॥ १८७
आतां पार्था निःशंकु होइं । एया संग्रामा चित्त देइं ।
एथ हें वांचूनि कांहीं । करूं नेए ॥ १८८

रामदासांनीं हि

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।

या गीताश्लोकाच्या आधारें च, महाराष्ट्रांतील क्षत्रियांची " बहुत दिवस माजलेलें म्लेच्छांचें बंड " मोडण्याकरितां उठावणी केली व सांगितलें कीं:— .

मारितां मारितां मरावें । तेणें गतीस पावावें ।
फिरोन येतां भोगावें । महद्भाग्य ॥

जैसा भांड्याचा गळोला । निर्भय भारामध्यें पडिला ।
तैसा क्षत्री रिचविला । परसैन्यामध्यें ॥

ऐसे अवघे चि उठतां । परदळाची कोण चिंता ।
हरणें लोळवी चित्ता । देखतदेखतां ॥

देवमात्र उच्छेदिला । जित्यापरिस मृत्यु आला ।
आपुला स्वधर्म बुडविला । ऐसें समजावें ॥

मरणहांक तो चुकेना । देह वांचवितां वांचेना ।
विवेकी होऊन समजाना । काये करावें ॥

देवद्रोही तितुके कुत्ते । मारोनि घालावे परते ।
देवदास पावती फत्ते । यदर्थी संशय नाहीं ॥

ज्ञानेश्वरांच्या वेळीं शत्रु समोर नव्हता. रामदासांच्या वेळीं तो समोर असल्यामुळें त्याचा प्रत्यक्ष उल्लेख त्यांनीं केला आहे. क्षात्रवृत्ति आणि युद्धें यांची स्वधर्मस्थापने-करितां आवश्यकता दोघांनीं हि प्रतिपादिली आहे.

तात्पर्य, ज्ञानेश्वर आणि रामदास यांची तत्त्वज्ञान आणि व्यवहारविषयक शिकवण एका च प्रकारची आहे. दोघेही निर्गुणाद्वैतवादी, अजातवादी, माया आणि विवर्तवादी आहेत. नामरूपात्मक जड जगत् दोघेही मिथ्या व नश्वर मानितात. जीव-परमात्मा यांचें ऐक्य दोघेही प्रतिपादितात. प्रपंचापासून किंवा विषयांपासून अविनाशी सुख प्राप्त होणार नाहीं, त्याकरितां चित्त शुद्ध करून आत्मस्वरूप च ओळखलें पाहिजे असा दोघांचा हि सिद्धान्त आहे आणि या सर्वत्र सम, शांत व सुंदर असणाऱ्या आत्मस्वरूपाची आभिव्यक्ति अंतर्यामी व्हावी म्हणून ज्ञान, कर्म व भक्ति या साधनांचा पुरस्कार दोघांनीं हि केला आहे कर्म आणि भक्ति यांचा समुच्चय करून निरासक्त बुद्धीनें सामुदायिक कर्तव्यकर्में करण्याची, क्षात्रवृत्तीची व धर्मयुद्धाची आवश्यकता दोघांनीहि प्रतिपादिली आहे. समुदायाचें अनहित करणाऱ्या स्वार्थी प्रवृत्तिपरतेचा दोघांनीहि निषेध केला असल्यामुळें, या अर्थानें त्या दोघांचेंही वाङ्मय निवृत्तिपर आहे असें म्हणतां येईल. जनांमध्यें असणाऱ्या जनार्दनाची सेवा करण्याकरितां निष्काम व निरासक्त बुद्धीनें कर्तव्यकर्मांना प्रवृत्त होण्यास दोघांनींहि सांगितलें आहे व प्रवृत्तीची जरूरी नांगी अशा रीतीनें दोघांनीहि ठेंचली आहे. ज्या राष्ट्रांतले लोक प्रपंचांत परकाष्ठेचे आसक्त झालेले असतात व

सामुदायिक हितापेक्षां व्यक्तिगत स्वार्थाकरितांच प्रवृत्त होतात तें राष्ट्र पतित होतें हें आपण पहात च आहों. म्हणून खरें व उदात्त सुख प्रपंचात मिळणारें नसून समुदायाच्या हिताकरितां बुद्धिशक्तींचा वेंच करण्यांत च आहे असें या दोघांनींहि सांगितलें.

ज्ञानेश्वरांच्या वेळीं स्वराज्य जाण्याचा समय आला होता पण प्रत्यक्ष पारतंत्र्य आलें नव्हतें. रामदासांच्या वेळीं प्रत्यक्ष पारतंत्र्य होतें व स्वराज्याच्या उषःकालाला हळुहळु आरंभ झाला होता. म्हणून रामदासांनीं हरिकथानिरुपणा-बरोबर राजकारणाला स्थान दिलें, प्रयत्नवादाचा पुरस्कार केला व " शक्तीनें मिळतीं राज्यें " असें सांगून स्वधर्मरक्षणाकरितां स्वराज्यस्थापनेचा जो उद्योग छत्रपति शिवाजी महाराजांनीं सुरू केला होता त्याला लोकमत अनुकूल केलें. महाराजांचे उद्योग ज्या प्रदेशांत चालत त्या प्रदेशांत समर्थांनीं वास्तव्य केलें. महाड-बिरवाडी-रायगडच्या प्रदेशांत शत्रूचा हात पोंचणार नाहीं अशा सह्याद्रीच्या दुर्गम दऱ्याखोऱ्यांतून महाराजांचे उद्योग चालले असतां जवळच शिवथरच्या घळींत अनेक वर्षें समर्थ राहिले. समर्थ-शिवबांच्या या सहकारितेमुळेंच आज ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीला रायगडावर हिंदु छत्रपतीला अनेक शतकांनंतर वैदिक मंत्रांनीं राज्याभिषेक झालेला महाराष्ट्रनें पाहिला.

ज्ञानेश्वर आणि रामदासांनीं सांगितल्याप्रमाणें प्रपंचाची आसक्ति आणि विषयसुखांची लालसा कमी होईल, परमार्थाची गोडी लागेल, तर अजूनही महाराष्ट्रांत निस्वार्थबुद्धीनें केलेल्या वीरकृति आपणाला दिसतील.

उत्कट भव्य तें चि घ्यावें । मळमळीत अवघें चि टाकावें ।

असें वाटूं लागेल आणि व्यक्ति व राष्ट्र यांचा ऐहिक व पारमार्थिक उत्कर्ष साधून हिंदु राष्ट्र समर्थ व संपन्न बनेल.



# परिशिष्ट

## दासबोधांत उद्धृत केलेलीं गीतेंतील स्थळें

( १ ) दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।
अज्ञानं चाभि जातस्य पार्थ संपदमासुरीम ॥ १६-४

( २ ) ऊर्ध्वं गच्छंति सत्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः ।
जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छंति तामसाः ॥ १४-१८

( ३ ) ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् । ४-११
( ४ ) नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते । ४-३८
( ५ ) नैनं छिंदान्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ २-२३
शस्त्राचेनि तुटेना । अग्निचेनि जळेना ।
उदकामध्यें काल्वेना । स्वरूप माझें ॥ ६-६-२०
( ६ ) ( ममैवांशो जीवलोके ) जीवभूतः सनातनः । १५-७
( ऐसें गीतेचें-वचन । ६-६-४ )
( ७ ) अश्वत्थः सर्ववृक्षाणाम् । १०-२६
( ८ ) इंद्रियाणाम् मनश्चास्मि । १०-२२
( कृष्ण ह्मणे मन तो मी । ६-६-२२ )
( ९ ) अध्यात्मविद्या विद्यानाम् वादः प्रवदतामहम् ॥ १०-३२
( १० ) व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ।
बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ २-४१
( ११ ) कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते । १३-२०
( १२ ) आत्मैव ह्यात्मनो बंधुः आत्मैव रिपुरात्मनः ॥ ६-५
( १३ ) ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥ १०-१०
( १४ ) एकांशेन स्थितो जगत् ॥ १०-४२
त्याच्या अंशें जग चाले । ऐसें भगवद्गीता बोले ।
( १५ ) द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १५-१६
( १६ ) विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।
शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ ५-१८
( १७ ) दंभ दर्प अभिमान । क्रोध आणी कठिण वचन ।
हें अज्ञानाचें लक्षण । भगवद्गीतेंत बोलिलें ॥ १२-१०-२८

( १८ ) सर्व सांडून शोधा मजला । ऐसें देव चि बोलिला ।
लोकीं शब्द अमान्य केला । भगवंताचा ॥ १३-७-२१
सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ॥ १८-६६

( १९ ) संभवामि युगेयुगे । ४-८ ( ऐसें हें वचन । २०-१-२६ )



